दक्षिणाप्राइज् कमिटीनें बक्षीस दिलेलें

# यशवंतराय महाकाव्य.



हें


## वासुदेव वामन शास्त्री खरे,

मिरज हायस्कुलांतील संस्कृत भाषेचे शिक्षक, व ‘समुद्र’
आणि ‘गुणोत्कर्ष’ या पुस्तकांचे कर्ते,


यांनीं रचिलें.

तें


**पुणें येथें**

‘ज्ञानप्रकाश’ छापखान्यांत छापिलें.



शके १८१०—सन १८८८.



किंमत १ रुपया; टपालखर्च २ आणे.

# प्रस्तावना.

प्रस्तुत काव्याचें कथानक मागें दिलेंच आहे. तें बहुतेक कल्पित आहे. कांहीं इतिहासप्रसिद्ध पुरुषांचा व ऐतिहासिक गोष्टींचा या काव्यांत संबंध आला आहे खरा; तथापि तेवढ्यावरूनच या ग्रंथास ऐतिहासिक काव्य म्हणतां येणार नाहीं. इतिहासांतील कोणच्याही गोष्टीचें मुख्यत्वेंकरून वर्णन करण्याचा माझा उद्देश नाहीं. त्या वेळची लोकस्थिति दाखविण्याचा माझा उद्देश आहे. सर्व कथा संभवनीय असून तीमध्यें आलेल्या ऐतिहासिक पुरुषांच्या हातून घडविलेलीं कृत्येंही त्या त्या पुरुषांच्या गुणांस व स्वभावांस अनुरूप अशींच आहेत.

ज्या काळांत या काव्यांतील गोष्ट घडून आली अशी कल्पना केली आहे, तो काळ सन १७५७ म्हणजे पानपतच्या लढाईपूर्वीं चार वर्षें होय. या काळाची स्थिति वाचकांच्या लक्ष्यांत पूर्णपणें यावी म्हणून त्याबद्दल थोडें लिहितों.

पानपतच्या लढाईपूर्वीं कांहीं काळपर्यंत मराठ्यांचें राज्य उत्कर्षाच्या शिखरास चढलें होतें; परंतु शिवाजीपेक्षां बाळाजी बाजीरावाची शक्ति दसपट वाढली असूनही या वेळीं मराठी राज्यास चिरस्थायिता नव्हती. शिवाजीचें बळ महाराष्ट्रवीरांच्या देशाभिमानावर व धर्माभिमानावर अवलंबून होतें. बाळाजी बाजीरावाचें बळ पगारावर व लुटीच्या द्रव्याच्या आशेवर लढणाऱ्या मराठी शिपायांच्या भाल्या-

ऱ्यावर अवलंबून होतें. शिवाजी शत्रूंशीं लढण्यास आपणास शक्ति यावी म्हणून लूट करीत असे, आणि पेशवे लुटीसाठीं लढाई करीत. पेशव्यांच्या फौजांनीं उत्तर हिंदुस्थानांत एकामागून एक प्रांत लुटीत असतां शत्रु किंवा मित्र मुळींच पाहिला नाहीं. दोन पक्षांचा कलह लागला असतां जिकडे पुष्कळ पैसा मिळेल तिकडे मराठे असावयाचे. अशा प्रकारची मराठयांची राजनीति असल्यावर नाशकालीं त्यांस चोहींकडून शत्रु उभे राहिले यांत नवल तें कोणचें ?

उत्तर हिंदुस्थानांत मराठयांनीं रजपूत लोकांस जसा त्रास दिला तसा दुसऱ्या कोणच्याही लोकांस दिला नसेल. कित्येक वेळीं मराठयांचीं व रजपूतांचीं प्रचंड युद्धें होऊन रक्ताचे पूर वाहिले आहेत ! या दोन जातींच्या शूर लोकांमध्यें समानधर्मत्वाबद्दल तरी प्रीति व ऐक्यभाव वाढावा तो वाढला नाहीं ही मोठी दुःखाची गोष्ट आहे !

दिल्लीच्या बादशहांशीं मराठी राज्याचा दोन प्रकारचा संबंध होता. शिवाजी, संभाजी, राजाराम व ताराबाई यांनीं स्वतंत्रतेच्या बाण्यानें वागून मोंगल बादशहांशीं वैर चालविलें; परंतु शाहूपासून पुढें होणाऱ्या मराठी राज्याच्या अधिपतींनीं दिल्लीपतीशीं चाकराच्या नात्यानें वागून कधीं युक्तीनें व कधीं दांडगाईनें त्यापासून नवीन देश व नवीन हक्क मिळविले. दिल्लीची बादशाही अगदीं मोडकळीस आली होती आणि तिचें रक्षण करण्यास मराठयांच्या फौजा हरहमेश जात असत. बादशहाच्या दरबारीं मराठयांचें प्राबल्य

झाल्यावर त्याच्या नांवावर रजपूत लोकांस खंडणीसाठीं मराठ्यांनीं फार त्रास दिला.

बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दींत मराठी सरदारांत अंतस्थ वैमनस्यें फार माजलीं होतीं. त्यांत सदाशिवरावभाऊच्या व मल्हारराव होळकराच्या कलहापासून मराठी राज्यावर पुढें कसा घोर अनर्थ ओढवला हें सर्वांस माहितच आहे.

मराठ्यांची रजपुतांशीं अन्यायाची व निर्दयपणाची वागणूक, मराठ्यांचा दिल्लीपतीशी संबंध, आणि भाऊचा होळकराशीं द्वेष, या तिन्ही गोष्टींचा प्रस्तुत काव्याच्या संविधानकांत उपयोग करून घेतला आहे.

या काव्यांत वीररसाचाच मुख्यत्वेंकरून परिपोष करण्याचा माझा उद्देश असल्यानें नायक यशवंतराय या पात्राची कल्पना तशाच प्रकारची केली आहे. रजपूत व मराठे या दोन्ही प्रकारच्या शूर शिपायांमध्यें असणारे गुण यशवंतरायाच्या अंगीं होते असें कल्पिलें आहे. आपल्या इमानावर विश्वास ठेवून घरीं भेटण्याकरितां आलेल्या दिल्लिरखानास सोडून देणें, व रात्रीं अकस्मात् त्याच्या गोटांत शिरून त्यास ठार मारणें, या गोष्टी या स्वभावाचीं निदर्शनें होत. संस्कृत काव्यनाटकांतून नायक सर्वदा विजयी असावयाचाच. यशवंतरायाची तशी स्थिति नाहीं. याला मुख्य दोन कारणें आहेत. एक तर हल्लींच्या स्थितीचा विचार केला असतां कोणाही मनुष्यास सर्वदा विजय प्राप्त होणें संभवत नाहीं. शिवाय असल्या वर्णनानें नायकाच्या स्वभावाची एकच बाजू दाखविली जाते. यशवंतरायाचा प्रतिस्पर्धी म-

ल्हारराव होळकर हा होता; हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे. यशवंतराय तरूण, अनुभवहीन व होतकरू शिपाई. मल्हारराव तर चाळीस वर्षें शिपाइगिरी गाजविलेला मराठ्यांचा प्रख्यात व अनुभवी सेनापति. तेव्हां या दोन वीरांच्या झटापटींत यश कोणास यावें बरें? कल्पित यशवंतरायानें खरोखरीच्या मल्हाररावावर जय मिळविणें म्हणजे सेमिरामिस राणीच्या आयते वेळीं बनविलेल्या खोट्या हत्तींनीं पौरस राजाच्या खरोखरीच्या हत्तींवर जय मिळविण्यासारखेंच हास्यास्पद होय! शिवाय या दोघांमध्यें पितापुत्राचें नातें असल्यानें पुत्रानें पित्याचा पराजय करावा हें ठीक दिसत नाहीं. यशवंतराय या धीरोदत्त नायकाच्या अपजयाबद्दल व बंधनाबद्दल पुष्कळ गृहस्थांनीं आक्षेप काढून मला कळविल्यामुळें या मुद्यावर इतकें लिहावें लागलें.

या पुस्तकास 'महाकाव्य' अशी संज्ञा दिल्यावरून स्वकृतीविषयीं दर्पोक्ति प्रकट केल्याचा मजवर आरोप येण्याचा संभव आहे. वस्तुत: 'महाकाव्य' एवढ्या शब्दानेंच कवितेच्या उत्कृष्टत्वाबद्दल सुचविण्याचें माझ्या स्वप्नांतही नाहीं! कोणीकडे गीर्वाणभाषारूपी उज्वल दुकूलानें सुशोभित, अनेक-गुणालंकार-युक्त व प्रासादिक रघुवंशादिक महाकाव्यें; आणि कोणीकडे मराठीभाषारूपी रकटें पांघरणारा बिचारा मांनदळ यशवंतराय! यशवंतरायाच्या कर्त्यानें आपल्या कृतीस 'महाकाव्य' असें नांव देऊन संस्कृत महाकवींशीं स्पर्धा करूं जाणें म्हणजे

घटानां निर्मातु स्त्रिभुवनविधातुश्च कलहः ॥

याप्रमाणेंच उपहासास्पद होय!

'महाकाव्य' या नांवाचा काव्यरचनेचा एक प्रकार साहित्यशास्त्रांत सांगितला आहे; आणि त्या प्रकाराचें हें कांहींसें अनुकरण आहे. महाकाव्याची रचना कथा वर्णन करण्यास फार उपयोगीं पडते. महाकाव्याच्या लक्षणाप्रमाणें नद्या, पर्वत, अरण्यें, चंद्रसूर्यांचे अस्त व उदय, राजसभा, दूत, युद्ध, ऋतु इत्यादि वस्तूंचें वर्णन करण्यास कवीस आयतीच संधि सांपडते. संविधानक विस्तीर्ण धरावें लागल्यानें नानाप्रकारचे प्रसंग वर्णून मनुष्यस्वभावाचीं निरनिराळीं रूपें वाचकाच्या नजरेसमोर आणतां येतात. एका सर्गामध्यें एकाच वृत्ताचे श्लोक असावे, असा प्राय: नियम असल्यानें पद्यरचनेकडे कवीचा एक सारखा लय लागतो; आणि एखाद्या सर्गाचे दहा पंधरा श्लोक तयार झाले म्हणजे मग सर्ग शेवटास जाईपर्यंत भराभर कविता होत जाते.

कविता जितकी सोपी व सरळ असेल तितकी चांगली असें मला वाटतें. या काव्यांत अशीच कवितेची रचना ठेवण्याचा यत्न केला आहे. कविता सोपी करण्याच्या उत्सुकतेमध्यें कित्येक वेळां मराठींतील अगदीं प्रचारांतील शब्दांचीही योजना माझ्या हातून होऊन गेली आहे.

सांप्रत मराठी कवितेकडे लोकांची जी अनास्था दिसून येते तिचें कारण मराठी कवितेचें काठिन्य हें होय. मराठी कवितेंत यमकें साधिलींच पाहिजेत असा नियम असल्यानें कवीस पुष्कळ वेळां यमकें ओढून ताणून जुळवावीं लागतात—अर्थात् कविता नीरस व क्लिष्ट होते. जेथपर्यंत मराठी कवितेच्या पायांतील यम-

कांचीं बंधनें शिथिल होणार नाहींत तेथपर्यंत ती साधारण लोकांस सुबोध होण्यास कांहीं मार्ग नाहीं. कविता सोपी करण्याचा माझा उद्देश असल्यानें यमकें साधण्याची मीं फारशी खटपट केली नाहीं. क्वचित् पहिला व तिसरा आणि दुसरा व चवथा या चरणांचीं यमकें साधिलीं आहेत व कोठें तर यमकांस मुळींच टाळा दिला आहे. याबद्दल वाचक मला क्षमा करोत!

या काव्यांत कवितेच्या सोयीसाठीं एकच वस्तु किंवा व्यक्ति यांचा निरनिराळ्या नांवानीं निर्देश केला आहे, तो असा:—

१. कोटा शहरास क्वचित् कोट्टपूर असें नांव दिलें आहे. चाराव्या सर्गाखेरीज ज्या ठिकाणीं पुर, नगर, पट्टन इत्यादि शब्द आले आहेत त्या ठिकाणीं ते कोटा शहराचे प्रदर्शक समजावे.

२. कथानायक यशवंतराय यास यशवंतराज, यशवंतराव, यशस्वी, ( नवव्या सर्गांत ) पौराधिपति व पुराधिकारी, ( तो कोटा शहरांत व तेथील लोकांत मुख्य होता म्हणून ) दिल्लिरारि व बादलारि ( दिल्लिरखान व बादल यांस मारणारा म्हणून ) अशीं नांवें दिलीं आहेत.

३. दिल्लिरखान पठाण होता तरी तो मोंगलांचा चाकर म्हणून त्यास व त्याच्या जातींच्या लोकांस मोंगल, यवन, अविंध, म्लेच्छ असें म्हटलें आहे.

यशवंतराय काव्यांतील वृत्तांसंबंधानें येथें नवीन सांगण्यासारखें कांहीं नाहीं. तथापि अश्वगति व वैतालीय हीं वृत्तें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत. पहिल्या वृत्ताचा मराठींत प्रथम उपयोग माझे

मित्र रा० रा० बजाबा बाळाजी नेने यांनीं आपल्या 'सैरंध्री' नाटकांत केला. या वृत्तावर याच गृहस्थांनीं एक सुंदर चाल बसविली आहे. हें वृत्त कित्येक सर्गांच्या शेवटीं मीं घातलें आहे. दुसरें वृत्त वैतालीय. याचा उपयोग मराठी कवितेंत झालेला फारसा पहाण्यांत नाहीं. हें वृत्त करुणारसास किती अनुकूल आहे हें ज्यांनीं रघुवंशाचा आठवा सर्ग किंवा कुमारसंभवाचा चवथा सर्ग वाचला असेल त्यांस ठाऊक असेलच.

दक्षिणाप्राईज कमिटीकडे हें काव्य परीक्षेकरितां मीं पूर्वीं पाठविलें होतें, त्यापेक्षां हल्लीं यांत पुष्कळ फेरफार केले आहेत. पूर्वीं हें काव्य दुःखपर्यवसायी होतें, तें आतां आनंदपर्यवसायी केलें आहे. मूळ प्रतींतून सुमोर तीनशें श्लोक नीरस वाटल्यावरून काढून टाकिले आहेत, व एक नवीन सर्ग रचून घातला आहे. हे सर्व फेरफार दक्षिणाप्राईज कमिटीचे विद्वान् सेक्रेटरी रा० रा० शवजी शास्त्री गोडबोले यांच्या सूचनांवरून केले आहेत. या सूचनांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. रा० रा० शवजी शास्त्री यांनीं या काव्यांतील जे जे दोष मला दाखविले ते ते सर्व काढून टाकले आहेत.

रा० रा० रामचंद्र भिकाजी जोशी, माजी 'निबंधचंद्रिके' चे कर्ते यांनीं दोन वर्षांपूर्वीं यशवंतराय काव्यांतील संविधानक व कांहीं उतारे आपल्या पुस्तकाच्या द्वारानें लोकांसमोर आणिले त्याबद्दल मी त्यांचे फार आभार मानितों. तसेंच रा० रा० हरि कृष्ण दामले, असिस्टंट मास्तर न्यू इंग्लिश स्कूल, पुणें, यांनीं हें

पुस्तक छापण्याच्या कामांत मला पूर्ण मदत दिली; याबद्दल त्यांचे मी फार फार आभार मानितों.

माझ्या 'गुणोत्कर्ष' नाटकास लोकांनीं फार चांगला आश्रय दिला. पुस्तक छापून बाहेर पडलें म्हणजे तें खपून कधीं काळीं तरी त्याची दुसरी आवृत्ति काढण्याचा आनंददायक प्रसंग मराठी ग्रंथकारांपैकीं फारच थोड्यांस आला आहे. 'गुणोत्कर्षा' च्या दोन आवृत्ति दीड वर्षांत खपून तिसरी आवृत्ति काढण्याचे अगत्य दिसून आलें. 'गुणोत्कर्षा' प्रमाणें माझ्या याही पुस्तकाविषयीं गुणज्ञ लोक पक्षपात दाखवितील, अशी आशा प्रदर्शित करून ही लांबलेली प्रस्तावना मी पुरी करितों.

मिरज, तारीख २४ माहे एप्रिल सन १८८८. } वासुदेव वामन शास्त्री खरे.

# यशवंतराय महाकाव्याचें संविधानक.



पूर्वी मराठे लोकांच्या फौजेंत आनंदराव इफळे या नांवाचा एक सरदार होता. त्यास एक कन्या होती. तिचें नांव कमळाबाई. ही मुलगी मोठी गुणी व सुंदर होती. तिची आई लहानपणींच निवर्तल्यानें बापाचा तिला फार लळा असे. आनंदरावही तिला क्षणभर विसंबत नसे. मल्हारराव होळकर जाट लोकांवर स्वारी करण्यास उत्तर हिंदुस्थानांत जात असतां त्याच्या कुमकेस जाण्याकरितां पेशव्यांनीं आनंदरावास हुकूम दिला. आनंदराव फौज घेऊन निघाला तेव्हां स्वारींत त्याजबरोबर त्याची तरुण व सुंदर कन्या कमळाबाई ही होती.

आनंदराव मल्हाररावास जाऊन मिळाल्यावर त्या दोघांनीं अजमीर शहराजवळ जाट लोकांशीं लढाई केली; त्या लढाईंत मराठ्यांचा पूर्ण पराजय होऊन त्यांच्या फौजेची वाताहत झाली.

या संकटांत आनंदराव घोड्यावर बसून एकटाच रणभूमि सोडून निघाला तो हिंडत हिंडत एका गांवीं गेला. त्या गांवांतील धर्मशाळेंत भरतपूरच्या राजानें आपला वैरी किसनदास या नांवाचा कोटा शहरांतील सावकार यास कैद करून भोंवतीं शिपाई लोकांचा पहारा बसविला होता. आनंदरावास या सावकाराची दया येऊन त्यानें

त्यास युक्तीनें बंदींतून मुक्त केलें. तेव्हां त्या भरतपूरच्या राजानें आनंदरावास पकडून तुरुंगांत टाकिलें. तेथें आनंदरावानें बारा वर्षें हाल सोसून शेवटीं कांहीं युक्तीनें आपली सुटका करून घेतली. नंतर त्यानें आपली मुलगी कमळाबाई हिजबद्दल पुष्कळ शोध केला; परंतु त्यास कांहीं मुलीचा थांग लागेना. मग आनंदराव वैराग्य धारण करून तीर्थयात्रा करीत हिंडूं लागला.

इकडे मल्हारराव होळकर पराजित होऊन रणांगणांतून निघाला तेव्हां त्याबरोबर पन्नास स्वार होते. त्यास जाट लोकांच्या मुलखांतून जावयाचें होतें; आणि ते लोक तर होळकरावर फार संतापले होते. आपण कोण आहों हें त्या लोकांस कळल्यास आपल्या जिवास अपाय होईल अशा भीतीनें होळकरानें आपलें नांव बदलून जगदेवराव पंवार असें नवीन नांव धारण केलें; आणि आपलें खरें नांव माळव्यांत पोंचेपर्यंत कोणींही फोडूं नये अशी जवळच्या लोकांस सक्त ताकीद दिली. एके दिवशीं सायंकाळीं तो एके ठिकाणीं मुक्कामास उतरण्यास प्रवृत्त झाला असतां त्यास कांहीं अंतरावर धुळीचे लोट दृष्टीस पडले. चौकशीं अंतीं त्यास असें कळलें कीं, अरवली पर्वतांतील प्रसिद्ध वाटमाऱ्या भिल्ल बादल यानें मराठी लष्कर लुटलें आणि आनंदराव डफळे याची कन्या कमळाबाई हीस तो धरून नेत आहे. ही बातमी ऐकून मल्हाररावास फार राग आला. त्यानें तत्क्षणीं त्या भिल्लांच्या टोळीवर चाल करून त्यांस पराजित केलें व कमळाबाईची सुटका केली. मल्हारराव कमळाबाईस घेऊन एका गांवीं राहिला. भिल्लांबरोबर झालेल्या लढाईंत त्यास दोन तीन

जखमा झाल्या होत्या त्या बऱ्या होण्यास बरेच दिवस लागले. त्याची अवस्था फार कठिण होती; परंतु कमळाबाईनें त्याची रात्रंदिवस जपून शुश्रूषा केली म्हणूनच तो वांचला.

मल्हारराव व कमळाबाई या दोघांचे स्वभाव व गुण एकत्र सहवासानें परस्परांस कळूं लागून त्या दोघांची परस्परांवर अत्यंत प्रीति बसली. ती प्रीति पुढें लवकरच गांधर्व विवाहानें फलित झाली. कालेंकरून कमलाबाई गर्भवती झाली. एके दिवशीं बरोबर कांहीं लोक घेऊन मल्हारराव चार दिवसांच्या वाटेवर शिकारीस गेला असतां तेथें बाजीरावाकडून आलेल्या दूतांची व त्याची गांठ पडली. बाजीराव त्या कालीं निजामाशीं युद्ध करीत होता. त्यानें ताबडतोब आपणास येऊन मिळण्याबद्दल होळकरास आज्ञा केली होती. ती या दूतांच्या तोंडून ऐकतांच मल्हाररावानें तत्काळ बाजीरावास जाऊन भेटण्याकरितां माळव्यांत जाण्याचा निश्चय केला. त्यानें कमळाबाईस एक पत्र लिहिलें. त्यांत मजकूर असा होता कीं, "हे साध्वी, माझें नांव मल्हारराव होळकर. माझी जात कमी पायरीची असूनही तुझ्या रूपास व गुणांस भुलून मीं आपलें खोटें नांव सांगून तुझ्याशीं विवाह केला; याबद्दल थोर मन करून तूं मला क्षमा कर. तूं आहेस त्याच ठिकाणीं कांहीं दिवस रहा. धन्यानें लढाईवर जाण्याविषयीं आज्ञा केली असतां मराठे सरदार घरादाराच्या मोहानें स्वामीच्या आज्ञा मान्य करण्यास मागें घेत नाहींत. याकरितां माझा धनी बाजीराव याच्या हुकुमानें मी शत्रूशीं युद्ध करण्याकरितां जात आहें. विजयी होऊन लवकरच तुला येऊन भेटेन." हें

पत्र आपल्या एका स्वारा बरोबर कमळाबाईस देण्याकरितां पाठवून मल्हारराव निघून गेला. तो स्वार तें पत्र घेऊन जात असतां भरतपूरच्या राजाच्या शिपायांनीं त्यास पकडून अडकवून ठेविलें.

इकडे कमळाबाईनें पतीची पुष्कळ दिवस मार्गप्रतीक्षा केली. तितक्या काळांत ती तेथें प्रसूत होऊन तीस पुत्र झाला. मग पति परत येत नाहीं असें पाहून ती पुत्रास घेऊन दक्षिणेंत येण्यास निघाली. वाटेंत तिचे फार हाल झाले. जवळच्या चाकरमाणसांनीं तीस हळू हळू सोडून दिलें. शेवटीं ती कोटा शहरास पोंचली असतां तेथें पूर्वीं सांगितलेल्या किसनदास नामक सावकाराची व तिची गांठ पडली. त्यानें पुत्रासह कमळाबाईस आपल्या घरीं ठेवून घेऊन तिचा आपल्या मुलीप्रमाणें सांभाळ केला. कमळाबाईचा पुत्र घरांत आल्या दिवसापासून किसनदासाच्या व्यापाराची खूब भरभराट झाली. म्हणून त्या सावकारानें त्या मुलाचें नांव यशवंतराय असें ठेविलें. यशवंतरायावर किसनदासाची फार प्रीति बसली. यशवंतराय जसा जसा मोठा होऊं लागला तसे तसे त्याचे नवे सद्गुण प्रकट होऊं लागले. किसनदासानें पुष्कळ खर्च करून त्यास उत्तम शिक्षण देवविलें. त्याची शास्त्रविद्येकडे स्वाभाविक मनःप्रवृत्ति असे. यामुळें तो सोळा वर्षांचा होण्यापूर्वींच भाला, बंदूक व तरवार या शस्त्रांचा उपयोग करण्यांत तयार झाला. तो धैर्यवान्, विचारी व दृढनिग्रही असे. त्याची वर्तणूक सर्वदा सभ्य व मनामिळाऊ अशी होती. यामुळें यशवंतराय कोटाशहरांत अत्यंत लोकप्रिय झाला होता. तो रूपानें सुंदर असून त्याचा वर्ण गोरा व आकृति उभार व सुदृढ

अशी असे. किसनदास कालेंकरून मरण पावला त्या वेळीं त्यानें आपली सर्व संपत्ति यशवंतरायास दिली. किसनदासाप्रमाणेंच यशवंतरायही नेकीनें व प्रतिष्ठेनें व्यवहारांत वागत असे. तो सुमारें तेवीस वर्षांचा असतांच कोटा शहराच्या राज्यकारभारांत त्यास मन घालावें लागलें. तो प्रकार असा:—

कोटा प्रांतांत पूर्वीं रजपूत राजे राज्य करीत असत. त्यांस जिंकून दिल्लीच्या बादशहानें तो प्रांत काबीज केला. आम्ही ज्या काळाविषयीं लिहीत आहों त्या वेळीं कोटा शहरांत मोंगलांचा सुभेदार दिल्लिरखान या नांवाचा होता. तो दुर्व्यसनी व लोभी असल्यानें राज्यांत जिकडे तिकडे अंदाधुंदी सुरू झाली. दिल्लिरखानाच्या जुलमास शहरांतील लोक फारच त्रासले.

त्या शहरांत भूषणसिंग या नांवाचा एक प्रतिष्ठित व शूर गृहस्थ रहात होता. याचा जन्म कोटा शहरांत पूर्वीं राज्य करणाऱ्या राजकुलांत झाला होता. या कारणानें त्या शहरांतील लोकांत या गृहस्थाचा मोठा मान असे. या भूषणसिंगाची पत्नी फार सुंदर व पतिव्रता अशी होती. भूषणसिंगास लीलावती व अभयसिंग या नांवांचीं दोन मुलें होतीं. त्या दोघांचें वय अनुक्रमें चौदा व अकरा वर्षांचें होतें. यशवंतरायाचा व भूषणसिंगाचा फार स्नेह होता. यशवंतरायाच्या मनांत लीलावतीबद्दल तिच्या बापाजवळ मागणी घालावयाची होती, आणि भूषणसिंगही यशवंतरायाचें म्हणणें खचीत कबूल करिता.

एके दिवशीं कोटा शहरांत एक मोठा अनर्थ घडून आला. दि-

ल्लिरखानाच्या मर्जीतला कोणी दाऊद म्हणून मनुष्य होता. त्यानें भूषणसिंगाच्या घरांत शिरून त्याच्या बायकोस भ्रष्ट करण्याच्या हेतूनें धरून नेलें. तिनें आपणास सोडण्याविषयीं पुष्कळ विनवण्या केल्या, परंतु तो दुष्ट ऐकेना. शेवटीं तिनें आत्महत्या केली. पत्नीच्या अपमानाचें व मरणाचें वर्तमान ऐकून भूषणसिंग फार दुःखी झाला. त्यानें क्रोधाच्या आवेशांत दाउदास गांठून त्याचा प्राण घेतला. ही बातमी ऐकून दिल्लिरखानानें दाउदाच्या नाशाबद्दल सूड घेण्याकरितां भूषणसिंगाच्या वाड्यावर पांचशें पठाण पाठविले. भूषणसिंगानें आपल्या दोन मुलांस यशवंतरायाच्या स्वाधीन करून त्यास सांगितलें कीं, आतां या अनाथ मुलांचा तूं सांभाळ कर. नंतर त्यानें पठाणांशीं लढाई करून पुष्कळांस जखमी केलें, आणि कित्येकांचे प्राणही घेतले; पण शेवटीं जखमांनीं घायाळ होऊन तो मरून गेला. पठाणांनीं भूषणसिंगाच्या वाड्यांत शिरून लुटालूट केली, व त्या वाड्यास आग लाविली. नंतर ते निर्दय पठाण भूषणसिंगाचें प्रेत रस्त्यानें फरफर ओढीत घेऊन चालले. हें पाहून शहरांत जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. नागरिक लोकांनीं हत्यारबंद होऊन पठाणांवर चाल केली. दोन्ही पक्षांची तुंबळ लढाई कोटा शहरांत भररस्त्यावर सुरू झाली. हें पाहून दिल्लिरखान घाबरला. त्यानें पठाणांस परत बोलाविलें व नागरिक लोकांची कशी तरी समजूत घातली. ते नगरवासी लोक भूषणसिंगाच्या प्रेतास अग्निसात् करून दुःखी होत्साते घरोघर जाते झाले.

या गोष्टी घडून येण्यापूर्वींच त्या शहरांतील पुढारी लोकांनीं मोंग-

त्यांस कोटा प्रांतांतून काढून लावून स्वतंत्र राज्य स्थापावें असा कट केला होता. भूषणसिंगाच्या नाशानें तर या कटास अधिकच बळकटी आली. या कटांत शिरून आपल्या जन्मभूमीची मोंगलांपासून सुटका करावी, आणि भूषणसिंगाच्या नाशाबद्दल सूड उगवावा असा यशवंतरायानें बेत केला. या कामीं कमळाबाईनेंही यशवंतरायास उत्तेजन दिलें. मग तो बंडांत जाऊन मिळाला. बंडवाल्यांनीं त्यास आपला मुख्य नेमिलें; आणि आतां पुढें काय करावें ह्मणून त्यांनीं यशवंतरायास मसलत विचारली. त्यानें आठ दिवसांत मोंगलांबरोबर युद्ध सुरू करण्याची तयारी करण्याबद्दल सर्वांस आज्ञा केली.

यशवंतरायानें राजपुतान्यांतील राजांस मोंगलांविरुद्ध उठण्याबद्दल प्रोत्साहनपर एक पत्र लिहिलें. भूषणसिंगाचीं मुलें पूर्वींच्या राजघराण्यांत जन्मलेलीं, तेव्हां मोंगल कदाचित् या मुलांच्या जिवास अपाय आणितील, या भीतीनें त्यानें लीलावती व अभयसिंग यांस जोधपुरास पाठवून दिलें.

दिल्लिरखानास या बंडाची कुणकूण पूर्वींच कळली होती. या बंडास रजपूत राजांचें आंतून पाठबळ मिळण्याचा संभव आहे, अशी ही त्याची खात्री झाली होती. हें बंड मोडण्याकरितां आपल्या मदतीस फौज पाठवावी म्हणून त्यानें दिल्लीच्या बादशहास विनंती केली होती. बादशहाचें उत्तर आलें कीं, " सांप्रत तुम्हांस मदत करण्याकरितां पाठविण्यास आम्हांजवळ फौज नाहीं. आमचे दोस्त पेशवे सरकार यांचे प्रख्यात सेनापती मल्हारराव होळकर यांस आम्हीं

साठ लक्ष रुपये देऊं करून कोटा शहरांतील लोकांचें बंड मोडण्याकरितां व रजपूत राजांस शासन करून त्यांपासून खंडणी वसूल करण्याकरितां पाठविलें आहे, ते लवकरच कोटयास जाऊन पोंचतील." होळकर आपल्या साह्यास येत आहे असें समजतांच दिल्लिरखानास फार आनंद झाला. होळकर येई तोंपर्यंत कसा तरी कालक्षेप केला पाहिजे, नाहीं तर बंडवाले मध्येंच उठून आपला नाश करितील, या भीतीनें दिल्लिरखानानें यशवंतरायास मोंगलांच्या पक्षाकडे वळविण्याबद्दल पुष्कळ यत्न केला; परंतु तो सफळ झाला नाहीं. मग दिल्लिरखान व दुसरे मुसलमान लोक कोटा शहर सोडून निघून गेले. तेणेंकरून नागरिक लोकांस फार आनंद झाला.

इतक्यांत मल्हारराव प्रचंड सैन्यासह कोटा शहरावर चाल करीत आहे ही बातमी शहरभर पसरली. तेणेंकरून या स्वतंत्रता मिळवूं इच्छिणाऱ्या लोकांचे भीतीनें हातपाय गळाले. यशवंतराय मात्र घाबरला नाहीं. होळकरास परतविण्याकरितां पेशवे सरकारास विनंति करावी, या हेतूनें यशवंतरायानें आपला चतुर व विद्वान् गुरु अनंताचार्य यास आपल्या तर्फे वकील नेमून पुण्यास पाठविलें, नंतर युद्धाच्या तयारीनें तो होळकराची वाट पहात बसला.

मल्हारराव होळकर कोटा शहरापासून कांहीं अंतरावर आल्यानंतर कोटयांतील बातमी काढण्याकरितां बैराग्याच्या वेषानें कांहीं निवडक लोक बरोबर घेऊन कोटा शहरांत शिरला. त्याची व यशवंतरायाची अकस्मात् गांठ पडली. हा आपला शत्रु मल्हारराव होळकर आहे, असें कळलें असूनही यशवंतरायानें उदार मनानें त्यास जाऊं दिलें.

नंतर लवकरच मल्हाररावानें कोटा शहराभोंवतीं आपल्या सैन्याचा गराडा घातला. रजपूत व मराठे यांची रोज युद्धें होत व त्यांत शेंकडों लोक मरत. यशवंतरायानें त्या शहराचें रक्षण इतक्या उत्तम प्रकारें केलें कीं, मराठयांचा कांहीं उपाय चालेना.

दिल्लिरखान मराठयांच्या छावणींत होताच. त्यानें पूर्वीं सांगितलेल्या बादल भिल्लास कांहीं इनाम देऊं करून यशवंतरायास ठार मारण्याकरितां पाठविलें. त्याची व यशवंतरायाची गांठ पडून द्वंद्वयुद्ध झालें. त्यांत तो भिल्ल प्राणास मुकला. मरते वेळीं त्यानें कबूल केलें कीं, मला दिल्लिरखानानें या दुष्कर्मास प्रवृत्त केलें. खानाचा हा दुष्ट स्वभाव पाहून यशवंतराय फार क्रुद्ध झाला. त्यानें त्याच रात्रीं कांहीं विश्वासू माणसें बरोबर घेऊन मराठयांच्या छावणींत प्रवेश केला; आणि दिल्लिरखानाच्या तंबूंत शिरून त्यास ठार मारिलें. हें वर्तमान मराठयांच्या लष्करांत पसरतांच मोठी गडबड उडाली. त्या संधींत यशवंतराय निसटून छावणीबाहेर पडला तो शहरांत सुखरूप पोंहचला.

अनंताचार्य पुण्यास जाऊन पोंचला. सदाशिवरावभाऊचें व होळकराचें वैमनस्य अनंताचार्यास माहीत होतेंच. त्यानें प्रथम सदाशिवरावभाऊस भेटून त्यास सर्व मजकूर कळविला. बाळाजी बाजीराव पेशवे सदाशिवरावाची मसलत प्रायः ऐकत असत. सदाशिवराव अनंताचार्यास अनुकूळ झाल्याबरोबर अनंताचार्याचें काम झालें. पेशव्यांनीं होळकरास हुकूम लिहिला कीं, कोटा शहरासमोरचे मोर्चे उठवून तुम्हीं रजपूत लोकांबरोबर

चाललेली लढाई बंद करावी, व यशवंतरायास त्या प्रांताच्या राजपदावर बसवून तुम्हीं माळव्यांत परत यावें. यशवंतरायाचें हिमतीचें वर्तन पाहून पेशव्यांस फार संतोष झाला, आणि असा मनुष्य आपल्या पदरीं असावा अशी त्यांस इच्छा झाली. यावरून पेशव्यांनीं यशवंतरायास कांहीं जाहगीर प्रांत दिले व आपल्या सैन्यांत सरदारीचें काम प्रसंग पडेल तेव्हां त्यानें करावें असें ठरविलें.

पेशव्यांनीं होळकरास पाठविलेला हुकूम त्यास पोंचण्यापूर्वींच कोटा शहर होळकराच्या ताब्यांत आलें होतें. मराठयांनीं सुरुंग लावून शहराचा तट पाडिला आणि शहरांत प्रवेश केला. आपले रजपूत लोक घेऊन यशवंतरायही निकरानें लढला, परंतु त्याचा उपाय चालला नाहीं.

आतां राजपुतान्यांतून नवी फौज मिळवून पुनः मराठ्यांशीं युद्ध करावें, या हेतूनें यशवंतराय एकटाच कोट्यांतून निघून जोधपूरच्या रस्त्यानें चालला. त्यास धरण्याकरितां होळकरानें कांहीं भिल्ल पाठविले होते, त्यांनीं त्यास धरून पुनः कोटयाकडे चालविलें.

स्वतंत्रतेबद्दल आपण केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ झाले म्हणून दुःखी व निराश झालेला यशवंतराय कोटयास परत जात असतां वाटेनें त्यास एक बैरागी भेटला. त्या बैराग्यानें यशवंतरायाची सर्व हकीकत ऐकून त्यास आश्वासन दिलें कीं, " भिऊं नको. तुला आनंद भेटणार आहे. " भिल्लांनीं यशवंतरायास कोटयास नेऊन होळकरासमोर उभें केलें. त्यानें त्यास अवळच एका राहुटींत रात्रभर ठेवून त्यावर पहारा करण्यास त्याच भिल्लांस सांगितलें.

यशवंतरायास जो बैरागी भेटला म्हणून सांगितलें तो आनंदराव उफळे होय. त्यानें आपला नातू प्राणसंकटांत पडलेला पाहून आपला जुना मित्र मल्हारराव होळकर यास भेटून यशवंतरायाची मुक्तता करण्याविषयीं त्यास प्रार्थना केली. अजमीरच्या लढाईपासून झालेलें आपापलें वृत्त परस्परांनीं परस्परांस सांगतांच मल्हाररावास कळून आलें कीं, यशवंतराय आपला पुत्र होय. मग होळकरानें यशवंतरायाची त्या क्षणीं सुटका करून त्यास आपल्या भेटीस आणिलें. यशवंतरायास आपला पिता व आजा यांची अकल्पित गांठ पडल्याबद्दल अत्यंत हर्ष झाला हें सांगणें नकोच. मग ते तिघे कमळाबाईस जाऊन भेटले. ती रात्र सर्वांसच आनंदाची गेली.

दुसरे दिवशीं अनंताचार्य व पेशव्याकडून होळकराकडे आलेला दूत हे कोटयास येऊन पोंचले. नागरिक लोकांस यशवंतराय आपला राजा होणार हें ऐकून फार आनंद झाला; परंतु यशवंतरायानें कोटयांतील प्रमुख लोकांस एकत्र जमवून त्यांस सांगितलें कीं, येथील राजपद मी स्वीकारीत नाहीं. तें तुम्हीं भूषणसिंगाचा पुत्र अभयसिंग यास द्यावें. यशवंतरायाचा आग्रह पाहून नागरिक लोकांनीं त्याच्या म्हणण्यास रुकार दिला. मग यशवंतरायानें अभयसिंगास जोधपुराहून आणवून सिंहासनावर बसविलें; आणि त्याच्या राज्याचा कारभार कसा चालावा याबद्दल सर्व व्यवस्था केली. मग यशवंतरायाचा व लीलावतीचा विवाह झाला.

या सर्व गोष्टी झाल्यावर मल्हारराव, आनंदराव, कमळाबाई, यशवंतराय व लीलावती यांनीं कोटा शहर सोडिलें. आनंदराव पुनः

तीर्थाटन करण्याकरितां निघाला. मल्हारराव व कमळाबाई माळव्यांत होळकराच्या जहागिरीच्या ठिकाणीं गेलीं. यशवंतराव लीलावतीसह आपल्या जहागिरीच्या ठिकाणीं गेला.

याप्रमाणें या महाकाव्याचें संविधानक आहे. भूषणसिंगाच्या कथेपासून प्रथम सर्गास प्रारंभ होतो. पुढें बंडाची हकीकत व मराठ्यांशीं युद्ध वगैरे कथा क्रमानेंच वर्णिली आहे. यशवंतरायाचा जन्म होण्याच्या पूर्वींची गोष्ट एकोणीस व वीस या दोन सर्गांत आनंदराव व मल्हारराव या दोन पात्रांच्या मुखानें वदविली आहे.

# यशवंतराय महाकाव्य.

## सर्ग पहिला.

इष्टदेवतानमन—उपोद्घात—कोटा-शहराचा इतिहास—दिल्लिरखानाचा जुलूम—भूषणसिंग—त्यांची पत्नी—तिचा छळ व नाश—भूषणसिंगाचें धैर्याचें वर्तन—भूषणसिंग आपला मुलगा अभयसिंग व कन्या लीलावती यांस यशवंतरायाच्या स्वाधीन करितो—भूषणसिंगाचा मृत्यु—पठाणांचे नीच कर्म—त्यांची व कोटा-शहरांतील लोकांची लढाई—दिल्लिरखान नागरिक लोकांची समजूत काढितो—भूषणसिंगाच्या वाड्याची दुर्दशा.

श्लोक.

मी वंदितों तव पदांस भवानि माते ।
दे सच्चरित्र-कथनास्तव बुद्धि मातें ॥
हें मूल मंदमति यास करीं धरावें ।
मार्गास लावुन सुधन्य तुवां करावें ॥ १ ॥
देवी ! भजून तुजला तरले मराठे ।
दुर्वार्य तो स्व-रिपु-सैन्य-समुद्र वाटे ॥
त्यांच्या कथा कथिन हा मम हेतु पूर्ण ।
आलों तुला शरण मी मज पाव तूर्ण ॥ २ ॥
महेश-बंधु जन जे असतील मानी ।
साधूं स्वदेश-हित जे झटती इमानी ॥

औदार्य धैर्य गुण हे प्रिय ज्यांस होती ।
घेवोत ते रसिक मत्कवितेस हातीं ॥ ३ ॥
व्हावें स्वतंत्र. उदया निज राष्ट्र यावें ।
सन्मान्य उच्च-पद ही स्व-जनीं वरावें ॥
आचंद्र-सूर्य निज कीर्ति रहावि मागें ।
ज्यांच्या प्रशस्त मनिं हेतु असाच वागे ॥ ४ ॥
जे संकटीं स्थिर, असे व्रत ज्यांस साचें ।
यत्नें निवारण करूं भय दुर्बलांचें ॥
त्यांच्या कथा सुरस वर्णिन पद्य-रूप ।
देवोत हर्ष रसिकांस त्या अमूप ॥ ५ ॥
वाहे जयाजवळ निर्मळ चंबळेचें ।
पाणी तया पिऊन बाग हजार वांचे ॥
व्यापार लोकसमुदाय जिथील मोठा ।
प्रख्यात तें नगर मालव-देशिं कोटा ॥ ६ ॥
पन्नास कोसभर त्या नगरासभोंती ।
आहेत गांव दृढ दुर्ग पुरें हि मोठीं ॥
प्राचीन काळिं रजपूत नृपाळ होते[1] ।
येथील राज्य करिते बहु शूर होते ॥ ७ ॥
सिंधूदका तरून वानर जेंवि आले ।
लंकेस आक्रमुन नाशुन तुष्ट झाले ॥
सिंधूदका तरून भारतवर्षिं धीट ।

१ यज्ञ करणारे. २ सिंधु नदीच्या उदकास.

येऊन मोंगल करिति तशीच लूट ॥ ८ ॥
लाटा जशा उठति थोर महोदधीच्या ।
त्यांच्या तशा बहु भयंकर मोंगलांच्या ॥
येऊन आदळति या हतभाग्य देशीं ।
कोणी निवारण करूं शकले न त्यांसी ॥ ९ ॥
राज्यें अनेक विलयाप्रत मोंगलांनीं ।
नेलीं अरींस जरि देउन थोर हानी ॥
कोटापुरेश्वर तयांसह फार वर्षें ।
झुंजानि रक्षि निज देश बॅल-प्रकर्षें ॥ १० ॥
विस्तीर्ण राष्ट्र तरि केवळ मोंगलांचें ।
सैन्य प्रचंड जय जोडुन हात नाचे ॥
त्याच्यापुढें चिमुकला रजपूत-देश ।
तो राहिला अजित कीर्ति तया विशेष ॥ ११ ॥
दिल्लीश्वर प्रबळ घेउन सैन्य आला ।
एके प्रसंगिं सहसा करि थोर घाला ॥
मेला तयासह लढून नृपाळ मानी ।
केलें स्वहस्तगत हें पुर मोंगलांनीं ॥ १२ ॥
या प्रांति लोक अतिशूर महाभिमानी ।
अद्यापि दृष्टि पडतील हठी इमानी ॥
हे द्वेषितात परकीय जनां स्वभावें ।
स्वातंत्र्य-रक्षण जिवाहुन यांस ठावें ॥ १३ ॥

१ अतिशय शक्तीनें.

सत्ता स्वकीय नगरामधिं चालवाया ।
दुष्टांस दंडन यथासमयीं कराया ॥
दिल्लीपति स्वजन दिल्लिरखान नेमी ।
होता अयोग्य जरि थोर पदास कामी ॥ १४ ॥
तो दुष्ट न्याय बघुनी न कधींच वागे ।
दावूं जनांस निज उग्र चरित्र लागे ॥
झाला तिथें कहर कोण तयास सांगे ! ।
मानी मनीं जळति सत्कुलवंत रागें ॥ १५ ॥
द्रव्य प्रजेजवळचें लुटण्यास यानें ।
केले जुलूम भलते अधमाधमानें ॥
मेले अनेक अपराध नसून लेश ।
गेले किती पळुन सोडुन गांव देश ॥ १६ ॥
बेश्या तमासगिर नीच धनास पावे ।
जाती सुशील मिळुनी धुळिला स्वभावें ॥
त्यांच्या सभोंति हलका जन नित्य वाढे ।
गेलें बुडोन पुर दुर्व्यसनांत गाढें ॥ १७ ॥
वेश्या-विलास-मदिरा-प्रिय नाच रंग ।
वाड्यांत चालति तयांतच खान दंग ॥
योजून युक्ति विविधा नमवी अनार्य ।
जें वित्त तें खरचुनी करि हेंच कार्य ॥ १८ ॥
दावोनि मोह कुलवंत सती जनातें ।

१ दुष्ट.

ओढी बळें प्रतिदिनीं किति दुष्पंथातें[1] ! ॥
नेल्या स्त्रिया मुलि सुना किति चारुगात्री[2] ! ।
त्यानें स्वयें शिरुन पौरगृहांत[3] रात्रीं ॥ १९ ॥
आप्तेष्ट-बंधु-गृह-वित्त-शिशु-स्त्रियांचा ।
विश्वास न क्षणभरी हि वसे जिवाचा ॥
ऐशा स्थितींत सुख-लेश कसा असावा ! ।
कोण्यामधें सुजन कोंवि सुखें वसावा ! ॥ २० ॥
हा खान जाय विलया[4] कवण्या उपायें ? ।
कैशी पुन्हा निजमना सुख शांतता ये ? ॥
जाऊं कसे तरुन या व्यसनोदधीतें[5] ? ।
हें चिंतिती नगर-वासि-जनांत मोठे ॥ २१ ॥
ज्या नांव भूषण असा जन एक कोणी ।
होता सुखें वसत त्या नगरांत मानी ॥
तो पूर्विच्या नृप-कुलांतच जन्म पावे ।
सन्मान देति रजपूत तया स्वभावें ॥ २२ ॥
त्याची प्रिया गुणवती अतिरम्य मूर्ती ।
लक्ष्मीच काय गृहिं शोभलि त्याचिया ती ॥
न्याया तिला धरुन दाउदखान नामें ।
आला पठाण सरदार मदांध कामें ॥ २३ ॥
होती महालिं बसली सुदती[6] सुखानें ।

---

१ वाईट मार्गास. २ सुंदर आहेत अवयव ज्यांचे अशा. ३ शहरांतील लोकांच्या घरांत. ४ नाशास. ५ संकटरूपी समुद्रास. ६ सुंदर आहेत दंत जीचे अशी.

दोन्ही मुलें जवळ खेळति कौतुकानें ॥
तों दुष्ट दाउद पठाण भटांसमेत ।
घोड्यावरी बसुन गार्दि करीत येत ॥ २४ ॥
द्वारीं बळें घुसुन गर्जति " दीन दीन! " ।
" हाणा धरा ! " ह्मणति हालतसे जमीन ।
नाहीं पती निकट--संकट हें बघून ॥
साध्वी पडे महिस मूर्च्छित फार दीन ॥ २५ ॥
झालें विवर्ण मुख लोळति केश कीर्ण ।
आक्रोश मांडिति मुलें भंवतीं बसून ॥
ती या स्थितींत असतां उचलून नेली ।
दुष्टें, तया न करुणा लव ही उदेली ॥ २६ ॥
साधावया निज मनोरथ कामुकांनीं ।
केली न कोणाति अशी करणी खलांनीं ! ॥
गेले परंतु उलथून बळी उदंड ।
चाले अनाहत सती-जन-कोप-दंड ॥ २७ ॥
ती बापुडी बघुन या हरिणी वृकासी ।
कांपे करी विनवण्या हि महाप्रयासीं ॥
ऐकून त्या नच खळा करुणा शिवे त्या ।
शापी सती करित नंतर आत्म-हत्या ॥ २८ ॥
" अक्षय्य निर्मळ विवाह-भव प्रशस्त ।
जो प्रेम-बंध वसतो मम मत्पतींत ॥

---

१ फिकट. २ अस्ताव्यस्त. ३ प्रतिबंधरहित. ४ साध्वींच्या कोपापासून होणारी शिक्षा. ५ लांडग्यास.

त्यातें तुटातुट करूं छळुनी पहासी ।
तस्मात्सबांधव सवंश लयास जासी ! " ॥ २९ ॥
जेव्हां तिच्या पतिस वृत्त कळून आलें ।
तो शोक फार करि दुःसह दुःख झालें ॥
" स्त्री-रत्न तूं सकल-सद्गुणरम्यखाणी ।
नाहीं च लाभलिस कीं मजला शिराणी ! ॥ ३० ॥
संतोषवीत सुख देत जना स्वकीय ।
सन्मार्ग-वर्तन तुझें भुवनीं अनिंद्य ॥
नाहीं असें बघवलें नयनीं खळांतें ! ।
ही दुर्दशा अशि घडे ह्मणुनीच तूतें ॥ ३१ ॥
आतां मला न सुख-लेश जगीं मिळेल ।
ध्यायास सूड मम देह सदा जळेल ॥
साध्वी ! तुझें चरित निर्मळ मालवून ।
शोकांधकारिं मन दाउद लोटि जाण ! ॥ ३२ ॥
तत्कंठ-नाळ जरि मी न चिरीन आजी ।
माता मला प्रसवली तरि व्यर्थ माझी ! ॥
माझा हि जन्म रजपूत-कुळांत व्यर्थ ! ।
होईन सिद्ध मरण्यास सखे ! त्वदर्थ ! " ॥ ३३ ॥
प्राचीन-भूप-कुल-तंतु जरी लहान ।
साहेल काय खल-दत्त निजापमान ? ॥
कोपें जळे स्थिर नसे मन एक ठायां ।

१ प्रीतीची. २ प्राचीन काळच्या राजवंशांत उत्पन्न झालेला भूषणसिंग.

तो शूर भूषण उठे मग सूड घ्याया ॥ ३४ ॥
घेऊन मित्र मग गांठित दाउदास ।
रात्रौं गृहांतरिं शिरून जयी उदास ॥
झाली चकामक भयंकर त्यांत मेला ।
दाऊद, भूषण जयी स्वगृहास गेला ॥ ३५ ॥
वृत्तांत हा कथित दाउद-सेवकांनीं ।
कीं सर्पसाच उठला परिसून कानीं ॥
आरक्त नेत्र करि चावुन ओंठ दांत ।
कोपें जळे कुमति दिल्लिर तो अलोट ॥ ३६ ॥
बोलावुनी जवळ पांच शतें पठाण ।
आज्ञा तयांस करि निष्ठुर फार खान ॥
"जा. भूषणा त्वरित येथ धरून आणा. ।
झाणा. घरा. लुटुन घ्या. न भयास माना." ॥ ३७ ॥
हें वृत्त ऐकुन न भूषण लेश भ्याला ।
बोलावुनी जवळ नागरिकां[1] झणाला ॥
"बैसा तुम्हीं घरिं खुशाल असा समस्त ॥
न प्राण-हानि कवणाहि घडो मदर्थ" ॥ ३८ ॥
लीलवती अभयसिंग जयांस नांवें ।
तीं बालकें बघुन भूषण दुःख पावे ॥
मातापिता कवण होइल यांस आतां ? ।
सांभाळ कोण जपुनी करि या अनाथां ? ॥ ३९ ॥

---

[1] कोटा-शहरांतील लोकांस.

तन्मित्र जो नगरिं त्या यशवंतराव ।
होता धनाढ्य गुणवंत महाप्रभाव ॥
त्या हांक मारुन वदे "सखया ! मुलांतें ।
सांभाळ यां कर दया धर यांस हातें ॥ ४० ॥
हें जों घडे तंव पठाण समीप येती ।
ज्यांतें स्मरून च मनीं रिपु घेति भीति ॥
भ्याला न त्यांस रजपूत न मृत्युलाही ।
द्वारीं हत्यार पडताळुन धीट राही ॥ ४१ ॥
विश्वासु सेवक सशस्त्र उभे सभोंतीं ।
स्व-स्वामि-रक्षणिं लढून च जीव देती ॥
लागून वार मग भूषण ही निमाला ।
गेला असा सुजन शेवट घोर झाला ! ॥ ४२ ॥
हर्षेंकरून मग गर्जति 'दीन दीन ! ' ।
वाड्यांत त्या शिरति मत्त जयें पठाण ॥
फोडून तोडुन लुटून गृहास आग ।
ते लाविती धरिति थोर मनांत राग ॥ ४३ ॥
होता जिवंत जंव भूषण त्या बघून ।
होते भयें यवन घालित खालिं मान ॥
आतां अचेतन बघून शरीर तेंच ।
हे ओढिती फरफरा किति कर्म नीच ! ॥ ४४ ॥
अत्यंत शोक-कर भूषण नागराची ।
ही दुर्दशा बघुन सद्गुण-सागराची ॥

आबालवृद्ध जन होति समस्त कष्टी ।
उच्चस्वरें रडति वर्षति अश्रुवृष्टी ॥ ४५ ॥
संतापती कितिक मानधनोग्रवीर्य[1] ।
आवेश एकदम त्यांत भरे अवार्य ॥
जें सांपडे धरुन तेंच हत्यार हातीं ।
शें दोनशें प्रथम त्यांतुन घांव घेती ॥ ४६ ॥
द्वेषाग्नि जो धुमसत प्रतिनागराच्या ।
होता मनीं स्मरुन दुष्कृति मोंगलांच्या ॥
तो पेटला सहज आज तदा अनर्थ ।
कोटयांत होय करणार अनेक घात ॥ ४७ ॥
तें कांपले थरथरा भय-भीत भीरु ।
विघ्नांतुनी म्हणति ईश्वर आजि तारू ॥
आले गृहांतुन परी रणशूर वारू ।
शत्रूंस, बोलति " मरूं परि आज मारूं ! " ॥ ४८ ।
व्यापारि लाविति भयें सहसा दुकानें ।
होणार काय पुढची स्थिति कोण जाणे ! ॥
श्रीमंत ठेविति सुसेवक शस्त्र-पाणी[2] ।
द्वारीं, उभे सदन[3] रक्षिति ते इमानी ॥ ४९ ॥
स्त्री बोलली पतिस " मार पठाण सारे ! ।
साहित्य सांग करण्यास मला सख्यारे ! ॥
बंदूक देइन भरून तुझी कटयार ।

१ अभिमानी आणि पराक्रमी. २ हातांत हत्यार घेतलेले. ३ घर.

आणीन. सांग. तुज काय रुचे हत्यार ! " ॥ ५० ॥
हा रोध पाहुन हठा पडले पठाण ।
एकेक पाउल हि देति न ते जमीन ॥
जावो न यांतिल जिवंत घरास एक ।
या निश्चयें लढति ते रजपूत लोक ॥ ५१ ॥
न्हाले रक्त[1]-जलें भलें करूनियां झाले श्रमी भांडण ।
घाले तोडुन हातपाय हृदयीं भ्याले न एक क्षण ॥
अंगोरीं तृणसे पठाण पडले भंगास ते पावुन ।
दंगा ऐकुन दंग खान उठला संभ्रांत[2] रंगांतुन ॥ ५२ ॥
दंडाया मी पुर-जन जरी हेतु आतां धरीन ।
ऐशा काळीं तरि निजकरें नाश माझा करीन ॥
ऐसें आणी मनिं, विनवुनी धाडि तो पौरं[4] मागें ।
रागें लोकां परत अपुल्या खान जायास सांगे ॥ ५३ ॥
स्मशानिं मग नेउनी सदय-भूषण-प्रेत ते ।
मनांत अतिगौरवा धरून जाहले जाळिते ॥
" असा पुरुष आपणांमधुन आज गेला दुर ! " ।
असें म्हणत तद्गुणां स्मरति लोक शोकातुर ॥ ५४ ॥
होते पाहुणचार घेत जिथला सन्मार्ग-गामी जन ।
दुःखी दीन अनाथ भूषण-करें पावून गेले धन ॥
लक्ष्मी, सद्गुण, सद्विचार, सुख, सत्कांता जिथे नांदली ।
होता भूषण भूषवीत भवनां[5] भूषाच[6] भू-मंडलीं ॥ ५५ ॥

---

१ रक्त हेंच पाणी यानें. २ भ्रांत. ३ घाबरलेला. ४ कोटा-शहरांतील लोक. ५ गृहास. ६ अलंकार.

अन्यायें अपराधहीन जन ही मृत्यू जिथे पावले ।
त्यांचें रक्त पवित्र दुष्ट यवनीं कीं ज्या स्थळीं शिंपिलें ॥
वाडा तो पडला परंतु तिथल्या खाणाखुणा राहती ।
पांथांतें[1] जन नागरीक अजुनी दुःखें करें दाविती ॥ ५६ ॥
जे या जगीं सतत पापभया धरीती ।
सन्मार्ग आचरिति दुःख परां न देती ॥
या लोकिं त्यांस सुख शांति सदा मिळेल ।
हें कोण भूषण-गती बघुनी म्हणेल ? ॥ ५७ ॥

---

१ वाटसरू लोकांस.

## सर्ग दुसरा.

सूर्यास्त–सायंकाळच्या शोभेचें वर्णन-यशवंतराय–त्याची पूर्वींची हकीकत–शहरांतील लोकांचें पत्र–यशवंतरायाचे विचार–माता आणि पुत्र–कमळाबाई यशवंतरायास धीर देते–कमळाबाई वियुक्त पतीचें स्मरण करून दुःख करिते–यशवंतराय तिचें समाधान करितो.

श्लोक.

[ वसंततिलका. ]

साम्राज्य भू–जलनिधींवर चालवून ।
अंधार हाच रिपु या दुर घालवून ॥
चंडप्रताप[1] भगवान् दिनराज[2] चाले ।
अस्ता, सवें किरण सेवक ही निघाले ॥ १ ॥
अस्तास जाय निजनायक हें बघून ।
भू-मंडळावरून वृक्षशिरीं तिथून ॥
हे उंच डोंगरिं गिरींवर राहताती ।
तेथून सूर्यकिरण क्षणिं नष्ट होती ॥ २ ॥
अर्घ्य-प्रदान दिधलें नियमें द्विजांनीं ।
संध्येंत भक्ति–रस–पूरित–मानसांनीं ॥
पाथेय[3] तें क्षितिज–मंडल–वासि घेतो ।
लोकांतरास मग सिद्ध रवी निघे तो ॥ ३ ॥
होता नभीं तपत जोंवरि सूर्यकांत ।

१ महातेजस्वी, २ सूर्य. ३ वाटेची सामग्री.

दिव्य प्रभा धरुन शोभत *वस्तुजात ॥
काल—क्रमें बघुन अस्त—गता तयास ।
शोकें जणों विकल सृष्टि दिसे उदास ॥ ४ ॥
अस्ता प्रताप-निधि भास्कर जात आहे ।
हें विस्मयें जग चराचर पाहताहे ॥
येतां समीप तम भीति—भरें समस्त ।
झाडें नद्या गिरि—शिरें दिसती तटस्थ ! ॥ ५ ॥
आकाश हें विमल नील छतासमान ।
त्या झालरीसम कडेवरि पिंगवर्ण ॥
कांहीं स्थळीं मलिन त्यावरि मेघ दाटे ।
नक्षत्र-दीप-शत-कज्जल-पुंज वाटे ॥ ६ ॥
सूर्यांशुनीं निबिड दुर्गम काननांत ।
होता दिला हटवुनी गिरि-गव्हरांत ॥
तो अंधकार निज सोडुन आश्रयातें ।
धैर्यें पुढें सरुन आक्रमितो जगातें ॥ ७ ॥
गेल्या सकाळिच वनांत चरावयास ।
त्या धेनु धांवति गृहाप्रत यावयास ॥
सप्रेम वत्स ह्रदयामधिं आठवीती ।
पान्हा फुटे स्वपय भूमिस ओपिताती ॥ ८ ॥
चारा धरून वदनांत विहंग-जाती ।

* सर्ववस्तु. १ शेंकडों नक्षत्रें हेच आकाशांतील दीप यांपासून उत्पन्न झालेल्या काजळाचा समुदाय. २ पर्वतांच्या गुहांत. ३ नानापक्षी.

अत्यंत उत्सुक जवें घरट्यांस जाती ॥
" चीं चीं " पिलें करिति पाहुन एकदांची ।
माया पिलांवर किती तरि पांखरांची ! ॥ ९ ॥
नेणोनि ऊन अणि भूक तहान यांतें ।
काबाडकष्ट करितात धन्यासवें ते ॥
शांत स्वभाव हितकारि नरास मोठे ।
या वेळिं बैल जवळी करितात गोठे ॥ १० ॥
घोड्यांवरी किति पदीं किति गाडियांत ।
चालोनि लांबवर मार्ग निज क्रमीत ॥
विश्रांति अन्नउदका मिळवावयाला ।
पांथस्त शोधिति उताविळ धर्मशाळा ॥ ११ ॥
भाजी फुलें फळफळावळ जे पदार्थ ।
होते अनेक बसले दिवसा विकीत ॥
झाली कशी विकरि होय नफा कशानें ।
जाती घरा पुसत लावुनियां दुकानें ॥ १२ ॥
काश्मीर, दिल्लि, मथुरा अणि नागपूर ।
अन्यस्थळांहुनहि येति लमाण फार ।
तो माल सांठवुन शोभति त्या वखारी ॥
दाटी जमे गजबजाट नभा विदारी ॥ १३ ॥
गंभीर शब्द करूनी करि लोक जागे ।
व्हाया तयां स्वहित-तत्पर नित्य सांगे ॥

---

१ वेगानें.

तो चौघडा झडतसे सुर-मंदिरांत ।
जो लांब दूरवर ही श्रवणांत येत ॥ १४ ॥
आनंद-शोक-भय-दु:ख-सुखीं वसेना ।
कोण्या स्थितींत हि मनुष्य जगीं असेना ॥
हृद्भाव[1]–हारि करुणा–रस मिश्र फार ।
ऐकेल तो सनइचे अति गोड सूर ॥ १५ ॥
होता तया नगरिं राजपथीं अफाट ।
वाडा प्रचंड मजबूत जसें कपाट ॥
सोई सुखास्तव विराजति जेथ नाना ।
होता तिथे बहुत भव्य दिवाणखाना ॥ १६ ॥
तेथें असे पुरुष एक बळी विशाळ ।
लोडास टेंकुन, गमे नव्हता खुशाल ॥
गंभीर सुंदर दयाळु दिसे स्वभावें ।
आकृष्ट पाहुनच तन्मुख चित्त व्हावें ॥ १७ ॥
रम्याकृती नयन सुंदर थोर काळे ।
ज्यांतून तेज भंवतें बघतां झळाळे ॥
बाहू बळी सरळ नाक कपाळ थोर ।
छाती विशाळ विलसे तनु-वर्ण गौर ॥ १८ ॥
हा आपुला चरित–नायक सुस्वभाव ।
संमानिला पुरजनीं यशवंतराव ।
हा कोण कोठिल असा इतिहास सारा ॥

---

१ मनोवेधक.

मी सांगतों परि न फार करीं पसारा ॥ १९ ॥
कोटयामधें किसनदास पवित्रचित्त ॥
होता महाजन सुखें वसती करीत ॥
संपत्ति होय अनुकूल तयास भारी ।
आयुष्य घालवि झिजून परोकारीं ॥ २० ॥
एके दिनीं बघत तो अतिरूपवंत ।
स्त्री एक दीन बहु राजपथांत जात ॥
शोकें जिचें वदन विव्हळ काळजीनें ।
केला प्रवास गमले बहुकाळ जीनें ॥ २१ ॥
मागून डोलकर चार धरीति डोळी ।
माथां, हळू हळु गती मधिं चालवीली ॥
स्वच्छंद हांसत सुरम्य तयांत बाळ ।
ज्या बापुड्या न कळला सुख-दुःख-काळ ॥ २२ ॥
मल्हार होळकर घेउन सैन्य चंडें ।
त्या देशि येउन बळीं बसवीत खंड ॥
गांठून त्यास अजमीर पुरासमीप ।
युद्धांमधें विजय पावति जाट भूप ॥ २३ ॥
झाली पळापळ तदा बहु लोक आले ।
कोटापुरीं अभय तेथ तयां मिळाले ॥
रस्त्यांत दीन बलहीन पडून मेले ।
जाटीं कितीक लुटिले हि धरून नेले ॥ २४ ॥

---



१ भयंकर.

होता असें समजुनी मनिं सावकार ।
झालें कृपार्द्र मन पाहुन तीस फार ॥
जीतें न ठाउक तिरीप कधीं उन्हाची ।
स्त्री थोर संकटिं असे पडली कुणाची ॥ २५ ॥
बोलावुनी जवळ तो वदला तियेला ।
" वत्से प्रसंग बहु दुर्धर हा उदेला ! " ॥
निःशंक तूं वस गृहीं मम दुःख टाकीं ।
बैसूं नको गहन–शोक–नदी–तटाकीं ॥ २६ ॥
कोणाचि ही असशि तूं लडिवाळ कन्या ।
कोणाहि तूं वरियलें असशील धन्या ॥
जन्में विराजित असो भलता हि देश ।
संगोपनीं तव उणें न करीन लेश ॥ २७ ॥
युद्धांत या बहुत लोक विपत्ति पावे ।
इच्छा अशी मजसिं सर्व सुखी असावे ॥
एकास देउं तरि मी शकलों विसावा ।
हा श्लाघ्य योग्य अभिमान मला असावा ॥ २८ ॥
नाहींच मूल घरिं यास्तव सर्व भासे ।
माझ्या मना गृह उदास अरण्य जैसें ॥
मातें सुलक्षण तुझा शिशु लाडका हो ।
वाढून तो निजशिरीं मम भार वाहो ! " ॥ २९ ॥
ऐसें वदोन तिजला मग जाय सांगे ।

१ शोकरूपीं नदीच्या तीरावर. २ पुत्र.

पत्नीस जी स्वपतिच्या वचनांत वागे ॥
कन्या तुला सुखद नातु असा मिळाला ।
ईश-प्रसादच अम्हांवर आज झाला ॥ ३० ॥
होता प्रसिद्ध सरदार मराठियांत ।
आनंदराव इफळे सुगुणी सुजात ॥
होऊं सहाय भट[1] होळकरा निघाला ।
तो नर्मदा तरून उत्तर देशिं गेला ॥ ३१ ॥
त्याची सुलक्षण सुता कमला हठानें ।
गेली सवें समर-वीक्षणे[2]-कौतुकानें ॥
तीचें कधीं न वच वत्सल तात मोडी ।
माता नसे समजुनी पुरवीत कोडी ॥ ३२ ॥
होतां पराजय पळे मग सैन्य सारें ।
कंठी प्रवास कमलाहि सुदुःख-भारें ॥
सोडोनि नूतन विवाहित कांत गेला ।
झाली तुटातुट पिता हि दिसे न तीला ! ॥ ३३ ॥
वीरात्मजा[3] न ढळली लव संकटांत ।
होते हि चाकर सवें क्रमणार पंथ ॥
पुत्राचिया न चवथा महिना वयाला ।
वाटेंत कष्ट तिस वास्तव फार झाला ॥ ३४ ॥
त्रासून या समयिं सोडिति भृत्य[4]-वर्ग ।

१ योद्धा. २ लढाई पाहण्याच्या इच्छेनें. ३ शूर पुरुषाची कन्या.
४ चाकर लोक.

गेले त्वरें धरुन दक्षिण-देश-मार्ग ॥
संपत्तिचें सकळ खेळ जगत्प्रचारीं ।
क्लेशांत कोण हि कुणास न कीं विचारी ॥ ३५ ॥
देशांत दिल्लिपतिच्या लपले मराठे ।
कोटापुरीं म्हणून आश्रय साध्य वाटे ॥
ती शेवटीं किसनदास-गृहास पात्रे ।
बाळासवें तदुपकार-भरें सुखावे ॥ ३६ ॥
पुत्रावरी किसन आवड फार दावी ।
त्या नाम सुंदर असें यशवंत ठेवी ॥
तो वाढ घे हळु हळू शशिसें समान ।
आशांस ही जननिच्या करि वर्धमान ॥ ३७ ॥
त्या काळिं शिक्षण म्हणून अवश्य होतें ।
पुत्रास थोर सरदार-कुळांत जें तें ॥
पात्रे परंतु यशवंत विशेष दावी ।
शास्त्रीं स्वभाव-रुचि[1] वीर बलाढ्य भावी[2] ॥ ३८ ॥
व्यासंग फार करि बालक संस्कृतांत ।
झाला प्रवीण बहु गायन-वादनांत ॥
घोड्यावरी बसुन नेम निशाण मारी ।
कुस्ती करी चपल दावित शक्ति भारी ॥ ३९ ॥
शास्त्रें पुराण इतिहास-कथा समस्त ।
या होति माहित जुन्या बखरी अनंत ॥

१ मूळची आवड. २ पुढें होणारा.

चौपाटि तो फिरवि खेळत दांडपट्टा ।
मारी निशाण न करूनहि यत्न मोठा ॥ ४० ॥

त्याच्या वयास जंव षोडश वर्ष लागे ।
तों हा शिपाइ सरदार जनांत वागे ॥
ये प्रीति तो सतत साहस संकटांत ।
ये तेज तें सहज जन्म जया कुळांत ॥ ४१ ॥

होती विलक्षण कुशाग्र-समान बुद्धी ।
व्यासंग–योग तिस होउन होय वृद्धी ॥
ज्या ज्या कलांत किसनें गुरू आणवीले ।
त्या त्या कला स्व-वश हा करि अल्प-काळें ॥ ४२ ॥

झाले सुपुष्ट बलशालि विशाल दंड ।
विस्तार छातिसहि मान भरे उदंड ॥
झालें तयार जणु चित्रच तें शरीर ।
आस्था धरून करितां श्रम नित्य फार ॥ ४३ ॥

लोकांमधें मजसिं मान कसा मिळेल ।
लक्ष्मी तिची बहिण कीर्ति कशी वळेल ॥
चिंतेस या उगम होय सर्व जयाच्या ।
तारुण्य लागत मुखीं उमलों तयाच्या ॥ ४४ ॥

नाहीं ठिकाण जनका न पतीस कोठें ।
नावें स्वदेशि न असें कमलेस वाटे ॥
कीर्ती वरील गमलें यशवंत हातें ।
आशा धरी विधि असो अनुकूळ यातें ॥ ४५ ॥

जाती सुखी असुखि सर्वच लोक जेथ ।
स्वीकारि तो किसन सज्जन मृत्यु-पंथ ॥
ओपोनि सर्व हि धनें यशवंत-हस्तीं ।
त्यांची प्रिया सहगती[1] करी पुण्य-मूर्ती ॥ ४६ ॥
आयुःपथीं[2] किसनदास करी प्रचार ।
त्या रीतिनें धरि तिला यशवंत धीर ॥
या कारणास्तव न कोणि तयास निंदी ।
गायास तद्गुण-गणां जन होति बंदी ॥ ४७ ॥
तो हा पहा गढुन जाय महा विचारीं ।
सत्पत्र एक दिसतें पडलें पुढारीं ॥
तें घे करें मधुन वाचुन टाकि खालीं ।
सोडी सुदीर्घ सुसकार फिरे महालीं ॥ ४८ ॥
बोले मधेंच कमला-सुत आपणाशीं ।
पाहे बघे निरखुनी मग आसपाशीं ॥
पत्रांत काय मनकूर असे लिहीला ? ।
ज्यानें गढूळ यशवंत-समुद्र केला ॥ ४९ ॥
" श्रीमंत सद्गुण-निधी यशवंत राया ।
विज्ञापिती तुजसि लोक पुरांतले या ॥
तें जाणण्यास्तव तुवां निजचित्त द्यावें ।
वाटेल जें विहित तें मग आचरावें ॥ ५० ॥
साहूं शकों छळ न मोंगल दुर्जनांचा ।

---

१ सती जाणें. २ आयुष्य हाच मार्ग यांत.

विश्वास जीवित-धनीं न धरों पळाचा ॥
त्रासे म्हणों म्हणुन बंड उभें करावें ।
जावें मरून परतंत्र कधीं नसावें ॥ ५१ ॥

नी आज भूषण-गती अमुची उद्यां ती ।
झाले अनावर न मोंगल सौख्य देती ॥
सर्वस्व जाउन सुखा मुकली प्रजा ही ।
गेला स्वदेश परकीय-करांत पाहीं ॥ ५२ ॥

दे साह्य, ये म्हणुनि आमुचिया कटांत ।
आम्हीं जिवावर असों उठले समस्त ॥
तूं शूर साहसि कृतज्ञ महानुभाव ।
वाखाणिती नगरवासि तुझा स्वभाव ॥ ५३ ॥

हें पत्र यास्तव लिहूं शकलों उदारा ! ।
तूतें, तुझा भरंवसाचि अम्हांस सारा ॥
दे सूचना जरि न हें तुजला रुचेल ।
वागूं तसे मग उपाय जसा सुचेल ॥ ५४ ॥

जाऊं समस्त जन दोहनसिंग-गेहीं ।
ये मध्यरात्रिस करूं मग चिंतना ही ॥
सर्वस्व नाशुन हि देश करीन मुक्त ।
ऐशी जरी तुजसि हिंमत येइ तेथ " ॥ ५५ ॥

होताच भूषण-वधें खवळून गेला ।
हें पत्र पाहुन मनांत असे म्हणाला— ॥
" मी आजपासुन करीन अनेक यत्न ।

आणीन सोडवुन सुप्रिय देश-रत्न ॥ ५६ ॥
झाले न काय विजयी समरीं मराठे ? ।
जाईन मी तरून जाउन त्याच वाटे ॥
जिंकी न काय यवनां भट बाजिराय ! ।
मी यत्न ही जरि करीन अशक्य काय ? ॥ ५७ ॥
गेली प्रजा पिळुन देश धुळी मिळाला ! ।
हा दुर्मती मुसलमान छळी अम्हांला ॥
पाहोनि हें मन कसे करपून जातें ! ।
घ्यावा यथेच्छ तरि सूड मनांत येतें ॥ ५८ ॥
हा भूषणा ! प्रियसख्या ! किति तूं उदार ! ।
कोटयास भूषण च तूं अतिरम्य शूर ॥
घेईन सूड जरि मी न तुझ्या वधाचा ।
माझा जगीं जगुनिया पुरुषार्थ कैंचा ? ॥ ५९ ॥
हा हा ! परंतु फिरली जरि दैव-सत्ता ।
होईल कोंवि तरि नेणतसें अवस्था ॥
प्राणा मुकेन धन होइल रांज-दाय[1] ।
भीतों न यास—परि माय करील काय ? ॥ ६० ॥
पाहे विहंग गगन-स्थित लांब देश ।
तैसा विचार धरि धांव न शांति लेश ॥
आवेश आस भय हर्ष असे विकार ।
होती मनीं वदानें बिंबित दीसणार ॥ ६१ ॥

---

१ राजाचा भाग.

माता प्रवेश इतक्यांत करी महालीं ।
साध्याच शुभ्र परि जी वसनास ल्याली ॥
गोरा सुवर्ण न सुवर्णन होय ज्याचें ।
आकार उंच मुख वर्तुळ रम्य तीचें ॥ ६२ ॥
होतें जरी तिजसि वर्ष न चाळिसावें ।
दुःखें उतार वय तीस परी दिसावें ॥
साध्वी सुशील कमला यशवंत–माता ।
प्रेमें वदे बहु सचिंत सुता पहातां ॥ ६३ ॥
" बाळा ! असा करिसि तो कसला विचार ? ।
चिंता कशास्तव ? उदासपणा हि फार ॥
ये सांग बैस जवळी यशवंतराया ।
सांगेन युक्ति कुशली[1] तुजला कराया ॥ ६४ ॥
बाळा असेल जरि जीव तुझा खुशाल ।
अत्यंत सौख्य मन होइल सर्वकाळ ॥
भोगीन हाल विसरेन हि दुःख–जाळ ।
राहीन ठेविल जसें प्रभु तो दयाळ " ॥ ६५ ॥
तो बोलला—" हुसकुनी यवनां यमांतें ।
द्याया करीति कट बाह्मति लोक मातें ॥
मी वीर-पुत्र असल्या बिकट प्रसंगीं ।
राहूं सुखें घरिं बसून कसा पलंगीं ? ॥ ६६ ॥
तूं बोलसी मम पिता अति शूर होता ।

---

[1] खुशाल.

संग्रामसिंह निजशत्रुस भीति देता ॥
मागें सरेल तरि हा सुत कां तयाचा ? ।
या बोलिं कां न अभिलाष धरी यशाचा ? ॥ ६७ ॥
धिक्कारुनी सकळ ऐहिक जाण सौख्य ।
माते ! रणीं मरण जें गणितात मुख्य ॥
तें प्राप्त या जरि तुझ्याच सुतास झालें ।
व्हावें कसें मग तुला ? मनिं हेंच आलें " ॥ ६८ ॥
दावी तदा जननिला यशवंत पत्र ।
कीं पौर ज्यांत करूं इच्छिति शत्रु–सत्र ॥
बोले तदा मधुर ती कमला स्वरानें ।
आनंदजा पुसुनि अश्रु-जला करानें ॥ ६९ ॥
" मी वीर-दार म्हणवीं आणि वीर-कन्या ।
झालें तुझ्यासम सुता प्रसवून धन्या ॥
निश्चिंत जा कर सुखी तव देश-बंधू ।
मीं वारिलें म्हणुन लोक मला न निंदू ! ॥ ७० ॥
जन्मास जे भुवनिं वीर-कुळांत येती ।
त्यां स्वस्थता घरिं बसून कुठून ये ती ? ॥
कर्तव्य साधु-जन-संमत तें तयांचें ।
लोकोपकार–सुख–रक्षण पाहण्याचें ॥ ७१ ॥
माझी किमर्थ करितोस बसून चिंता ।
संतान तूं मम असें निज–शत्रु–हंता ॥

---

१ लढाईत सिंहासारखा पराक्रमी. २ शत्रूंचा होम ( शत्रूंचा वध. )

आम्हीं मुली न इफळे—कुळिच्या अजाण ।
या संकटा सुविषमास मनांत आण ।। ७२ ।।
जाईल कीर्ति करूनी जरि बाळ माझा ।
लावून नश्वर[1] शरीर अशाच काजा ।।
नेलें न जोंवरि औचित्य सुखांत काळें ।
तत्कीर्ति-देह बघुनी निववीन डोळे ।। ७३ ।।
येतां वयांत धरिता कुल-पद्धती तें ।
तूं पुत्र भूषण विराजसि सत्कुलातें ।।
नाहीं पिता जवळ हें तव पाहण्यास ।
आयास फार घडती म्हणुनी जिवास " ।। ७४ ।।
हें बोलतां वचन सद्गद कंठ झाला ।
अश्रु-प्रवाह नयनांतुन थोर आला ।।
तेव्हां रडे सुत हि बोलतसे तियेला ।
" तूं व्यर्थ शोक-गहनीं बुडसी कशाला ? ।। ७५ ।।
येईल तो सुदिन भेट यदा पित्याची ।
होईल हीच मम धांव असे मनाची ।।
जे वायु—वेग—वश मेघ दिगंतरास ।
गेले न काय मिळतात परस्परांस ? ।। ७६ ।।
मी काल रात्रि निजलों असतां प्रभातीं ।
स्वप्नीं पिता बघितला मम दिव्य-कांति ।।
आलिंगुनी मजसि आश्वसनास देई ।

---

1 नाशवंत.

तूतें हि पाहुन सद्गद-कंठ होई ॥ ७७ ॥
बोले ' असें घडविलें हतं-दैव-योगें ।
व्हावा अम्हां विरह काय उपाय सांगें ? ॥
राहल जीव मम जोंवरि या शरीरीं ।
दोघां तुम्हां त्यजुन जाइन मी न दूरी ' ॥ ७८ ॥
आशांकुरोद्भवन जें हृदयांत झालें ।
येईल काय तरि सफळ त्यास काळें ॥
कां तें न येइल ? जरी परमेश्वराची ।
इच्छा असेल तसली करुणाकराची ॥ ७९ ॥
दुःखें न काय मम मानस याच पोळे ।
दैवापुढें परि न कांहिं उपाय चाले ॥
दीर्घ-स्वरें तुज न दुःख असो म्हणून ।
एकांति बैसुन किती रडलों असेन ? ॥ ८० ॥
तूं देसि धीर मम केवळ धीट आई ।
तेणेंचि निश्चित जयीं मम चित्त होई ॥
माझा परंतु असता जरि बाप येथ ।
तो दाविता सरळ एकचि नीट पंथ ॥ ८१ ॥
कर्तव्य-कर्म-करणीं उपदेश-कर्ता ।
येतां महव्यसेंन तारुन पार नेता ॥
तो एक देउं शकणार असाध्य अर्थ ।
तस्मात् पिता न नरि सर्व असून व्यर्थ ! " ॥ ८२ ॥

---

१ दुर्दैवानें. २ घोर संकट.

सुंमहित कमला ती निर्मलानर्घ्य–शील ।
सदय–हृदय तीचा श्लाघ्य विख्यात बाळ ॥
करिति विविध गोष्टी या प्रकारें विचित्र ।
स्मरून गत–कथा तों जाहली मध्य–रात्र ॥ ८३ ॥
नर खग मृग घेती शांत निद्रा सुखाची ।
किरकिर सुरू झाली रात्रि–कीट–स्वरांची ॥
दुमदुमत नगारा जाहला थोर कर्णा ।
ध्वनि हळुहळु येतां तोषवी प्राणि–कर्णां ॥ ८४ ॥

---

१ सन्मान्य.

## सर्ग तिसरा.

यशवंतराय दोहनसिंगाच्या घरास जाण्याकरितां निघतो—मध्यरात्रीचें वर्णन—दोहनसिंगाचें भाषण—रजपूत लोक यशवंतरायास आपणांमध्यें मुख्य नेमितात—यशवंतरायाचें भाषण—बंडाची तयारी—आठ दिवसांत मोंगलांशीं युद्ध सुरू करण्याची तयारी करण्यास यशवंतराय कोष्ट्यांतील लोकांस हुकूम करितो.

### श्लोक.

मातृ–पाद यशवंत नमोनि घे । धीट दोहन–गृहास तदा निघे ॥
हो नयी कुशल–संयुत बाळका! । ती वदे स्मर चराचर–पाळका ॥१॥
कृष्ण-वर्ण धरि वेष महाबळी । घे कटयार तरवार सवें भली ॥
माय आर्जव करी बहु तो परी । घे न चाकर हि एक बरोबरी ॥२॥
सामसूम जिकडे तिकडे गमे । स्वच्छ पाहुन नभाप्रत तो रमे ॥
तारका चमकती नभ–मंडळीं । कांति राजपथिं त्यांचि फांकली ॥३॥
पारिजात फुलले सुर–काननीं । हीं फुलें विलसती गमलें मनीं ॥
कीं हिरेजडित सुंदर सुंदरी । भूषणें विमल–कांति निशा धरी ॥ ४ ॥
शांतता त्रिभुवनास लाभली । प्राणिमात्र निजले निजस्थलीं ॥
पाहुनी कृपण काढि निर्भय । आपुला गगन रत्न–संचय ॥ ५ ॥
उंचसा गगन-मंडप थोर हा । बांधुनी रुचिर आवडिनें पहा ॥
रात्र पाजळुन दीपक तारका । वाट पाहि पतिची अति उत्सुका ॥६॥
दोन बाजुस उभे अचल-स्थिति । राक्षसांसम भयंकर दीसती ॥
राज-मार्ग-गत वस्तुंस पाहती । हर्म्य[1] कान जणु देउन ऐकती ॥७ ॥

---

1 श्रीमंत लोकांचे वाडे.

जें दिनीं गजबजाट करी महा । शांत या समयिं पूर्ण दिसे अहा ! ॥
अंधकार–जलधी पसरे वरी । कीं बुडे सकल सृष्टि तदंतरीं ॥ ८ ॥
श्वान कारण नसून हि भुंकती । भीरु मार्ग-गत लोक चपापती ॥
शब्द जो करितसे पद आपुलें । तो भयें श्रवुन अंग थरारलें ॥९॥
ज्यांस नाहिं घरदार असे जन । दीन अंध पडतात पथांतुन ॥
थंडिनें प्रखर विव्हळ जाहलीं । इंद्रियें, उदरिं भूक धडाडली ॥१०॥
व्यर्थ हारविति यौवन ही धन । जातसे वय झरून दिनोदिन ॥
तें गणून न मदांध सुखी जन । खेळतात गणिकां–सदनांतुन ॥११॥
सारमंडळ सतार हि ताउस । वाजतात खुलतो पहिला रस ॥
गोड वार–युवती–गृहिं गायन । चाललें परिसतात पथीं जन ॥ १२ ॥
यापरी बघत ऐकत चालला । दोहनालय बघे मग थांबला ॥
निश्चितार्थ करुनी मग एकदा । ठेवि आंत यशवंत पदा तदा ॥१३॥
स्वागता करिति पाहुन आगत । त्यास ते जय-रवें जन गर्जत ॥
"ये सख्या ! पळविं आमुचि काळजी । वाट पाहत असों बसलों तुझी" १४
त्यांस दक्ष कमला–सुत पाहुन । विस्मयें स्मित करी मग आपण ॥
दिल्लिरें छळियलें अति यास्तव । सूड घेउं जमले नर–पुंगव ॥१५॥
द्वेष पूर्व विसरून मनांतले । एक देश-रिपु-वारणिं जाहले ॥
निश्चया धरिति संकट ये जरी । घोर, सोडिल कुणी न कुणा तरी ॥१६॥
पूर्वजीं श्रम करून मिळविली । वंशजांसहि अबाधित चालली ॥
खान घे वतनवाडि हिरावुनी । कोप यास्तव किती धरिती मनीं ॥१७॥
भोगिले अमित भोग परोपरी । संपदा विपुल ती असतां घरीं ॥

---

१, २ वेश्यांच्या घरीं.

खान घे लुटुन दीन करी जयां । येति तेथ किति रोष चढे तयां ॥१८॥
हिंदु आणि यवनांत सुदुस्तर । जाहला कलह घोर भयंकर ॥
पक्षपात करि त्यांत हि दिल्लिर । द्वेष यास्तव कितीस अनावर ॥ १९ ॥
आप्त इष्ट जन बाटवुनी मर्दे । तत्कुलां सतत खान अकीर्ति दे ॥
दुःख रात्रदिन अंतरिं जाचतें । सांगण्यास जमले किति आच ते ॥२०॥
घेतल्या हरुन रूपवती सुना । कन्यकाहि कितिच्या अणि अंगना ॥
तत्पती श्वशुर बाप तिथें तसे । येति कीं दुखविले जणु सर्पसे ॥ २१ ॥
धीर-मानस उदार दयाकुल । संपदा अतुल थोर जयां बल ॥
देश मुक्त करुं इच्छिति जे भले । दोहनालयिं किती जण पातले॥२२॥
जाहलीं विपुल ज्यांप्रत कारणें । पावयास, सकलां रिपु वारणें ॥
त्या जनास कमला–प्रिय–नंदन । बोलतो करुनियां मग वंदन ॥२३॥
" पाहतों सुदिन आज विलोचनीं । थोर हें सुख उचंबळतें मनीं ॥
एक होउन करूं कट हा जरी । सत्य देइल यशास तरी हरी " ॥२४॥
भाषण–क्रम करी मग दोहन । मान्य नागरजनां मनमोहन ॥
" मी तुला वदतसें वच तत्वतां । मित्र–संमत सख्या कमला–सुता ॥२५॥
हें मनास गमलें अमुच्या तरी । साहसी समर धीर तुझ्या परी ॥
एकही क्षण बसेल न मागुती । धीर येइल पुढें धरुनी धृती ॥२६॥
न्याय-मार्ग चिर आपण आचरी । काळजी करुन रक्षि परोपरी ॥
जो प्रजा-जन-हितास्तव भागला । लोक-नाथ म्हणती बुध त्याजला ॥२७॥
त्याविरुद्ध जरि आचरिते प्रजा । आपदा वरिल ती प्रभु–कोप–जा ॥
पुण्य-शील नृपतीस अशा जन । ताप देति तरि युक्तचि दंडन ॥२८॥
मान्य होय जरि तत्पर रक्षणीं । दिल्लिनाथ तरि तो अमुचा धनी ॥

मार्ग तो त्यजुनियां छळणा करी । बंधन त्यजुन आम्हि सरूं दुरी ॥२९॥
क्रूर हा विसरला नय दिल्लिर । त्रास यास्तव पुरास अनावर ॥
आजपासुन तया अरि मानितों । कृत्य हें सकल-संमत जाणतों ॥३०॥
थोर जाणुन तुझ्या सकला कृती । सर्व लोक तुज नायक नेमिती ॥
तूं कुशाग्रमति शूर गुणी भला । नांव योग्य यशवंत असो तुला" ॥३१॥
यावरी वदतसे कमला-सुत । लोक होउन समुत्सुक ऐकत ॥
व्यक्त विस्तृत रसाळ सरस्वती । धन्य होय वदनांतुन वाहती ॥ ३२ ॥
" देश-बांधव तुम्ही सगळे मम । देश-मुक्तिकरितां करितां श्रम ॥
हेंच पुण्यकर युक्त तुम्हां असे । यास पूर्ण मम संमति येतसे ॥३३॥
ज्ञान होय इतिहास-निरीक्षणें । पूर्विंचीं भरत-भूमिमधें धनें ॥
याच दुष्ट यवनीं हरिलीं वृकीं । एक देशहि न ठेवियला सुखी ॥३४॥
आपुले प्रबळ वैरि पठाण जे । लांडग्यांचिच जयां उपमा सजे ॥
कां जुलूम करिते विविधापरी ?। साहतों प्रथम तो न भयें जरी ॥३५॥
कां अम्हांस अपमान दरिद्रता । क्लेशदुःख अपकीर्तिहि दीनता ॥
मूळ मालक असून जमीनिचे । कां न रक्षण करूं शकलों तिचें ?॥३६॥
आळशी बसुन शांत गृहांतरीं । झोंप ही धरिलि आज दिनावरी ॥
मान आपण च शत्रु करीं दिली । युक्ति एक सुटण्यास न पाहिली ॥३७॥
थोर सुंदर गृहें सुख-वाहनें । वैभवीं डुलत संतत राहणें ॥
भोगितो सकळ दिल्लिर कां असें ?। मान थोरपण कोठून या असे ? ॥३८॥
दिल्लिरें कपट दुस्तर दाविलें । पाशिया दृढतरीं जन गोंविलें ॥
भासली न परतंत्रपणा बिडी । दे अतां परम कष्ट घडोघडी ॥ ३९ ॥
वाटतें परि सुदैवच हें मला । शत्रु कोण तुमचा म्हणि जाणिला ॥

तन्निवारण–पथाप्रत लागलों । योग्य शूरसम संकटिं वागलों ॥ ४० ॥
लाभ यांत भलताहि न योजिला । कार्य हें परि पवित्र गमे मला ॥
आसनीं शयनिं भोजनिं तत्वतां । देश–भूमि–हित होइन चिंतिता ॥ ४१ ॥
एक होउन उठूं न बसूं क्षण । मारुनी अरि करूं पुर-रक्षण ॥
पूर्वजीं कृत पराक्रम आठवूं । दिल्लिला परत दिल्लिर पाठवूं ॥ ४२ ॥
संकटांतरिं सुखांत रणामधीं । चाल सोडुन मला न तुम्हीं कधीं ॥
खातरी करुन द्या मजला धरा । जान्हवी-जळ करें शपथा करा" ४३
या श्रवून यशवंत-वचा तिथें । इच्छितें गमन संमत सत्पथें ॥
तत्क्षणींच करिती शपथा करें । घेउनी जल सुपावन जें खरें ॥ ४४ ॥
"रक्त-बिंदुहि तनूंत उरेल या । जाउं जोंवरि अम्ही न पुरे लया ॥
तोंवरी तुजसवें करूं राहणें । अर्पिली तनु धनें अणखी मनें" ॥ ४५ ॥
यावरी पुसतसे कमला-सुत । दोहनास हत-शत्रु-यशाप्रत ॥
साधनें किति करूं शकतां जर । प्राप्त होय यवनांसह संगर ॥ ४६ ॥

तो बोले "भट पंचवीस शत जे पायीं रणा चालते ।
तैसे आठ सहस्र शिक्षित हैयी कोणा भया नेणते ॥
आणूं आज घडे जरी रण तयां दुष्टांसवें तुंबळ ।
आम्हीं दुर्मद दिल्लिरास अमुचें युद्धांत दावूं बळ ॥ ४७ ॥
हा कोटापुरिं बेत सात महिन्यांपूर्वींच झाला सुरू ।
मी माझे प्रियमित्र पूर्ण झटलों साहित्य–सिद्धी करूं ॥
'सेना द्रव्य अवश्य होय तितुकें मी तें तुम्हां देइन' ॥
ऐसें जोधपुराधिपें हि दिधलें आम्हांस आश्वासन ॥ ४८ ॥

---

१ ज्यानें शत्रूची कीर्ति हिसकून घेतली आहे असा. २ स्वार.

शेजारचे ही रजपूत राजे । कीर्ती जयांची भुवनीं विराजे ॥
देतील धांवून अम्हांस साह्य । आलें जरी संकट दुर्निवार्य ॥ ४९ ॥
भाट, जोशि, हरिदास, पुराणिक, । धर्मशास्त्र कथणार, सुमांत्रिक ॥
धर्म-युद्ध करण्यास्तव पावन । जाउनी उठवितील जवे जन ॥ ५० ॥
आहे पहाडीं अजमीर दुर्ग । नेऊं तिथें स्त्रीजन आप्त-वर्ग ॥
दुर्गाधिकारी मम मित्र राहे । तो या कटाला अनुकूळ आहे " ॥५१॥

बोले तयास यशवंत सुधी उदार ।
जो दूरसा करितसे हृदयीं विचार ॥
हा खान दिल्लिर भयाकुल जाहलाहे ॥
राहे म्हणून सुखें-जेय गमे मला हें ॥ ५२ ॥
साह्यास यास जरि येइल राजसेना ।
जिंकावया मग उपाय तया दिसेना ॥
येईल लौकर तसा म्हणुनीच आणूं ।
युद्ध-प्रसंग पुर घेउं अरींस हाणूं ॥ ५३ ॥

सर्व सैन्य घेऊन जाऊं रणांत । व्यवस्था अशी आठ व्हावी दिनांत ॥
म्हणोनीं तयारी कराया निघावें । तुम्हीं सर्व ही आपुल्या स्थानिं जावें॥५४॥

परिसुन वच त्याचें जाहला हर्ष फार ।
अरिस म्हणति शस्त्रें दाखवूं एकवार ॥
किंतिक दिन असा हा इच्छिताहों प्रसंग ।
चिरतर सुख पावूं खेळुनी रक्त-रंग ॥ ५५ ॥

---

१ केशानें. २ बुद्धिमान्. ३ सहज जिंकण्यास योग्य.

दंग्यापासुन स्वान दीन अपुलें लागे करूं रक्षण ।
पश्चात्ताप तया भयातुर मनस्थानीं वसे न क्षण ॥
तन्नाशा वळले मनीं खवळले क्रोधानळें पेटले ।
ऐसे वीर पराक्रमी निज-गृहां जाया पथीं पातले ॥ ५६ ॥

---

## सर्ग चवथा.

यशवंतरायाचे विचार—राजपुतान्यांतील राजांस यशवंतरायानें पाठविलेलें पत्र—भूपणसिंगाचीं मुलें लीलावती व अभयसिंग यांस जोधपुरास पाठविण्याविषयीं यशवंतराय निश्चय करितो—जाण्याची तयारी—यशवंतराय लीलावती व अभयसिंग यांस निरोप देतो.

श्लोक.

देशाभिमानी यशवंत नंतर । गेला गृहाला निज धीमतांवर ॥
वृत्तांत जो दोहन–मंदिरांतरीं । झाला तयाच्या मनिं चिंतना करी ॥१॥
होईल आतां स्थिति केंवि आपुली। ही गोष्ट त्यानें न मनीं हि आणिली॥
माता सुशीला वच पूर्वि जें वदे । तें या प्रसंगीं बहु धैर्य यास दे॥२॥
कोटयांतले श्रेष्ठ कुलीन धी–धनं । जे मोंगलां घालवुं इच्छिती जन ॥
मुख्यत्व त्यांचें यशवंत घे शिरीं । हा भार दे फार न काळजी परी ३
यावी स्वदेशास पुन्हा स्वतंत्रता । हा हेतु चित्तांत धरी न अन्यथा ॥
ज्या वस्तु या साधक बाधकास्थित । चिंती तयांतें यशवंत सांप्रत ॥४॥
दिल्लीश्वराचें बळ थोरही यश। राहे जयश्री चिर त्याजला वश ॥
सेनापती सेविति त्यांनला बरे । जाणून हें सर्व न लेश घाबरे ॥ ५ ॥
पौरामध्यें धैर्य अपार साहस । राहे, तयां जिंकिल कोण मानुष ? ॥
साहाय्य राजे रजपूत देतिल। जातील धाकें निज देशिं मोंगल ॥६॥
मानी मनीं हें यशवंत मानितो । दैवानुकूल्या निज फार वानितो ॥
राजांकडे राजपुतानियामधें। दूतांसवें पाठवुनी सुलेख दे ॥ ७ ॥

---

१. बुद्धिमान् लोकांत श्रेष्ठ. २. बुद्धि हेंच आहे द्रव्य ज्यांचें.

" राजे तुम्हीं क्षत्रिय-वंश-भूषण । धर्माभिमानी सुगुणी यशोधन ॥
जाणून युष्मद्बल-शौर्य-वैभव ॥ विज्ञापितों वंदुनि धर्म-बांधव ॥ ८ ॥
जे हिंदुधर्मा बहु पीडिती खल । ते येउनी जिंकिति देश मोंगल ॥
जिंकावया त्यां रजपूत येथले । आम्हीं उठों एकमनें झुजूं बळें ॥ ९॥
येणार कोटयावर थोर संकटें ॥ हानी रणीं होइल फार वाटतें ॥
साहाय्य आम्हां तुमचें जरी मिळे । वैरी तरी हा सुख-जेय हें कळे ॥१०॥
जे जे स्व-धर्मा छळितात दुर्मद । ज्यांच्या कृती साधु-जनास दुःखद ॥
कां द्वेष हो त्यांविषयीं अनावर । आतां ठसेना तुमच्या मनावर ॥११॥
होते न आले जंव येथ मोंगल । राष्ट्रांत होता तुमचाच अंमल ॥
तेव्हां प्रजा भारत-वर्ष-सांस्थित । होत्या पदातें तुमच्याच वंदित ॥१२॥
श्रीराम—धर्मादिक पूर्वज प्रभू ॥ देती तुम्हां पुण्य धनाढ्य आर्य-भू ॥
म्लेच्छांचिया घालवुनी करांत ती । कां बैसलां स्वस्थ असून सन्मती ॥१३॥
झुंजून घ्यावें यश मोंगलांसवें । व्हावी निराशा न तुम्हां पराभवें ॥
भंगे न घ्याला परि संग संगरा । तो गाजतो वीर मही-तळीं खरा॥१४॥
मानी यशस्वी भट भीम भूपती । म्लेच्छां करी जर्जर पद्मिनी-पती ॥
ज्याच्या प्रतापाग्नित शत्रु भाजला। तो वीर लोकीं पृथुराज गाजला॥१५॥
लक्षावधी धाडुन सैन्य दुर्धर । ज्यातें शकेना लववूं अकब्बर ॥
आयुष्य जो घालवि धर्म-रक्षणीं । धन्य प्रताप प्रिय होय तो जनीं॥१६॥
ऐसे किती शूर उदार भूपती । नांवास शोभा तुमच्याच आणिती ॥
गेला तयांचा अभिमान कां लया[3] । कां मोंगलांच्या धरितां तुम्ही भया१७
आतां पुरे आळस हा करा कमी । हातीं हत्यारें रणशूर घ्या तुम्ही ॥

---

१ हिंदुस्थानांतील. २. हिंदुस्थान. ३. पराभव पावला.

पोषाख अंगीं चढवून केशरी । या चालुनी नीटच मोंगलांवरी ॥ १८ ॥
होऊं उठा सर्व हि एक एकदा । अंतस्थ वैरें विसरा तुम्ही सदा ॥
भांडूं बळें ठेवुन भार ईश्वरीं । विज्ञापना हीच तुम्हांस मी करीं" ॥१९॥
दूतांचिया देउन लेख हा करीं । जायास आज्ञा यशवंत त्यां करी ॥
नानाप्रकारें मग वीर चिंतन । बैसे करीत प्रिय ज्यास सज्जन ॥२०॥
" प्राणाहुनी हि प्रिय वीर भूषण । प्राणक्षया कारण जो करी रण ॥
त्याचीं मुलें दोन अनाथ सुंदर । आहेत देवा सुखि त्यांजला कर २१
लीलावती भूषण-कन्यका गुणी । रूपें रतीतें लवही न जी उणी ॥
ती वाढुनी हर्ष विशेष दे मला । वाढे जशी चंद्र-कलाच निर्मला ॥२२॥
आता हिची श्लाघ्य-चरित्र-शोभित । नेती बलात्कार करूनियां शठ ॥
हातून त्यांच्या सुटली तरी कशी । लीलावती, विस्मय हाच मानसीं ॥२३॥
होता हिचा बाप जिवंत जोंवर । इच्छा अशी होय मना अनावर ॥
घालून त्या भीड करीन मागणी । पाणि-ग्रहें होइन मी हिचा धनी ॥ २४ ॥
आज्ञा सखा जाय लयास भूषण । गेले हि त्याच्या सह धन्य ते दिन ॥
इच्छा अपूर्णा मम जी असे अहा! । ती पूर्ण व्हाया नच योग्य काळ हा २५

आम्हीं उठों प्रबळ शत्रुसवें लढाया ।
व्हाया स्वतंत्र अथवा समरीं पडाया ॥
आतां पुढें समय घोर पुरावरी या ।
येतां दिसे पुर-जना बहु दुःख द्याया ॥ २६ ॥

हें जाणते प्रमुख येथिल लोक सारे ।
आपापले त्वरित आटपती पसारे ॥
स्त्रीवर्ग आप्त शिशु वित्त समस्त यांतें ।

देतात धाडुन सुरक्षित सुस्थळांतें ॥ २७ ॥
येथील पूर्व-नृप-वंशिच जन्म ज्याचा ।
ग्यां रक्षिला अभय हा सुत भूषणाचा ॥
ऐकून हें खवळलाच असेल खान ।
तो मारण्यास अभयास करील यत्न ॥ २८ ॥
मन्मित्र-पुत्र मम [1]गेहिं वसो खुशाल ।
राहीन यास्तव सुसावध सर्वकाळ ॥
वाटे तथापि अरि घेइल घोर सूड ।
दुष्टांचिया कृति भयंकर फार गूढ ॥ २९ ॥
जातील मोंगल पळून इथून जेव्हां ।
होईल राज-पद येथिल रिक्त तेव्हां ॥
सिंहासनीं अभय मत्प्रिय-मित्र-पुत्र ।
बैसो असें कुलज थोर पदास पात्र ॥ ३० ॥
आतां मला उचित हेंच गमे करावें ।
दोघां मुलांस इथुनी दुर पाठवावें ॥
भूपाल राज्य करि जोधपुरांत धीट ।
यांचें सदा करिल रक्षण तोच नीट ॥ ३० ॥
देऊन चाकर भले समवेत कांहीं ।
धाडीन यांस सरली जंव रात्र नाहीं " ॥
ऐसा विचार करि पूर्व दिशेस पाहे ।
तेजो-निधी अरुण तों वरि येत आहे ॥ ३१ ॥

---

1 घरीं.

25G007

बोलावुनी त्वरित भूषण–बालकांतें ।
प्रेमें वदे मग तयां बसवून हातें ॥
" होतो वियोग तुमचा प्रिय बालकांनो ।
तें दुःख होय मज तें मम चित्त जाणो " ॥ ३२ ॥
तेव्हां वदे अभय आणुन अश्रु डोळां ।
" कां आज दूर करितां तुमच्या मुलांला ? ॥
जावें तुम्हां त्यजुन कोण विदेश-पंथा ? ।
काका तुम्हांविण न रक्षक अन्य आतां " ॥ ३३ ॥
लीलावती न वदली वचनास कांहीं ।
खालीं सलज्ज मुख घालुन रम्य राही ॥
ती एकदाच यशवंत–मुखास पाहे ।
लाजे पुन्हा कितिक सुंदर दीसताहे ! ॥ ३४ ॥
होती लहानपणिं खेळत गात गीत ।
नित्य प्रसन्न यशवंत-मना करीत ॥
लागे परंतु जंव यौवन तीस यायां ।
लाजे बघून जवळी यशवंतराया ॥ ३५ ॥
लज्जा जरी करि तिच्या रसनेस बद्ध ।
वक्तृत्व सर्व नयनेंच करी प्रसिद्ध ॥
कीं प्रेम लाज भय काळजि हे विकार ।
दृष्टींत त्या प्रकट होउन राहणार ॥ ३६ ॥
वारा प्रचंड करि नम्र लता-शिरातें ।
लज्जौघ तेंवि लववी हि तिच्या मुखातें ॥

लीलावतीस बघुनी असल्या स्थितींत ।
साश्चर्य-हर्ष यशवंत वदे सदुक्त ॥ ३७ ॥
" जीं ओपिलीं प्रिय-सखें पदरांत यत्नें ।
माझ्या मुलें जणु अमूल्य अशींच रत्नें ॥
मी त्या तुम्हां त्यजिन काय बळेंच दूर ? ।
कीं हा हितार्थ तुमच्या करितों विचार ॥ ३८ ॥
उत्पत्ति राजकुलिं जी तुमची असे हे ।
ती नाश सत्य तुमचा करणार आहे ॥
उत्कर्ष-कालिं अभिमान तुम्हांस ज्याचा ।
तो वंश सांप्रत विनाश करील साचा ॥ ३९ ॥
आम्ही स्व-राज्य झटतों नगरीं उभारूं ।
उद्योग मोंगलहि त्या करितील वारूं ॥
ते पूर्व-भूप-कुल-जात जनां समस्त ।
मारून टाकितिल यत्न करून दुष्ट ॥ ४० ॥
कस्तूरिका—मृग जरी अपराध-हीन ।
जाऊन बैसति दरींत गरीब दीन ॥
कस्तूरिकार्थ अतियत्न करी शिकारी ।
निःशंक शोधुन नृशंस[1] तयांस मारी ॥ ४१ ॥
लीलावती ! ह्मणुन जोधपुरास जावें ।
येथून, निर्भय तिथेंच तुम्हीं रहावें ॥
तेथील मित्र मम शूर सुधी नृपाल ।

---

१ क्रूर.

संगोपनास तुमच्या झटुनी करील ॥ ४२ ॥
घेऊन जन्म रजपूत-कुळांत पाही ।
लीलावती! सकल शोभसि सद्गुणांहीं ॥
आहेस तूं चतुर जाणसि सर्व कांहीं ।
प्राप्त स्थितींत सुख मानुन शांत राहीं ॥ ४३ ॥
जातोस आज मज सोडुन दूर देशा ! ।
ठेवूं सुखी तुजसि आर्जवितों रमेशा ॥
वा वाग नीट अभया परक्या जनांत ।
होता कसा तव पिता स्मर हें मनांत ॥ ४४ ॥
माता पिता सदय सेवक एक-निष्ठ ।
ऐश्वर्य दुर्लभ हि हर्म्य[1] पुरीं वरिष्ठ ।
एक्या दिनींच खळ मेळविती धुळीला ॥
होसी अनाथ किति दुर्घट दैव-लीला! ॥ ४५ ॥
स्व-प्राण-रक्षण करूं जरि भीत दीन ॥
जातोस तूं जनन-भूमिस ही त्यजून ॥
झालें असे उलट सांप्रत दैव बाळा! ।
देऊं नको म्हणुन दुःख तुझ्या मनाला ! ॥ ४६ ॥
तोफा आगमनोत्सवार्थ सुटती भेरी भरें वाजती ॥
गाती मंगलगीत बंदिजनही वारांगना नाचती ॥
अंबारीवरि पौर वर्षति फुलें सोन्या रूप्याचीं सुखें ॥
येणें यापरि जन्म-भूमिस तुझें होणार तें कौतुकें ॥ ४७ ॥

---

1 वाडा.

ज्ञानी शूर धनी गुणी जन तुला येतील वंदावया ॥
लाखों वीर तयार होतिल तुझी आज्ञा शिरीं घ्यावया ॥
तूं सिंहासनिं राजसिंह बसतां पाहीन मी जेधवां ॥
आतां भूषण–वाक्य मीं पुरविलें वाटेल हें तेधवां ॥ ४८ ॥
दिन जोंवरि धन्य तो न आला । जंव मद्यत्न न पावती फळाला ॥
तंव जोधपुरीं तुवां रहावें । अभया! मद्वच हें मनीं धरावें" ॥ ४९ ॥
निरखुनि अभयाला आणि लीलावतीला ।
अनुचरं-करिं, सांगे जावया शीघ्रें त्यांला ॥
नमिति बहिणभाऊ नम्र त्याच्या पदांतें ।
पुशित नयन जाती बालकें तीं स्व–पंथें ॥ ५० ॥

---

१ चाकरांच्या हातांत. २ लौकर.

# सर्ग पांचवा.

बंडाची बातमी ऐकून मुसलमान अमीर उमराव दिल्लिरखानास भेटण्याकरितां राजवाड्यांत जाण्यास निघतात—त्यांची वाटेंत झालेली दुर्दशा-राजवाड्याचें वर्णन—मुसलमानांनीं दिल्लिरखानाजवळ केलेलीं गाऱ्हाणीं—त्यानें केलेलें सांत्वन—दिल्लीच्या बादशाहाकडून आलेला हुकूम—कोटा—शहरांतील लोकांचें बंड मोडण्यास बादशाहाचे हुकुमावरून मल्हारराव होळकर येणार—ही बातमी ऐकून मोंगलांस झालेला हर्ष—दिल्लिरखान यशवंतरायास बंडांतून फोडण्याचा निश्चय करितो.

## श्लोक.

कोटा या नगरींतले समस्त पौरें¹। त्या रात्रीं मसलत ती करीति थोर ॥
दिल्लीरालयिं दुसऱ्या दिनीं सकाळीं। म्लेच्छांची अभिमत मंडळी निघाली १
सर्वांच्या प्रकट दिसून चेहऱ्यांत । ये चिंता सतत मनांत जी रहात ॥
जाती ते पथिं उमराव थोर काजी। वेगानें उडवित वायु-तुल्य वाजी² २
मार्गांत प्रळय उडे तयांसभोंतीं । पाषाण प्रचुर³ शिरावरून जाती ॥
जाऊनी अडविति पौर धांव घेती। संतापें बघति शिव्याहि शाप देती ३
तें झालें यवन जनां असह्य फार । कीं गेलें भरूनिच कर्दमें शरीर ॥
क्रोधानें चरफडतात ते मनांत । "होवो हें शहर जळून सर्व फस्त!" ४
धिक्कारी गिरि-शिखरास तुंग⁴-कायें । तो वाडा नयन-पथांत⁵ त्यांचिया ये ॥
सोळा ज्याप्रत अति थोर चौक होती। दिल्लीरें सुखकर केलि ज्यांत वस्ती ५

---

१ नगरवासी. २ घोडे. ३ पुष्कळ. ४ उंच आकृतीनें. ५ दृष्टीच्या टप्प्यांत.

कारंजीं आणि जल-मंदिरें महाल । राजै-स्त्री-वसति-गृहें तशीं विशाल ॥
होते त्या विलसत खांब चंदनाचे । कित्येक स्थळिं बहु शोभिवंत साचे ६
स्तंभांनीं सुबक सुरूप सुप्रमाण । कोरिल्या असति सुपुत्तली मधून ॥
त्या गाती निजति कितीक नाचताती । कीं त्या त्या स्थिति परिपूर्ण दाविताती
प्रत्येकीं सुललित वापिका प्रकोष्ठीं । पुष्पांनीं नमित लता-समूह कांठीं ॥
तच्छाया पडति जळांत रम्य फार । दे शोभा विकसित आंत पद्म-भार ८
बर्फानें मढवुन काय शुभ्र केल्या । कीं चंद्रा पिळुन रसांत त्या भरील्या !॥
वाडयाच्या शिरिं वसतात हंस-कांती । गच्च्या कीं जणु गगनीं उडूं पहाती ९
कीर्ती ज्या जनीं रजपूत-वंशिं केली । जे झाले महित जगांत पूर्व काळीं ॥
तत्पुण्य-स्थिति-कृति-दर्शकें पवित्रें । हीं भिंतीवर दिसतात चित्र चित्रें १०
मातीचा दृढ तट वर्तुलाकृतींत । होते त्यावरति बुरूजही अनंत ॥
वेष्टोनी तट परिखा-जल-प्रवाह । वाहे कीं जणु बहु थोर सर्प-देह ११
शेजारीं अरवलि घांट, दुर्ग, झाडी । कोटा, त्याजवळिल देश, दूर खेडीं,
उद्यानें, सुर-सदनें हि राज-पंथ । प्रासादावरून समस्त दीसतात ॥१२॥
हा वाडा खरचुन संपदा अमूप । हौसेनें प्रथम रचीत पूर्व भूप ॥
मेले ते दिन! नृपशूर तोहि गेला! । म्लेच्छांनीं मग वसतीस योग्य केला १३
ज्या स्थानीं बहु सुटले हुकूम जाया । शत्रूतें पळवुन कीर्ति लूट घ्याया ॥
होते जें स्थळ नृप-पाल भूषवीत । दिल्लीपै-प्रतिनिधि आज राहि तेथ १४
ज्या ठायीं बसुन बलाढ्य सिंह गर्जे । तो सिंह-ध्वनि भुवनांतरांत गाजे ॥

---

१ जनानखानें. २ कोरींव बाहुल्या किंवा पुतळ्या. ३ सुंदर. ४ चौकांत. ५ खंदक. ६ बागा. ७ दिल्लीच्या बादशाहाचा सुभेदार.

तो त्याचे कुलजहि जाति काळ चाले। त्या ठायीं वसति करीति आज कोल्हे!
दिल्लीर प्रतिदिनिं भीति काळगीत। होता कीं, उठतिल पौर ते समस्त ॥
पाहोनी निवडक शूर वीर अंगें। रक्षाया गृह दिनरात्र त्यांस सांगे १६
ते होते फिरतच पेटवून तोडा। स्वस्थानीं निशिदिन रक्षितात वाडा॥
खड्गातें उपसुन तीनशों प्रसिद्ध। द्वारीं ते वसति शिपाइ लोक सिद्ध १७
निर्बंधाविण उमराव जाति आंत। स्व-स्वामि-प्रतिनिधि-शोध ते करीत॥
दिल्लीर श्रवुन तदागम-प्रवेश। भेटाया त्वरित तयार चारुवेष ॥१८॥
"आहे कीं सुख तुमच्या मुलां स्त्रियांतें। हें येवो प्रथम कळून शीघ्र मातें"
कीं वार्ता नव नगरामधें उदेली। ज्या योगें प्रकट तुम्हांत भीति झाली १९
"वार्ता ही भयकर दिल्लिरा उदारा। सांगाया तुज बघतों त्यजून धीरा॥
कोटयाचे जन करितात बंड थोर। उत्तेजी भट यशवंत त्यांस शूर॥२०॥
युद्धाची त्वरित तयारि होत आहे। क्रोधानें खवळून लोक धुंद राहे॥
या कैसी तजविज सांग ती अम्हांतें। हें येतें व्यसन गृहा घना निवातें २१
ते निंदा करिति छळीति ताप देती। द्वेषातें उघडच पौर दाखवीती॥
ही रात्रंदिन मनि काळजी वहावी। योजोनि कवण उपाय शांति यावी! २२
राजाचा धरुनहि पक्ष हाल व्हावे। हें आम्हीं कुठवर दिल्लिरा सहावे!॥
जें प्रेम प्रकट अम्हांत हिंदु लोकीं। होतें तें दिसत नसे कुठे विलोकीं २३
हें आहे अवगत आमुचे शिपाई। त्या दुष्टांसह करितील हातघाई॥
अंगारीं शलभसमान मृत्यु-पंथा। जातील क्षण न तयास झुंज देतां २४
यासाठीं जरि करिसी न हा विचार। या वेळीं तरि घडतो अनर्थ घोर॥
हें आतां सकळ लिहून पाठवावें। श्रीदिल्लीश्वर-चरणांस जागवावें २५
बंडाची कुणकुण चार पांच मास। ही होती विदित पुरामधें अम्हांस॥

या पंथावरि गमलें न गोष्टि येती । यासाठीं धरिली न लेशमात्र भीती" २६
दिल्लीर स्वजन-मुखांतली सदुक्ती । ऐकून क्षण बसला उगा कुकीर्ती ॥
कल्लोळें उठति मनांत चित्त-वृत्ती । तो बोले मग लटकी धरून शांती २७
" सद्धर्म-प्रसर-परायणांस[१] यावें । सद्भक्तां मरण हि काफरीं वधावें ॥
देवाच्या जरि असलें असें मनांत । शांतीनें तरि मग या मरूं समस्त २८
लोकांच्या हृदय-तलीं वितुष्ट राहे । हें चारी गत महिन्यांत पाहताहे ॥
मी झालों लवहि न संकटीं निराश । हें केलें सुविदित बादशाह यास २९
शिक्षा मीं समुचित भूषणास केली । त्या योगें गडबड नागरीं उडाली ॥
झालों मी चकित लिहून त्याच रात्रीं । दिल्लीशा कळविलि ती समग्र पत्रीं ३०
' स्वामीच्या चरण-रजासमान दास । रक्षावें करून दया-सहाय यास ॥
हें नोहे तरि रजपूत गांठितात । भांडोनी नगर सदेश जिंकितात '३१
ये साह्या जरि नृप-राज-राज-सेना । या आठा दिवशिं बहु प्रतीक्षमाण ॥
बंडाचे प्रमुख धरून लोक मारूं । शत्रूतें निवटुनि संकटास वारूं ॥ ३२ ॥
आली ती नच तरि एक नीट पंथ । दिल्लीचा धरून पळूं सुटूं जिवंत ॥
त्यापूर्वीं जरि करितील शत्रु चाल । स्व-स्थानीं बसुन लढून नेउं काळ" ३३
ऐसें जों वचन सुयुक्ति-सिद्धि बोले । वेगानें पळतच दूत आंत आले ॥
धापांनीं स्फुट वदनीं फुटे न वाचा । सांगाया न शकति ही निरोप त्यांचा ३४
दिल्लीरें जंव पुशिलें तयास काम । नम्रत्वें वदति करून ते सलाम ॥
"त्वत्पत्रें बघुन विचार फार केला । भूपाळें तुजसि हुकुम[२] हा लिहीला" ३५
हें कर्णामृत नृप-दूत-वाक्य ऐके । खानाच्या मुखिं हरिखें सुकांति फांके ॥
वंदोनी शिरिं धरि भूप-शासनातें । उत्कंठाकुल मग ऐकवी जनातें ३६

---

१ उत्तम धर्माचा प्रसार करण्याविषयीं तत्पर. २ बादशाहाच्या हुकुमास.

" सद्धर्म-वर्धक रवि-प्रखर-प्रताप ।
दिल्लीश्वर क्षिति-तलावर एक भूप ॥
नैकै-प्रसंग-रण-संहृत-शत्रु-कीर्ति ।
आज्ञा निज प्रतिनिधीस अशी करीति ॥ ३७ ॥
एकत्र दुष्ट जन त्या नगरांत होती ।
राजाविरुद्ध अपराध करूं पहाती ॥
कोपास पात्र अमुच्या ह्मणुनीच झाले ।
येईल दंड करण्यांत तयांस काळें ॥ ३८ ॥
कोटा-पुरांतिल जनांप्रत दंडण्यास ।
लागेल काळ पडतील महाप्रयास ॥
सेना नसे जवळ आज तयार याया ।
तेथें प्रसंगिं उपयोगिं तुम्हां पडाया ॥ ३९ ॥
जे शासितात नृप राजपुतानियास ।
या गादिचे म्हणति अंकित आपणास ॥
ते गर्व-मत्त करभार न देति काळीं ।
तद्दंडनीं म्हणुन बुद्धि अम्हांस झाली ॥ ४० ॥
मल्हार होळकर थोर मराठियांत ।
जो आमुचा परम मित्र म्हणों मनांत ॥
त्या साठ लाख रुपये करितों बहाल ।
येईल तो त्वरित दूर करील हाल ॥ ४१ ॥

१ सूर्याप्रमाणें प्रखर आहे तेज ज्याचें. २ अनेक प्रसंगीं ज्यांनीं लढाईत शत्रूची कीर्ति हरण केली आहे असे.

शत्रूंस धाडुन दिगंतर पाहण्यास ।
देईल शांति सुख तोच तया पुरास ॥
मार्गास मत्त नृप आणिल तोच वीर ।
प्रख्यात–शौर्य–बल घेउन सैन्य–भार ॥ ४२ ॥
तो येई तों दिवस लोटति आठ चार ।
आधीं उठून जरि शत्रु करील भार ॥
रक्षावया पुर तिथेंच तुम्हीं रहावें ।
होईल यत्न तितुका करुनी लढावें ॥ ४३ ॥
आटोपल्यावर तिथील समस्त काम ।
मल्हार होळकर वीर–शिरो–ललाम[1] ॥
जाईल पश्चिम दिशे रजपूत–देशीं ।
पाहील कोण करि भूप लढाइ कैसी ॥ ४४ ॥
ऐका अवश्य जरि कांहिं हुकूम सांगे ।
द्या जें अवश्य तृण–धान्य–धनादि मागे ॥
विश्वास त्याजवर पूर्ण तुम्हीं धरावा ।
अल्प–श्रमें व्यसन–वारि–निधी[2] तरावा " ॥ ४५ ॥

व्यक्तार्थ हा ऐकुन राज–लेख । गर्जोनि टाळ्या पिटितात लोक ॥
ईश–स्तवातें करितात भावें । आनंद त्यांचा गगनीं न मावे ॥ ४६ ॥
किल्लेदार[3] बोले मग तो स्व–लोकां । "नाहीं जिवाला किमपीहि धोका ॥
हें बंड थोड्या दिवसांत मोडे । दंडूं तदग्रेसर उग्र दंडें ॥ ४७ ॥

---

१ योद्धयांच्या शिरावरील रत्न ( उत्तम योद्धा. ) २ संकटाचा समुद्र. ३ त्यांतील मुख्य.

मल्हाररायास पुरांत घेऊं । त्या लागतें साह्य अवश्य देऊं ॥
ते दोहनादी यशवंत आणी । जातील फांशीं चढुनी मरूनी ॥४८॥
परंतु तो येइल येथ तोंवरी । कसें रहावें सुखरूप या पुरीं ? ॥
न काय हल्ला करितील येउनी । पुरस्थ? भीती उपजे पुन्हा मनीं ४९
अशा संकटीं एक युक्ती दिसून । मला येतसे ती पहावी करून ॥
वळी बंडवाले दहा ते हजार । तयां शांत ठेवूं करावा विचार ॥५०॥

साधा स्वभाव बहु वर्तन नम्र लोकीं ।
ज्याचें तयांत यशवंत असा विलोकीं ॥
आशांमधें परम दुस्तर जी धनाशा ।
तीनें तया वळवितां न घडो निराशा ॥ ५१ ॥

वळेल-लोभें यशवंतराज । साधून घेऊं तरि कार्य आज ॥
मल्हार आल्यावर सूड साधूं । धरून त्यातें कपटेंचि बांधूं " ॥५२॥

हत्तीतें कमलांतल्या मृदु अशा जो तंतुनीं बांधिता ।
झंझावात धरून एक समयीं जाळ्यामधें कोंडिता ॥
त्या मानी कमलात्मजास कुमती द्रव्यें विकाया बसे ।
प्राण-त्राण-परायणांस यवनां दिल्लीर बोले असें ॥ ५३ ॥

---

१ वादक. २ प्राण जगविण्यांत तत्पर.

## सर्ग सहावा.

आवशीच्या प्रहर रात्रीचें वर्णन—बंडवाल्यांचे उद्योग—यशवंतराय—दिल्लिरखान—दोघांचें संभाषण—दिल्लिरखान यशवंतरायास ठार मारूं पाहतो—यशवंतरायाचे मित्र तेथें येऊन दिल्लिरखानास कैद करितात व त्यास जिवें मारण्याकरितां यशवंतरायाची आज्ञा मागतात—यशवंतराय खानास सोडवितो—तो पळून जातो.

### श्लोक.

झाल्या रिकाम्या मशिदी चवाठी । रस्त्यांतली मोडलि दाट दाटी ॥
बाजार विस्तीर्ण हि बंद झाला । व्यापारि गेले आपुल्या गृहाला ॥१॥
जी आलि होती भरती अपारा । सकाळपासून जगत्समुद्रा ॥
जातां दिसे ती पुरि सामसूम । न रात्र जों जाहलि एक याम[1] ॥२ ॥
कोठे कुठे वादन नृत्य गीत । चाले गृहीं कीर्तन साधु–गीत ॥
कोठें पुराणें सुरसें सुबोधें । आबालवृद्ध श्रवितात मोदें ॥ ३ ॥
शेजारि शेजारि परस्परांत । गोष्टी सुखाच्या बसले करीत ॥
वृत्तांत जो कीं घडला दिनांत । चाले हठें त्यावर वाद नीट ॥ ४ ॥
दिल्लीरखानास पहावयाला । जाती सकाळीं जन ते कशाला ? ॥
नानाप्रकारें मग तर्क चाले । जो तो मना येइल तेंवि बोले ॥ ५ ॥
विश्रांति घेती नच बंडवाले । त्यांचा पुरीं संतत यत्न चाले ॥
होई पुढें तुंबळ फार युद्ध । सामान त्याचें करितात सिद्ध ॥ ६ ॥
काळें चमत्कार जगास दावूं । जयां गमे पूर्ण यशास घेऊं ॥

---

[1] प्रहर.

अज्ञात ते आचरिती स्वपंथ । प्रवाळकीटांसम यत्नवंत ॥ ७ ॥
सर्वत्र झालें जंव सामसूम । फावे तयांला करण्यास काम ॥
गेली भुयारें भरुनी गृहांचीं । तेथें दिसे धांदल माणसांची ॥ ८ ॥
प्रस्ताव[1] चाले यशवंत याचा । कित्येक गाती गुण दोहनाचा ॥
त्या भूषणातें किति आठविती । क्रोधें किती मोंगल निंदिताती ॥९॥
दूती यमाच्या म्हणतात ज्यांसीं । त्या बंदुकांच्या दिसतात राशी ॥
स्त्रीजाति जों सोडिति तोंड घोर । लक्षावधी मारिति जीव ठार ॥१०॥
बर्च्या कट्यारी तरवारि भाले । नानाकृतींचे बहु तोफगोळे ॥
निर्मावया चालति कारखाने । संख्या तयांची किति कोण जाणे ११
होणार येथें रण फार घोर । हें दोहनादी समजून पोर ॥
स्त्री बालकें वृद्ध अशक्त यांतें । दुर्गास ते धाडिति दुर्गमातें ॥१२॥
मासानुमासें रण हें घडेल । दुष्काळ जाणून पुरीं पडेल ॥
भांडि[2] भरी दोहन धूर्त आधीं । धान्यें श्रमानें करुनी खरेदी ॥१३॥
येऊन ठेपे जवळी लढाई । साह्यास बोलाविति आप्त भाई ॥
येऊन गेहें भरिलीं तयांनीं । ते गुंतले भोजन–गान–पानीं ॥ १४ ॥
न द्वेष वा मत्सर वाग्विवाद । कोठें न चिंता न कुठे प्रमाद ॥
एके मनें चालति बंडवाले । उद्योग ते पाहाति आपुलाले ॥ १५ ॥
शासी जसा षण्मुख[3] देव–सेना । तैसाचि पातें यशवंत जाणा ॥
त्या रात्रि होता स्वगृहांतरांत । कित्येक पत्रें बसला पहात ॥ १६ ॥
पत्रांत कांहीं करितो खुणाही । कांहीं करें घेउन नीट पाही ॥
भावार्थ घे टांचुन कागदांत । बैसे विचार क्षण तो करीत ॥ १७ ॥

---

१ गोष्ट. २ कोठारें. ३ देवांचा सेनापति कार्तिकस्वामी.

" झाला असे दिल्लिर फार भीत " । वार्ता अशी दूत कळीवतात ॥
सेना असे अल्पच त्याजपाशीं । भीतो लढाया म्हणुनी अम्हांशीं १८
ते आमुचा बाळगितात धाक । शिपाइ मोठे सरदार लोक ॥
सध्यांच संख्येंत बळांत भारी । असों, अरी कोण अम्हां निवारी? १९
सेना महाशूर तयारि मोठी । जी बाळगीली रजपूत जाटीं ॥
होईल तीचा उपयोग आम्हां । लावूं अशा थोर पवित्र कामा ॥२०॥
जे आमुचे भूपति जातभाई । धाडोनि पत्रें करितात घाई ॥
" घ्या सोडवोनी पुर देश कोटा । लागेल तें साह्य करूं न तोटा २१
स्वतंत्र आम्ही रजपूत मानी । जिंकावया योग्य न मोंगलांनीं ॥
म्हणून झालों झटुनी स्वतंत्र । घ्यावा तुम्हीं हाच मनांत मंत्र ॥ २२ ॥
कीं हा शिवो मोंगल न स्व-धामा । न डाग लागो 'रजपूत' नामा ॥
दिल्लीपती तो बळहीन झाला । स्वतंत्र व्हा संधि असे तुम्हांला "२३
येणार साह्या रजपूत शूर । येथून कोसांवरि वीस दूर ॥
मी अष्टमीच्या उठुनी सकाळीं । मारीन दुष्टां धरुनी अकाळीं ॥२४॥
चिंती असें जों यशवंतराय । तों येउनी सेवक वंदि पाय ॥
" द्वारामधें चार उभे असामी । स्वामी तुझ्या इच्छिति येउं धामीं[1] २५
विचारतां नांव न सांगतात । परंतु सभ्याकृति दीसतात ॥
इच्छा तुझ्या दर्शनि त्यांस आहे । आज्ञा कशी सेवक वाट पाहे" २६
एकीकडे कागदपत्र ठेवी । मुखीं न चिंता-लव वीर दावी ॥
संकेत-वाचे हळु शब्द बोले । स्वसेवकातें यशवंत डोले ॥ २७ ॥
मोठ्या स्वरें काय वदे सदुक्त । येवोत ते न प्रतिबंधयुक्त ॥

---

1 आपल्या घरास.

तूं मार्गी त्यां दाखवि या महालीं । भृत्य स्वकृत्या करूं जाय खालीं २८
प्रकाश मोठा करुनी दिव्यांचा । विशाल घे खड्ग करांत साचा ॥
दीप-प्रकाशीं तळपे हत्यार । जें सर्वदा सन्निध राहणार ॥ २९ ॥
गेला पुढें पांच पदें पहाया । गृहागता मान हि योग्य द्याया ॥
अज्ञात चारी करिती प्रचार । स्ववेष खोटा करितात दूर ॥ ३० ॥
तों भेट झाली नमिती दुरून । ते एकमेकां कर सांवरून ॥
बैसावया दावुन आसनास । क्षेमें विचारी मग तो गृहेश ॥ ३१ ॥
तों त्यास उद्देशुन वीर्य-शाली । बोलावया दिल्लिर घाट घाली ॥
" कां हा तुझा भीतिद खड्ग मोठा । गेहागता दाविसि तूं मराठा ३२
कैसाहि तूं क्रूर महाभिमानी । आहेस मोठा परि तूं इमानी ॥
आलों तुझी ऐकुन कीर्ति पाहीं । या कारणें भीति अम्हांस नाहीं ३३
युद्धांत वैरी परि बंधु गेहीं । कोणी कुणा वैरि घरांत नाहीं ॥
जे शूर ते वृत्ति अशी उदार । ठेवीति हा नेमसि कीं प्रचार ॥३४॥
मी स्वार्थ साधीन म्हणें मनांत । कल्याण व्हावें तव हेंहि इष्ट ॥
या साठिं जें मी वदणार आतां । तें ऐक, हो सावध-बुद्धिमंता ३५
गेहाधिकारी यशवंत बोले । जें ऐकतां सज्जन-वृंद डोले ॥
आलास विश्वास धरून पूर्ण । तस्मात् तुझा ठेविन योग्य मान ॥३६॥
जें बोलणें काय असे खुशाल । तें बोल तूं जाणुन देश काल ॥
ही ऐकुनीयां यशवंत-वाणी । बोले पुन्हा दिल्लिरखान मानी ॥३७॥
दिल्लीपती बादशहा दयाळ । ज्या सर्व देशीं नमिती नृपाळ ॥
ज्या सार्वभौमाप्रत शुभ्र-कीर्ती । ही हिंदु-भूमी अनुकूळ होती ॥३८॥

---

१ चाकर. २ घरचा मालक ( यशवंतराय ). ३ घरीं आलेल्या मनुष्यास.

त्या भूपतीशीं करणें विरोध । अक्षम्य हा होय महापराध ॥
नाहीं तुला ठाउक काय पूर्ण? । बोलाविसी जो मरणास तूर्ण ॥३९॥
कां तूं बळें कोपवितोस सिंह? । जाणून कां ओढिसि हेव्यवाह ॥
दर्पांध सर्पास न भीसि काय ? । ऐशा कृतीनें वदशील हाय ॥ ४० ॥
विंध्याप्रमाणें स्थिर ज्यांस पाया । राज्यास त्या आणिसि कीं अपाया ॥
लागेल वेशीवर मात्र शीर । याचा न कैसा करिसी विचार ? ॥४१॥
झालां तुम्हीं सर्वच दुष्ट एक । देतां चिथावून इथील लोक ॥
स्वार्थास साधू कुमती पहाती । द्वारीं यमाच्या दुसऱ्यांस नेती ॥४२॥
व्हावा इथें अंमल मोंगलाचा । संकेत हा केवळ ईश्वराचा ॥
होतें प्रजांचें कृतपूर्व पुण्य । तेणें चि हा पावति भूप धन्य ॥ ४३ ॥
कर्तव्य माझें पुर रक्षण्याचें । तें मी करीतों स्थिर काय वाचे ॥
जाईं न जों मी मरुनी लयास । रक्षीन लोकां करुनी प्रयास ॥४४॥
आला तुम्हांला जय पूर्ण त्यांत । मी नष्ट झालों समजूं मनांत ॥
येणें परी देश मिळेल वाटे ? । दे सोडुनी या विफळ भ्रमातें ॥४५॥
माझा धनी काय असे अशक्त? । लक्षावधी सैन्य तयार तेथ ॥
डोळा जरी वक्र करील रोषें । फोट्यावरी, होइल सांग कैसें? ॥४६॥
एकाहुनी एक बळी विशाळ । झुंजार रागें दिसणार काळ ॥
येतील येथें सरदार शूर । दुष्टां जनां होइल दंड घोर ॥ ४७ ॥
बंडांत नाहीं परिणाम गोड । हेका तुझा यास्तव सर्व सोड ॥
जातील चोरांसह सर्व फांशीं । जाऊं नको गुंतुनिया अपेशीं ॥ ४८॥
सौख्यांत जे लोळति आज जीव । बंडांत त्यां दावुन नेसि भाँव ॥

१ उवकर. २ अग्नी. ३ विंध्यपर्वताप्रमाणें. ४ कपट.

ते मारिले जातिल व्यर्थ व्यर्थ । तद्रक्षणीं होशिल कीं समर्थ? ॥४९॥
त्यांच्या स्त्रियाही लडिवाळ बाळें । देशोधडी लागति जीं दुकाळें ॥
अन्नाविणें प्राणच टाकितील । हाडें तयांचीं तुज शापितील ॥ ५० ॥
लागेल हा देश धुळीस सर्व । तेव्हां तुझा कीं उतरेल गर्व ? ॥
स्नेही मरूनी पडतील खालीं । होशील जागा मग तूं अकाळीं॥५१॥
माझ्या मतानें जरि चालशील । कल्याण मब्दांध तुझें करील ॥
स्वीकार तूं चाकरि मोंगलांची । मानास्पदा वित्त-यशोद साची॥५२॥
वांछा जरी द्रव्य अपार व्हावें । तें मन्मतानें तुजला मिळावें ॥
देतों तुला आज इनाम गांवें । ऐश्वर्य भोगून तुवां रहावें ॥ ५३ ॥
कीर्ती रणीं गाजवुनी हत्यार । घ्यावी अशी हौस असेल फार ॥
विस्तीर्ण या मोंगल-राज-देशीं । केव्हां तरी संधि मिळेल तैसी ॥५४॥
या दुष्ट कर्मा जरि सोडिशील । राज-प्रसादा तरि जोडिशील ॥
होशील मोठा सरदार जो कीं । याहून शोभास्पद काय लोकीं ? ॥५५
तूं कोंवळा केवळ बाळ सान । झाली नसे पंचविशी अजून ॥
नाहीं तुला ठाउक दुःख कांहीं । ऐश्वर्य भोगून सुखांत राहीं"॥५६॥
तो मानभावी खळ खान ऐसें । बोलूनियां वाक्य उगाच बैसे ॥
पाहे न्यहाळून मनोविकार । त्याच्या मनींचे मुखि वाचणार ॥ ५७ ॥
तो शांत-वृत्ती यशवंतराय । ऐकून घे बोलत खान काय ॥
प्रत्युतरा सत्वर देउं लागे । खानास धीर-स्वर-शब्द-सांगे ॥ ५८ ॥
" तूं दिल्लिरा ! क्रूर कृतांत-तुल्य । माझ्या मना झोंबसि जेंवि शल्य ॥
माझ्या हिताची तुज बुद्धि कोठें । तूं सर्व हें दाविसि ढोंग वाटे ! ॥५९॥

---

१ द्रव्य व कीर्ति देणारी.

तो दुष्ट राजा तव तूं हि दुष्ट । असा तुम्ही मोंगल सर्व नष्ट ॥
हांकून व्यापास तुम्हांस कांहीं । उपाय योजूं तरि पाप नाहीं ॥६०॥
माझा असे जन्ममही च माता । अत्यंत ती पूज्य अम्हां समस्तां ॥
येतां तुम्ही तीस विटाळ झाला । तो पाहिजे दोष अशेष गेला ॥६१॥
स्थानीं जया पुण्यद यज्ञ व्हावे । धर्मासही उज्वल रूप यावें ॥
तें दूषिलें बांधुनियां मशीदी । हें शल्य कैसें मज दुःख नेदी[1] ॥६२॥
झाला असा काय नफा अम्हांतें ?। सौख्य प्रजेला घडलें किती तें ?॥
राजे तुम्ही माद तुम्हांस आला। धिक्कारितों यास्तव मोंगलांला ॥६३॥
सर्वस्व गेलें न कुठेहि थारा । नाहीं सुखाचा क्षण एक वारा ॥
साहूं असे हाल सुखेंकरून । झालों नसों मूर्ख असे अजून ॥६४॥
दिल्लीपतीनें अधिकार हा कीं । तूतें दिला थोर अलभ्य लोकीं ॥
तो चालवावा जपुनी इमानें । व्हावें तुवां शोभित पूर्ण मानें ॥ ६५ ॥
विद्या कला-कौशल्य वाढवावें । पूर्वीं दिलें संतत चालवावें ॥
व्यापार शेती दुसऱ्याहि वृत्ती । उत्तेजण्याला तुज संधि होती ॥६६॥
लक्ष्मी घरीं येउन दूर गेली । बुद्धी तुला दुष्ट अशी उदेली ॥
नातें पित्याचें विसरून होसी । वैरी कितींचे तरि जीव घेसी ?॥६७॥
खोटें मदांधा ! करुनी निमित्त । पूर्वीं तुवां जे लुटिले गृहस्थ ॥
अन्यांचिया मागति भीक दारीं। अन्याय कैसा न मना विदारी ?॥६८॥
जे वागती पुण्य-करें स्वधर्मे । त्यांचीं न तूं रोधिलीं काय कर्में ? ॥
कोट्यामधें नाशुन सर्व शर्में । दुष्टा तुवां भेदिलिं लोक-वर्में ॥ ६९ ॥
साध्वी किती बाटविल्या खळा[2]रे !। अंगांत येती स्मरतां शहारे ! ॥

---

१ न देतें. २ सुखें.

तो सद्गुणी भूषण अत्युदार । कां मारिला त्वां अनयेंचि ठार ॥७०॥
वर्णूं किती ते अपराध वाचे । झाले घडे शंभर पातकाचे ॥
होईल जेव्हां गमतें विनाश । आतां कसा इच्छिसि वांचण्यास ? ॥७१॥
निद्रिस्त जे लोक अजून होती । कर्मे तुझीं ज्यांस न कोप देती ॥
त्यां वांचवाया करितों उपाय । हा सांग माझा अपराध काय ? ॥७२॥
स्वातंत्र्य पावो मम जन्म-देश । इच्छा अशी फार असे मनास ॥
नाहीं मला लेश धनाभिलाष । धिक्कारितों त्वत्सम दुर्जनांस ॥ ७३ ॥
स्वातंत्र्य माझें मजला मिळालें । झालों दरिद्री तरि काय गेलें ? ॥
मेलों तरी मत्सम अन्य लोक । होतील देतील तुम्हांस शोक ॥७४॥
जो दावितोसी मजलागिं बाऊ । तें सैन्य दिल्लीहुन येथ येऊ ॥
अंगांत जों हिंमत सांठवेल । तों भांडुनी जाण मरूं खुशाल" ॥७५॥
या मर्मवाक्यें यशवंत ताडी । स्व-शत्रुचें हाणुन चित्त फोडी ॥
ओशाळला खान मनांत फार । विचार याचे बघुनी उदार ॥ ७६ ॥
पाहे असे जाहाले मध्यरात्र । हा एकटा निद्रित जीव मात्र ॥
सर्पाप्रमाणें खवळे अपार । तों घोर त्यातें सुचला विचार ॥ ७७ ॥
कांपे धडाडे नयनांत अग्न । हुंकार टाकी वदनें भयाण ॥
आंठ्या कपाळावर दीसतात । राहे उभा चावित ओंठ दांत ॥७८॥
जों शस्त्र घेऊं यशवंत लागे । तों खान घे तें हिसकून रागें ॥
गर्जोनि मित्रां उठण्यास सांगे । एका क्षणीं ते उठतात मागें ॥७९॥
बोले—तुला सांगत बोध होतों । तों ज्ञात कैसा बधिरास होतो ? ॥
ठेवूं तुला न क्षणही जिवंत । कीं आमुचा तूं करिशील घात ॥८०॥
हे शब्द जों खान वदून जाय । उड्डाण घेतो यशवंतराय ॥

सिंहाप्रमाणें करि गर्जनेला । वाडा तयानेंच घुमून गेला ॥ ८१ ॥
या वेळिं शोभे यशवंतराय । डौलें पुढें ठेवुन एक पाय ॥
आली पुढें रम्य विशाळ छाती । बाहु बळी थोर तटाटताती ॥ ८२ ॥
धिप्पाड ती आकृति चित्त हारी । ये रक्तता पंकज-तुल्य-नेत्रीं ॥
तो खालचा थर्थर ओंठ हाले । मुखांतुनी श्वास सुदीर्घ चाले ॥ ८३ ॥
" गेहांगेना भीति कधीं नसावी । अद्यापि होती मज रीति ठावी ॥
सर्वांवरी जो उपकार दावी । निर्भर्त्सना त्या पुरुषा असावी ॥ ८४ ॥
हे दुष्ट हो ! जंबुक कैसे कशाला । सिंहाचिया चालुन गेहिं आला ? ॥
एका क्षणें धाडिन मृत्यु-पंथें । आतां तुम्ही जाल पळून कोठें ?" ८५
मारी बळें लात दणाण वाजे । ' या वीर हो ! ' जों यशवंत गर्जे ॥
आकाश येतें जणु कोसळून । चित्रासम स्तब्ध दिलीरखान ॥ ८६ ॥
गेल्या दुभंगून महालि भिंती । तेथें दिसूं लागति आंत मूर्ती ॥
येतां पुढें तों अठरा असामी । जे गुप्त होते यशवंत-धामीं ॥ ८७ ॥
केला गदारोळ महाभटांनीं । विकोश केल्या तरवारि त्यांनीं ॥
नेत्रें नयांनींच दिपून गेलीं । गमे जणो वीज फिरे महालीं ॥ ८८ ॥
खानास तों रोहन शौर्यशाली । पाडी बळें हाणुन लात खालीं ॥
देतो उरीं पाउल शस्त्र काढी । पोटामधें कोप उठे धडाडी ॥ ८९ ॥
संधींत त्या शौर्य-बलाढ्य तेथें । जे रोहनाचे प्रियमित्र होते ॥
ते टाकिती सत्वर आंवळून । जे राहिले शेष पठाण तीन ॥ ९० ॥
" मित्रा ! उदारा यशवंतराया ! । दिलीर हा योग्य नसे जगाया ॥

---

१ कमळासारख्या डोळ्यांत. २ घरीं आलेल्या मनुष्यास. ३ कोल्हा. ४ घरीं. ५ मेणांतून काढलेल्या.

आज्ञा मला दे म्हणुनी दयाळा ! । श्वानाचिया कापिन कंठ–नाळा ९१
विश्वास जो यावरि ठेविलास । होऊनियां प्रांजल बोललास ॥
तें श्वान गेला विसरून सारें । मारावया पाहि तुला कसारे ! ॥९२॥
काळीज याचें उलटें पशूचें । बोलों न याचे अपराध वाचे ॥
राहील हा दुष्ट जिवंत साप । देईल आम्हां तरि फार ताप ॥ ९३ ॥
अन्याय-दुःखें रडतात लोक । त्यांचा मुखें वर्णिल कोण शोक ? ॥
रक्तोदकें तो विझवीन आज ॥ आज्ञा जरी दे यशवंतराज" ॥ ९४ ॥
शांतीनें हृदय भरे वदे वदान्य[1] । मित्रांतें प्रिय यशवंत संत-मान्य ॥
"हा श्वान स्वजन–महापमानदायी । हें जाणें परि करिजे विचार कांहीं ९५
इमान यानें जरि मोडिलें असे । परंतु तें आमुचिया मनीं वसे ॥
जया न ठावी नय-नीति-पद्धति । शिको तियेला पशु हा नराकृति॥९६॥

या क्षुद्र मी पशुवरी नच हात टाकीं ।
जाणून कां वरिन थोर अकीर्ति लोकीं ? ॥
आला घरीं म्हणुन वंद्य अम्हांस आहे ।
या सोडितां तरिच शांति मनास राहे " ॥ ९७ ॥
पारिसुन वच ऐसें दोहनें मुक्त केला ।
पळत पळत गेहीं[2] श्वान दिल्लीर गेला ॥
खल–जन–कृत वाक्यें क्षोभ या फार आला ।
परि मग यशवंत स्वांतरीं शांत झाला ॥ ९८ ॥

---

१ उदार. २ आपल्या घरास.

# सर्ग सातवा.

दिल्लिरखान कोट्यांतुन पळुन गेल्याची बातमी गांवभर पसरते—मुसलमान लोकांची धांदल—ते शहरांतून बाहेर निघतात—त्यांवर नागरिक लोकांचा हल्ला—यशवंतराय मध्यें पडून मुसलमान लोकांस शहराबाहेर सुरक्षित पोंचते करितो—कोटा—शहरांतील लोकांस मोंगल गेल्याबद्दल झालेला आनंद—मल्हारराव होळकर बादशाहाचा पक्ष घेऊन कोट्यावर स्वारी करीत आहे ही बातमी दूत आणितात—नागरिक लोकांचें घाबरणें—यशवंतरायाचें त्यांस धीर देणें- होळकरास प्रतिबंध करण्याचे उपाय—यशवंतराय पुण्यास पेशव्याच्या दरबारीं वकील पाठवितो.

### श्लोक.

प्रभात-काळीं दुसऱ्याच दीवशीं । पुरांत वार्ता उठली पहा कशी ?॥
स्व-सैन्य घेऊन भयार्त[1] दिल्लिर । पळून गेला खळ सोडुनी पुर ॥१॥
वधूं बघे जो कमला—सुतान्वत । तया स्थळीं शासन योग्य पावत ॥
प्रभाव जो कीं यशवंत-मंदिरीं । बघे तया पाहुन खानें भी धरी॥ २ ॥
असे तयाचें अति शौर्य-गौरव । करील मन्नाश खचीत वास्तव ॥
पळेन पाहीन पुरा न यावरी । भयें अशा दिल्लिर निश्चया करी ॥३॥
स्व-नायका दूर—गतास ऐकत । भयें पळों लागति दिल्लिराश्रित ॥
मुलें स्त्रिया घालुन गाडियांवर । त्वरेंत घेती पळतां बरोबर ॥ ४ ॥
अशा हि वेळीं दृढ गोल बांधुन । मध्यें करीती गमनास दुर्जन ॥
उभे करीं घेउन शस्त्र भोंवतीं । पठाण रक्षूं निजवित्त पाहती ॥५॥

---

1 भीति.

रथांग[1] शब्दा करिती घडाघडा । पदें हयांचीं[2] नगरीं खडाखडा ॥
उडोन जातां वर धूळ ही दिसे । पैथांत[3] तारंबळ जाहली असे ॥६॥
न वांचवाया क्षम[4] जीव निश्चयें । कुठून त्यांच्या स्थिरता मनास ये ? ॥
कितीक आमां कितिक स्त्रियांप्रती । सुदुर्धरा या समयास टाकिती ॥७॥
महाजनांच्या सुदती[5] सुखी स्त्रिया । असे कधीं हाल न ठाउके जयां ॥
उरीं वरोनी पळती पथीं मुलें । जिवाहुनी काय असेल आगळें ? ॥८॥
पुरीं पुरस्थां पुरताचि चेव ये । जमावया लागति टाकुनी भयें ॥
करून हल्ला यवनांस मारिती । पठाण ही अद्भुत शौर्य दाविती ॥९॥
परंतु मुंग्यांसम झुंडि येउन । पुरांतुनी वर्षति बाण जों जन ॥
समोंति ऐशा प्रळयास पाहुन । सुटे धिराचें यवनांत बंधन ॥ १० ॥
क्षणांत मोडून व्यवस्थित स्थिती । दिसेल तो मार्ग धरून धांवती ॥
उडे तिथे त्या प्रळया न वर्णवे । नवें नवें विघ्न तयांस जाणवे ॥११॥
पुरस्थ संताप-भरांत गुंगले । दिसेल तें माणुस मारुं लागले ॥
स्व-शत्रुच्या शोणित[6]-रंगि रंगले । मदांध रानांतिल हत्ति भासले ॥१२॥
कुराण-निष्णात विशाल-वाग्बल । सुशील काजी रडतात दुर्बळ ॥
उभे समोंती जन हांसती किती । किती करें दाढि धरून ओढिती १३
जुलूम नानाविध दिल्लिराश्रयें । जयां करीतां न कधीं दयाच ये ॥
लपून आतां बसती गृहामधीं । पुरस्थ त्यां शोधुन काढुनी वधी १४
मनोहर श्रीयुत[7] गात्र कांपतें । विलोचनीं लोचन-वारि[8] चालतें ॥
धडाडला धाक उडे उरःस्थळ । दिसे जयांची मुख-कांति विव्हळ १५

---

१ चाकें. २ घोड्यांचीं. ३ मार्गांत. ४ समर्थ. ५ उत्तम आहेत दंत ज्यांचे. ६ रक्त. ७ शोभायुक्त. ८ अश्रु.

रिपु-स्त्रिया घेउन बालकें करीं । पर्यांत येती पडती पदांवरी ॥
रडूनियां प्रार्थिति जीव-रक्षणीं । वरी पहाती भय-लोल दृष्टिनीं १६
हयावरी बैसुन थोर दौडत । स्व-सेवकां योग्य हुकूम सांगत ॥
अशा प्रसंगीं यशवंत पातला । दयार्द्र हें पाहुन सर्व जाहला ॥१७॥
" न कोणि कोणासहि दुःख देउत । हत्यार कोशामार्धि सर्व ठेवुन ॥
घरोघरीं पैार बसून राहुन । घडेल तें स्वस्थ बसून पाहुत ॥ १८ ॥
पुरात जे म्लेच्छ अजून राहती । न कष्ट होतील तयांस संप्रती ॥
परंतु जाण्यास इयून ज्यां मन । सुखेंचि जावोत न त्यांस बंधन" १९
वदून ऐशा वचनास सन्मत । पुढें त्वरेनें यशवंत चालत ॥
विशाल वाडा नृप पूर्व बांधिती । तयास गेला मग तो महामती २०
पुराण-भूपालय सुंदराकृती । धरून संवत्सर चारशें स्थिती ॥
बघे लढाया बहु वेळ तुंबळ । अविंधै तेथें बसले महाबळ ॥ २१ ॥
श्रम-द्रुमाचें वरितात सत्फळ । न होति आतां रजपूत दुर्बळ ॥
निशाण लागे फडकावया निळें । मैरुत्सुताचें वरि चिन्ह चांगलें २२
बघावया सुंदर केंवि तें दिसे । पुरांतलीं धांवति वृद्ध माणसें ॥
सुखाश्रु येतात अलोट लोचनीं । स्व-राज्य-सौख्यें भरती पुन्हा मनीं ॥२३॥
करीति तेव्हां यशवंत-वर्णन । सुयोग्य आशीर्वचनास देउन ॥
"शतायुषी होउन हा सुखा वरो । स्व देश-सेवा परिपूर्ण हा करो " ॥२४॥
जनांस तो दावुन रीति चांगली । करी व्यवस्था नगरामधें बळी ॥
महाजनांची मग संमती बघे । 'पुराधिकारी' यशवंत नाम घे ॥२५॥

१ भयानें चंचल. २ जुना राजवाडा. ३ मोंगल. ४ मारुतीचें. ५ आशीर्वादास.

महारवें डिंडिमें चंड वाजती । जयस्वरें सुस्वर भाट गर्जती ॥
धडाधडा वाजति तोफबंदुका । तुतारिया ही स्वर काढिती निका २६
गुढ्या उभारीति जन स्वमंदिरीं । सुगीत नृत्यादि सुरू परोपरी ॥
स्वतंत्रतेच्या पहिल्याच या दिनीं । सुखावले दिल्लिर-बंध-मोचनीं ॥२७॥
जिथे तिथे उत्सव चालला असे । सुखांत कोटापुर मग्नसें दिसे ॥
पुराधिकारी यशवंत याप्रत । त्वरें भयें येउन दूत सांगत ॥ २८ ॥
" दिगंतरा सत्वर पार भेदिती । मराठि सैन्यें जमवून भोंवतीं ॥
प्रसिद्ध मल्हार यशःसुधाकर । करीतसे चाल बळें पुरावर ॥ २९ ॥
तयास दिल्लीपति लोभ दाखवी । तुम्हांवरी खेचित सिंह पाठवी ॥
अनन्य-सामान्य-पराक्रम स्वतां । पुरावरी येइल जाण तत्वतां ॥ ३० ॥
दिनीं दिनीं चाळिस कोस चालतो । स्थळीं स्थळीं सैन्य-समूह वाढतो॥
लुटीत जाळीत जनास दंडित । जमावितो खंड रणांत पंडित "॥३१॥
श्रवून वार्ता यशवंत घाबरे । म्हणे " दया ईश करी तरी बरें ॥
पुन्हा इथे मोंगल येतिल क्षणें । दिसून आलीं मज सर्व लक्षणें ॥३२॥
लढून घेऊं जय मोंगलांसवें । पळावया लावुं तयांस निश्चयें ॥
परी मराठे जरि येति संगरीं । तयांसवें भांडण कोण तो करी? ॥३३॥
निशाण मोठें भगवें भयंकर । जिथे जिथे जाइल मृत्यु-किंकर ॥
तिथे तिथे वाहति रक्त-वाहिनी । परी मराठे जय जाति घेउनी॥३४॥
धरून भाले लढणार दुर्धर । बळी मराठे करणार दुष्कर ॥
जगामधें ख्यातिस थोर पावले । तयांस भीती रजपूत आपुले ॥३५॥

---

१ नगारे. २ यशोरूपी अमृताचें स्थान. ३ दुसऱ्यास पहाण्यासारखा आहे पराक्रम ज्याचा. ४ लढाईत. ५ मृत्यूचा दूत. ६ रक्ताच्या नद्या.

प्रचंड यांचे जयै-दुंदुभि-ध्वनि । रिपु-स्त्रिया टाकिति गर्भ ऐकुनि ॥
नृपाळ जे बैसति आसनावर । भरे तयां कंप तिथेंच थर्थर ॥ ३६ ॥
जया दिशे स्वार अपार धांवती । तया दिशेचे नृप भीति पावती ॥
दहा दहा कोस पुढेंच येउन । विनम्रशीर्षें करितात वंदन ॥ ३७ ॥
असा बळी वैरि मिळे अम्हांप्रत । न सिद्धता कांहिंच होय सांप्रत ॥
परंतु आहों रजपूत नांवचे । मरूं धनी होउं कसे अकीर्तिचे ॥ ३८ ॥
सहाय जे जे रजपूत भूपती । भिऊन आतां बसतील मागुती ॥
म्हणून आम्हींच पुरास रक्षण । करूं तयारी न बसूं स्थिर क्षण" ॥ ३९ ॥
प्रसिद्ध जे दोहन मान सागर । तयां कथी तो मग शौर्य-सागर ॥
" करील मल्हार पुरासवें रण । कसें करावें तरि त्यास वारण? ॥ ४० ॥
स्वजाति हिंदू असुनीहि हा अरी । विरोध आश्चर्य नव्हे जरी करी ! ॥
स्वजातिचे श्येनैं विहंगैं मारितो । विषांध सर्पापरि मारि काय तो" ४१
तया प्रसंगीं बहु बेत जाहले । न निश्चया कांहिंच वीर पावले ॥
करीति जों युक्ति नव्या नव्या मनीं । उभा भयें राहति मार्गीं येउनी ४२
न साम हा संभवनीय यांसवें । न लोभिया इच्छित दान देववे ॥
न भेद चालेल मराठियांवर । उपाय तो शेवटलाहि दुष्कर ॥ ४३ ॥
सुनम्र होऊं विनवून यांप्रती । प्रकार हा क्षत्रिय निंद्य मानिती ॥
जरी दटावूं हंसतील दुर्मती । तयांपुढें शक्ति अह्मांस ती किती ॥ ४४ ॥
सहाय आम्हां नृप कोण होइल ? । न साह्य कोणी व्यसैनांत देइल ! ॥
समग्र सूत्रें दरबारचीं करीं । धरून खेळे रिपु हा बहू परी ! ॥ ४५ ॥

१ विजयसूचक नौबतीचे शब्द. २ नम्र मस्तकानें. ३ ससाणा. ४ पक्षी. ५ संकटांत.

जे या भारतं-वर्ष-काननिं महाभूपाल ताले-द्रुम ।
शिंदे होळकरादि हे गजंशिशू भंगावया त्यां क्षम ॥ ४६ ॥
यांचा यूथ-पँती बलाढ्य नृपती बल्लाळ-शर्मांकित ।
राहे दक्षिण-देशिं पुण्य–नगरीं शोभाकरीं सांप्रत ॥ ४७ ॥
शरण जरि रिघावें पेशव्याच्या पदातें ।
तरि मग पळवावें सर्व ही आपदांतें ॥
अभिमत पुरुषांचे तो अभिप्राय जाणी ।
पुर–पति मग ऐशी युक्ति चित्तास आणी ॥ ४८ ॥
स्वपक्ष बोलेल पुण्यास जाउन । सुदक्ष ऐसा द्विज एक पाहुन ॥
निजोक्त सांगून तया सविस्तर । पुण्यास धाडी यशवंत सत्वर ॥४९॥
चतुर वचन–विद्वान् शास्त्र–विद्या–प्रवीण ।
विमल चरित ज्याचें ज्या अनंताभिधान ॥
द्विज हळु हळु कंठी दक्षिणेचा प्रवास ।
निजजन–हित होतें इष्ट ज्याच्या जिवास ॥ ५० ॥

---

१ हिंदुस्थान हेंच अरण्य यांत. २ मोठे राजे हेच ताडाचे वृक्ष. ३ हत्तींचे छावे. ४ कळपाचा नायक. ५ बल्लाळ नांवाचा (बाळाजी बाजीराव.)

# सर्ग आठवा.

लढाईची तयारी—शहराचा बंदोबस्त—रात्रीचे पहारकरी—यात्रेकरूचा वेष घेऊन शहरांत शिरलेला मल्हाराव होळकर व यशवंतराव यांची गांठ—त्यांचें संभाषण—मल्हारराव निघून जातो.

## श्लोक.

आज्ञा करीतो यशवंत लोकां । येईल केव्हां न कळेचि धोका ॥
या कारणें सावध सर्व व्हावे । आपापलें काम करूं झटावें ॥ १ ॥
हे धीर पैरांप्रत वीर मोठा । " राखूं हठानें समयास कोटा ॥
वर्षोनवर्षे झगडूं श्रमानें । जाऊं मराठयांस न हार मानें ॥ २ ॥
राहेल जों एक जिवंत पैर । ठेवील खालीं न कधीं हत्यार ॥
ज्या जन्म-भूमीवर जन्म त्याचा । अव्हेर नाहीं करणार तीचा" ॥३॥
तटावरी ठेउन तोफखाना । तयार यंत्रें दुसरींहि नाना ।
करांत घेती तरवार पैर । पुन्हा पुन्हा लाविति दृष्टि दूर ॥ ४ ॥
जेथें जिथे कोसळुनी तटाला । झाला असे भंग तिथे तयाला ॥
लावून कारागिर नीट केलें । तें काम होतां दिन आठ गेले ॥ ५ ॥
येती मराठे कवण्या प्रकारें । जाणावया उत्सुक होति सारे ॥
वार्ता कळाया बहु दूर दूत । हुशारसे पाहुन धाडितात ॥ ६ ॥
कोण्या प्रकारें कपट-प्रवेश । होईल त्यांचा न कळेचि लेश ॥
शूरासवें युद्धिं न भीति कांहीं । धूर्तापुढें चालत शक्ति नाहीं ॥ ७ ॥
घेण्यामधें दुर्गम दुर्ग मोठे । कौशल्य जें दाविति कीं मराठे ॥
जें शौर्य त्यांचे लढण्यांत आहे । स्वप्नामधें चित्र उभेंच राहे! ॥ ८ ॥

लावून दृष्टि क्षितिजास तीक्ष्ण । घेऊन हातांत धनुष्यबाण ॥
तटावरी रात्रि उभा शिपाई । कंटाळुनी झोंप तिथेच घेई ॥ ९ ॥
स्वप्नामधें पाहतसे मराठे । धाके, तयाचें मग ऊर फाटे ॥
'धांवा ! उठा ! शत्रु समीप आला । जागा असें बोलुन नीट झाला १०
गेलें फुलोनी वन काजव्यांनीं । वाटे तयाला परि दीप कानीं ॥
हळूच बोलावुन सोबत्यांला । विचारितो-'काय म्हणाल याला?'॥११॥
पूर्वेकडे धूम्रसमान कांती । क्रमें पयोदाकृति ऊठताती ॥
वाटे धुळीचे दिसतात लोट । वेगें वरी धांवति ते अलोट ॥ १२ ॥
होता न कोणा प्रतिबंध याया । कोटयांत मार्गस्थ जनां रहाया ॥
त्यातें न्यहाळून परी पहावें । चित्तांत शंका उठती स्वभावें ॥ १३ ॥
सूर्यास्त व्हाया अवकाश आहे । तों वेस प्रत्येकहि बंद राहे ॥
होतां घडी दोन दिन प्रभातीं । द्वारें खुलीं सर्व जनास होती ॥१४॥
घोड्यावरी बैसुनि रात्र सारी । हिंडे पुरीं मुख्य पुराधिकारी ॥
देखे जरी तो भय-हेतु कांहीं । तेथें स्वतां जाउन नीट पाही ॥१५॥
एका प्रसंगीं पुर रक्षण्याला । जातां दिसे थोर उजेड त्याला ॥
पाहे तिथे देउळ एक थोर । पांथस्त वस्ती करितात फार ॥ १६ ॥
मार्गीं तिथे चार उभे शिपाई । लोकांस पृच्छा करितात कांहीं ॥
ऐकोनियां उत्तर शंकतात । पुन्हा पुन्हा त्यांस विचारतात ॥ १७ ॥
"आलांत कोठून कशास येथें ?। जाणार कोठें ? कवण्या स्वपंथें? ॥
आहे तिथे काम कसें कुणाचें ? द्या लोकहो ! उत्तर नीट याचें" १८
खोदून खोदून विचारितां हें । संतापला पांथ-समूह राहे ॥
शस्त्रें उगारुं बघतात कांहीं । गेले बिचारे भिउनी शिपाई ! ॥ १९ ॥

झाला पुढें तों यशवंतराय । तों वंदिती रक्षक नम्र पाय ॥
" इच्छा तुझी पूर्ण करावयाला । आम्हीं इथें हिंडतसों दयाळा !" २०
पुराधिकारी यशवंत बोले । हळूहळू सैनिध धीट चाले ॥
" हे लोकहो ! श्रेष्ठ तुम्हांत कोण । येवो पुढें निर्भय त्या बघेन॥२१॥
कोठून आला मजला कळेल । शंका मनांतील तदा पळेल ॥
कोटा–पुरी रक्षण मीं करावें । विचारितों संप्रति याच भावें"॥ २२ ॥
तों एक धिप्पाड पुरूष आला । पुढें उभा धीर पदें रहाला ॥
उग्राकृती नेत्र लहान काळे । सदा जयांचा व्यवहार चाले ॥ २३ ॥
बोले–" आम्ही केवळ सुस्वभाव । आलों इथें हिंडत गांवगांव ॥
यात्रेकरू काशिहुनी निघालों । रामेश्वरा दक्षिण–देशिं चालों ॥२४॥
सूर्यास्त होऊन निशा उदेली । कोटयामध्यें यास्तव वस्ति केली ॥
विश्रांति आम्हांस अवश्य झाली । जाऊं उद्यां येथुनियां सकाळीं॥२५॥
संसार सोडून सुखें तयाची । भक्ती करूं संतत ईश्वराची ॥
हीं राजकार्यें अमुच्या न पंथीं । चित्तांतही यास्तव तीं न येती॥२६॥
तूं धार्मिकां रक्षसि थोर कष्ट । भोगून पुण्याकर धर्म–निष्ठ ॥
खोटी अशी कीर्ति गमे मनाला । देतोस पीडा दुबळ्या जनाला॥२७॥
माझा गुरू पावन देवळांत । ब्रम्हैक–चिंता बसला करीत ॥
होवो न त्याला गलबा म्हणून । जावें तुवां हें विनवीन दीन "॥२८॥
बोले असा ऐकुन उक्ति सारी । तीक्ष्ण-स्वरें काय पुराधिकारी ॥
" हीं वाटती केवळ सर्व ढोंगें । न्हावें कशाला तुज शस्त्र संगें ?॥२९॥
कीं भासतें स्वप्न असें मनाला । संसार नाहीं अजुनी त्यजीला ॥
अंगीकरी तीन नवीन वार । कोठील हें सांगसि एकवार ! ॥ ३० ॥

ही दुग्ध मांसादिक-सेवनानें । अंगावरी उज्वल कांति जाणें ॥
ही दंडितां देह कशी मिळावी ?। हिंडोनि तीर्थे तरि केंवि यावी ? ३१
नेत्रांतलें तेज भयाण मुद्रा । दावी विशेषें कृति फार घोरा ॥
अद्यापि वाटे तुमचा न काम । घातें पराच्या करितो विराम ॥ ३२ ॥
या सर्व पाहूनच लक्षणांतें । आतां सुचे गोष्ट अशी मनातें ॥
बाणा शिपाई धरितां समस्त । आयुष्य गेलें समरांगणांत ॥ ३३ ॥
वंचावया दावुन वेष खोटा । आलास येथें असुनी मराठा ॥
आम्ही पुरीं काय करूं पहाया । तूं इच्छिसी गुप्तपणें रहाया ॥३४॥
यासाठिं तूं दंड्य गुरू तुझाही । व्हावी तुम्हांला न कधीं क्षमाही ॥
कारागृहीं बैसवितों पहाल। तेथून कर्से आमुचीं खुशाल ! " ॥ ३५ ॥
तों बोलला तो परका मनुष्य । " आम्हीं गुरूचे प्रिय पादशिष्य ॥
मारा धरा काय रूचे करा तें । आम्हां, न सोसूं शिवतां गुरूतें "॥३६॥
तो सेवकांतें जवळील सांगे । तेव्हां प्रतापी यशवंत रागें ॥
" कोठें गुरू? कोठिल शिष्य कोण ?। बांधा तुम्हीं या सकळां धरून " ३७
तों आंतुनी एक पुरुष आला । ज्या साठ वर्षे असती वयाला ॥
दाढी मिशा डोकिवरील केश । सुशुभ्र ज्याचे जणु काय फेंस ॥ ३८ ॥
घारीप्रमाणें बहु तीक्ष्ण नेत्र । बांधा बळी उंच शरीर गौर ॥
छातीमधें रुंद मुखीं उभार । अंगावरी शोभति आठ वार ॥ ३९ ॥
आला पुढें—बोलत शब्द काय । ऐकून घेतो यशवंतराय—, ॥
अम्हांस तूं बांधुन नेसि बाळा ! । आलें न हें आजवरी कपाळा ! ४०
मी कोण ? तूं ओळखिसी मला कीं ? । मल्हार मातें वदतात लोकीं ॥
छत्तीस वर्षे करुनी सुयुद्ध । मल्हार मी होळकर प्रसिद्ध ॥ ४१ ॥

जो बाजिरावा उजवाच हात । ज्यातें मराठे सगळे चहात ॥
रामेश्वरापासुन लांब दिल्ली–। पर्यंत ज्याची गुण-कीर्ति गेली ॥ ४२ ॥
जो रोहिल्यांतें हि पराभवीता । कीं जो मराठे अटकेस नेता ॥
बंगालचे इंग्रज ज्यास भीती । ज्या पाहतां शीक पळून जाती! ॥ ४३॥
जिंकी बळें जो समरीं निजाम । जिंकावया ज्या भुवनास काम ॥
झुंजोनि घेतां वसई फिरंगी । ते जाणती यब्दल त्या प्रसंगीं ॥ ४४॥
त्या तूं मला बांधुन काय नेसी? । वांछा अशी दुर्घट कां धरीसी ॥
मी एक. पन्नास तुझे शिपाई । ये तूं हि.होसिद्ध.करूं लढाई" ॥ ४५ ॥
मल्हार बोले जंव या प्रकारीं । मागें सरे शूर पुराधिकारी ॥
तो दृष्टि शत्रूवरि नीट देतो । भीती न पावून सकंप होतो ॥ ४६ ॥
जो हा मराठ्यांत महापुरूष । भीष्माउणें ज्यास न वीर्य लेश ॥
होता जरी शांतपणें पहात । त्या पाहतां नेत्र दिपून जात ॥ ४७ ॥
पाहे वरी.काय विचार चाले । बोले मधें अस्फुट ओंठ हाले ॥
इच्छा नसूनी मनिं हात गेला । खड्गाकडे, स्तब्ध उभा रहाला ॥४८॥
बोले पुन्हा तो यशवंत धीर । " मल्हार तूं होळकर प्रवीर ॥
कोणासही माहित कीर्ति नाहीं? । भ्यालों तुला पाहुन मी न कांहीं !४९
तूं दिल्लिच्या बादशहास साह्य । देतोस त्याचें करितोस कार्य ॥
जिंकावया हें पुर येथ येसी । अयात तूं वैरि अम्हांस होसी ॥ ५० ॥
सन्मान जो योग्य तुला असावा । तो या प्रसंगीं हि कसा न द्यावा ?॥
कीं शास्त्र–विद्या तुजपासुनीच । घेती मराठे जन थोर नीच ॥५१॥
तूं बाजिरायास अमूल्य साह्य । देऊन झालास कृतार्थ आर्य ॥
लक्षावधी वीर तुझी धरीती । आज्ञा शिरीं भीति अरींस देती ॥ ५२ ॥

तो तूं हिरा पूज्य महोपयुक्त । येथें तुला हो लय हें न युक्त ॥
जा आपुला पंथ धरीं खुशाल । राहूं नको या पुरिं दीर्घकाळ ॥५३॥

जो हिंदु-भूमि-गगनीं शशिसा विराजे ।
नक्षत्रसे विहत-तेज जयास राजे ॥
अज्ञात हें स्थळ अशा समयीं तयाला ।
धाडून अस्त-गिरिला न वरीं जयाला ॥ ५४ ॥

आहेस तूं नगरिं हें समजून लोक ।
येतील होइल कसें मग? तूं विलोक ॥
होती तवानुचर संनिध सात आठ ।
आहे अम्हांजवळ सैन्य पुरीं अफाट ॥ ५५ ॥

आचार्य तूं सकल शस्त्र-धरीं वरिष्ठ ।
व्हावें तुशीं रण असें म्हणतों मनांत ॥
इच्छा असे बहु मनीं.परि हान काळ ।
येईल तो सुदिन.साधिन योग्य वेळ! " ॥ ५६ ॥

हे शेवटील मग ऐकुन धीट शब्द ।
मल्हारराव हंसला करि सिंह-नाद ॥
आहे तुझें वय लहान परी उदार ।
चित्तें, म्हणून मज आवडतोस फार ॥ ५७ ॥

तूं युद्ध एक समयीं हि न पाहिलेंस ।
माझ्या सवें रण कसें मग इच्छितोस? ॥
जा.शीक जाउन अजून बहूत वर्षें ।
हें शस्त्र-शास्त्र गहनांबुधि-तुल्य भासे! ॥ ५८ ॥

येऊन येथ दिन आजच दोन झाले ।
हें धुंडिलें नगर जेंवि मनास आलें ॥
जाईन येथुन पुन्हा स्वजना मिळेन ।
झाले तुझे परिसुनी वच तुष्ट कर्ण ॥ ५९ ॥
मल्हार वाजवि तुतारि पुढेच चाले ।
चारी दिशेकडुन लोक तिथे मिळाले ॥
हे गुप्त हेर सगळे मिळती क्षणांत ।
स्वच्छंद जाति धरुनी निज नीट पंथ ॥ ६० ॥
ही बातमी पसरली नगरांत पूर्ण ।
वेशीवरील जन सावध होति तूर्ण ॥
गेले परंतु रिपु कोण पथें कळेना ।
कोटयामधें करिति नागर तर्क नाना ॥ ६१ ॥
आकाशांतुन शत्रु हा उतरला कीं काय कोटापुरीं ।
किंवा भूमि विदारुनी उसळला खालून भासे वरी ॥
गेला कोण पथें कसा म्हणुनियां चिंता पडे नागरीं ।
तों वार्ता उठली पुरावर उद्यां मल्हार हल्ला करी ॥ ६२ ॥

---

# सर्ग नववा.

मराठी फौजेची कोट्यावर चाल—बिनी—लढाऊ हत्ती—जरीपटका—स्वार—तोफखाना—पायदळ—मराठे लोक कोटा—शहराच्या वाटा बंद करून भोंवतालचा प्रदेश उध्वस्त करितात—मल्हारराव होळकराकडून कोटा-शहर आपले ताब्यांत देण्यासाठीं यशवंतरायास ताकीद—त्याचें उत्तर—मराठ्यांचा शहरावर हल्ला—रजपूत लोक त्यांस मागें हटवितात—मल्हारराव कोटा-शहरास वेढा घालून बसतो.

श्लोक.

सकाळीं पुरस्थां जनां वीर मोठे । दुरूनी दिसूं लागले ते मराठे ॥
खडे स्वार ते पांचशें एक ठायां । अशा येति टोळ्या लढाई कराया ॥१॥
बिनी चालली ही पुढें थोर वेगें । उन्हामाजि तेजें कशी शोभुं लागे !
कसे दक्षणी उंच हे थोर घोडे । हजारों तयीं बैसुनी स्वार दौडे ॥२॥
निळे जांबळे पांढरे लाल वेष । फुलोनी जणों टाकिती तो प्रदेश ॥
उडे वायुनें लोळ जैसा धुळीचा । करी धुंद साऱ्या दिशा लोट त्यांचा ३
उभारून डोलें वरी नीट कान । वरी तोंड खिकाळती जे करून ॥
जरी वीस चालोनियां कोस आले । तरी अश्व हे थोर वेगें निघाले ॥४॥
तिरासारखे एक रेषेंत जाती । तसे नीट जातील वाटे दिगंतीं ॥
जमीनीस लागेल पाऊल कैसें । हवेंतून नेती मनुष्यांस भासे ॥ ५ ॥
वरी स्वार ही ठेविती नीट मांड । स्वभावें सहीं दाविता वेग गाढ ॥
निमित्तास डाव्या करीं घे लगाम । दुजा हात कांहींच पाहे न काम ६
तयांचीं दिसूं लागती नीट गात्रें । कशीं चालतां हालताती शिरस्त्रें[1] ॥

---

1 डोळ्याचें संरक्षण करण्याचीं जिरे टोप वगैरे साधनें.

चकाकोनि नेत्रां दिपावीति शस्त्रें । सुसाटें उडूं पहाती रम्य वस्त्रें ॥७॥
तयां मागुनी हत्ति येती प्रचंड । वरी त्यांचिया नौबती वाजतात ॥
वरी सोंड डौलें पदें टाकितात । स्वशब्दें दिगंता जणो फोडितात ८
नयां वंदिता भूपती सर्व देशीं । निशाणें तयां मागुनी येति ऐशीं ॥
जरी येइ धोका तयां प्राण द्याया । उभे भोंवतीं स्वार त्यांतें जपाया ९
महावीर मागें मराठे कुलीन । त्वरें वाहनीं दिव्य येती बसून ॥
पदें श्रेष्ठ ज्यांचीं जसे स्वाधिकार । तशीं वाहनें त्यांस नाना प्रकार १०
महाडीक मानी इमानी पवार । किती भोंसले इंगळे बांड शूर ॥
तसे मोहिते आणि शिंदे चवाण । तया सैन्य-भागांत शोभायमान ११
मधें शोभला चंद्र मल्हारराव । दिसे थोर गंभीर शांत स्वभाव ॥
हजारों प्रसंगीं परी उग्रवीर्य । जयानें जगा दाखवीलें अवार्य ॥१२॥
तया मागुनी चालतो तोफखाना । दुजीं युद्ध–साहित्य–यंत्रेंहि नाना ॥
जयांची कृती ख्यात लोकीं अचाट । पदाती असे कंठिती धीट वाट १३
व्यवस्थेंत येतात मागून सादी । तयांची मिती बापुडा कोण बांधी ? ॥
धरोनी जिहीं ख्यात भाले विशाल । करीं कांपवीले अरी कांहि काळ १४
असें सैन्य भासे समुद्रोपमेय । धुळीचे वरी लोळती लाट काय ! ॥
निशाणें शिडें शोभती तीं नभांत । मधें पोहते नक्र हत्तीच होत १५
करी शब्द डंका दिगंतास गाजे । गदारोळ ही वीर वीरांत माजे ॥
पहा अश्व खिकाळती एक काळीं । समुद्रास त्या गर्जना योग्य झाली १६
तटापासुनी पाव कोसांत आली । बिनी येउनी थांबती तेथ झाली ॥
यशस्वी करी तों सुरू तोफखाना । उडे तोफ पंनास नादें दणाणा १७

---

१ स्वार. २ यशवंतराय.

मराठ्यांत जो पूर्व संकेत होता । व्यवस्थेत त्या सैन्य-संभार येतां ॥
तटाभोंवतें सैन्य गेलें अफाट । पुरांतून बाहेरची बंद वाट ॥ १८ ॥
उभ्या राहुट्या तंबु झाले क्षणांत । तिथे धान्य बाजार आले समस्त ॥
जसें काय तेथें वसे थोर गांव । अशी गार्दि वाटे न मुंगीस वाव १९
त्वरें जाति पेंढार ते भोंवताले । जसे लांडगे काय खाया मिळाले ॥
लुटाया धराया जयां एक काम । न भाल्यांस ज्यांच्या मिळाला विरीम२०
घरें वेशिबाहेरचीं दग्ध केलीं । लुटूनी गुरें धान्य-वित्तादि नेलीं ॥
न कोणास कोटयांत व्हावा प्रवेश । न बाहेर यायास ही संधि लेश२१
दिसे छावणी शत्रुची जों अपार । गमे काय कल्पांतिचा हा समुद्र! ॥
मधें बेट कोटा उरे एक बिंदू । क्षणें ग्रासिता यास होईल सिंधू २२
असे मुख्य कोटयामधें कामदार । यशस्वी जनां शासिता जो उदार॥
तयालागिं मल्हार धाडी निरोप । पुरस्थां जनां दाविता उग्र कोप२३
"तुम्हीं युद्ध-साहित्य जें काय केलें । त्वरें पाहिजे आमुच्या हातिं आलें"॥
जरी ठेवितां हातचें शास्त्र खालीं । क्षमा दिल्लिरा मागतां याच काळीं२४
दयेनें तरी जाउं देऊं तुम्हांला । अशा युक्तिनें भीति नाहीं जिवाला॥
तुम्हीं बायका लेंकरें आप्त घ्यावे । सवें शीघ्र बाहेर आतां निघावें २५
तुम्ही जातिचे हिंदु धर्माभिमानी । अशी ऐकितों कीर्ति मोठे इमानी ॥
म्हणूनीच दावूं दया इच्छितों ही । क्षमा बंडवाल्यांस न्यायें न कांहीं२६
उदेली जरी दुर्मती पौर लोकां । स्वकृत्येंचि ते पात्र होतील शोका ॥
नद्या शोणितांच्या इथे वाहतील । मिळूं चंबळेच्या जळा धांवतील २७
म्हणूनी मती आयकावी हिताची । न कोटयास आशा धरा रक्षण्याची॥

१ विश्रांति. २ रक्ताच्या.

सर्व वित्त घेऊन बाहेर जावें । अमूल्या जिवा सर्व यत्नें जपावें ॥२८॥
न जाती न धर्मा न कर्मा न शर्मा । अम्ही पाहतों आचरीतां स्वधर्मा॥
तुम्ही सर्व ही दंडनीय प्रभूतें । बळें येथ आलीं तयाचीं प्रभूतें " २९
निरोप प्रकारें अशा दूत नेत । यशोधीस जो जाउनी सांगतात ॥
तयाचे जळे चित्त कोपानळानें । स्वमित्रांस बोलाविलें शूर त्यानें ३०
"कसें काय हो ? मित्र माझे उदार । करावा कसा संकटीं या विचार? ॥
अशी वेळ आली. खरें धैर्य दावा । असे शक्ति तो या प्रसंगास लावा ३१
कसा बेत तो होउं द्या एकदाच । नको तो पुन्हा थोर चित्तास जाच॥
जरी पाहिजे कीर्ति व्हावें पुढार । जिवाचीच आशा तरी जाल दूर३२
विचाराल माझा जरी बेत आतां । मला ये कधीं ही न मार्गे पहातां ॥
असा एकटा शत्रु-सैन्यीं पडेन । खऱ्या मी मराठ्याप्रमाणें मरेन " ३३
असें ऐकतां वाक्य त्याचें विरक्त । तया सांगती ओरडोनी समस्त ॥
'मरूं बाजुला बा! तुझ्या देश-भक्ता! दिली लात गेहा मुलां स्त्रीस वित्ता'३४
करी गर्जना ऐकुनी हें प्रमोदें । निरोपास दूतासवें काय तो दे ॥
"मराठे तुम्हीं मार्ग-दर्शी न आम्हां। अम्ही जाणतों आपुल्या पूर्ण कामा३५
असे एक ठावा अम्हां मार्ग नीट । न सोडूं कधीं जन्म-भूमीस धीट ॥
जमीनीस कोट्यांतल्या रक्त वाहूं । मरूं जागच्या जागिं येथेंच राहूं ३६
तुम्हां वाटलें दावितां भीति मात्र । पळूं टाकुनी हातचें काय शस्त्र ?॥
तुम्हीं रोहिल्यां मोगलांतें दटावा । न या देशिं कोणास ही धाक ठावा ३७
तुम्हीं देशदेशीं फिरोनी मराठे । अरी जिंकिले हें न आश्चर्य वाटे ॥
कसें काय तें युद्ध-कौशल्य पाहूं । उभे जेधवां झुंज द्यायास राहूं "३८

---

१ सुखास. २ पुष्कळ. ३ यशवंतरावास. ४ घरास.

असे ऐकतां शब्द मल्हार कानें । तयाच्या मनीं क्रोध अत्यंत बाणे ॥
हिताची कथा सांगतां उत्तरातें । अशा देति तस्मात् घडो जें घडे तें! ३९

जाळिन पोळिन नाशिन नेइन सर्व लया ।
दाविन कोप कसा असतो मम भ्रू-वलया ॥
नागर नाकुन नांगर या नगरीं फिरवीं ।
पाडिल दाहि दिशांस उजेड सुकीर्ति-रवी " ॥ ४० ॥
बोलवि तो सरदार हुशार उदार-मती ।
जे निज शौर्य-बलें जित कीर्तिसवें रमती ॥
येउन लीन पदें सुकुलीन शिरीं नमिती ।
जाणवितां रिपु-भाषण कोप विषा वमती ॥ ४१ ॥
होळकरें मग त्यांस हुकूम असा दिधला ।
" घेउनियां अपुलीं पथकें पुर घेउं चला ॥
चौंहिकडे उठुनी करु एक उठाव उठा ! ! ! ॥
तुंबळ संगर-संगत कीर्तिस घेउं झटा ! " ॥ ४२ ॥
एकसरें रण-पंडित खंडित-शत्रु-मद ।
गर्जति वाजति डिंडिम चंड रिपु-श्रमद ॥
जाय पुरें भरुनी नभ-मंडळ तूर्य-रवें ।
घोष तसे उठती नरे-केसरिंचे बरवे ॥ ४३ ॥
चाळिस एकच काळिं धडाधड तोफ सुटे ।
होति दिशा बहु धुंद कळे नच कोण कुठे ॥
थोर जरीपटका कटकावरि उंच दिसे ।

१ नगारे. २ नरश्रेष्ठांचे. ३ सैन्यावर.

गर्जोनि धांवति वीर-समूह समुद्र जसे ॥ ४४ ॥
सुंदर उंच गृहें हि धडाधड कोसळती ।
सांपडती किति लोक मधें मरती पडती ॥
उंच असें स्थळ पाहुन पौर तिथें जमती ।
भीति-भरें रण तुंबळ हें बघुनी भ्रमती ॥ ४५ ॥
पाहुन हें यशवंत न लेश हि घाबरला ।
घेउन नागर एक मनें तट रक्षि भला ॥
वीज जसा हिकडे तिकडे फिरतो चपळ ।
फार सहाय्य करी स्वजनां न बसेच पळ ॥ ४६ ॥
तीन हि वेळ तटावर चालुन होळकर ।
येइ परी परते झुजतां प्रहरोप्रहर ॥
साहुं शके भडिमार तटावरला न भट ।
येइ पुढें चवथ्या समयीं नच सोडि हट ॥ ४७ ॥
त्या दिवशीं जय त्या मिळतां अगदीं न दिसे ।
अस्त रवीस घडे म्हणुनी मग शांत बसे ॥
युद्ध सुरू करुनी दुसऱ्या दिवशीं उठला ।
वेढुन नागर तीन असा महिने झटला ॥ ४८ ॥

# सर्ग दहावा.

शहराच्या तटावर लढण्याची तयारी–तट घेण्यासाठीं मराठ्यांचे निष्फळ प्रयत्न—मराठे तटास खिंडार पाडून हल्ला करितात–रजपूत मागें हटतात—यशवंतराय त्या स्थळीं येऊन रजपूत लोकांस उत्तेजन देतो—पुन्हा लढाई—मराठे मागें हटून आपल्या छावणींत येतात—मल्हारराव कोटा-शहरास वेढा घालून पुन्हा बसतो.

**आर्या.**

मल्हारराव कोटा–शहरींच्या वेढुनि तटा बसला ॥
झटला हठें जरी तरि  न चले त्याचा उपाय ही कसला ॥१॥
जो काळ्या पाषाणीं  बांधियला उंच पंधरा हात ॥
वेढुन कोटा–शहरा  सर्पासम तीन कोसहि रहात ॥ २ ॥
डौलें बुरूज त्यावरि  जाती गगनास काय भेटाया ॥
उचलुन काय शिरें हीं  बाहे पांथांस नगर 'भेटा ! ! या !!! ' ३
होत्या त्या शहराला  एकंदर वेशि थोरशा चवदा ॥
प्रत्येकीवर तोफा  स्थापी यशवंत शत्रुला भयदा ॥ ४ ॥
एकेका वेशीवर  ठेवियले पांच पांच शत योध ॥
त्यावरि कुलीन शूर  स्वजन नियोजी स्वयें करून बोध ॥५॥
निवडुन चार हजार  श्रुत–बल भट ठेविले महाभागें ॥
मागें, कीं समयाला  चालुन जातील अरिवरी रागें ॥ ६ ॥
जी जी व्हावि तयारी  युद्धाला हो तयार ती सगळी ॥
श्रीमंत सभ्य लोकीं  भांडारें उघडिलीं म्हणुन अपुलीं ॥ ७ ॥

दिल्लिरखानें लोकां वागविलें दुष्ट रीतिनें म्हणुन ॥
आधींच नागरांचें त्याविषयीं क्षुभित होय फार मन ॥ ८ ॥
यशवंताच्या वाक्यें होता सर्वांस चेव बहु आला ॥
जो तो सावध होता कीं न पडो शत्रुचा पुरीं घाला ॥ ९ ॥
कोटा–नगर पुन्हा जरि बादशहाच्या करामधें जातें ॥
नाहीं धडगति आम्हां वाटे ऐसें पुरांतिल जनातें ॥ १० ॥
स्वाधिन जालों जरि तरि करितिल जाळून सर्व ही राख ! ॥
क्रूर मराठे नेतिल घरदार लुटून हा असे धाक ॥ ११ ॥
त्यांतुन रजपूतांच्या शौर्याचा कीर्ति–दुंदुभी वाजे ॥
झाले त्यास मराठे नाशक मत्सर असा मनीं माजे ॥ १२ ॥
होती हिंमत अंगीं भरली नूतन न जाहले क्लेश ॥
होळकरातें यास्तव नागर भ्याले न शूर ते लेश ॥ १३ ॥
मल्हारराव ऐसें समजत होता मनामधें पूर्ण ॥
पाहुन भाले भ्याले स्वाधिन करितील पुर अरी तूर्ण ॥ १४ ॥
जेव्हां परंतु त्यानें यशवंताचा निरोप आयकिला ॥
झाला निराश मानी वेढा घालुन तटा हठें बसला ॥ १५ ॥
रात्रंदिवस धडाडे तोफांचा मार मोर्चियांवरून ॥
झणणण जाती गोळे आपटाति तटावरि त्वरेंकरून ॥ १६ ॥
नेत्र–कटाक्षें पाहे जैसी रंभा बुधा शुका मोहूं ॥
ब्रह्मानंद–परायण परि तो योगींद्र काय वद तो हूं ॥ १७ ॥
तैशाच मराठ्यांच्या तोफा भंगावया तटा बघती ॥

---

१ लवकर.

पौक्त वयें वृद्ध असा स्थिर साहे तट विटंबना मग ती ।। १८।।
कीं गलबलाट ऐकुनि पोरींचा कोप पावला वृद्ध ।।
धिक्कारुनि डौलानें राहे जाग्यावरी उभा क्रुद्ध ।। १९ ।।
लावुनि शिड्या चढावें धरिला हट यापरी मराठ्यांनीं ।।
ते झोडिले पुरजनीं सहज ससे जेंवि काय काठ्यांनीं ।।२०।।
धैर्यें रागांत उभे रजपूत अचंचल-स्थिति रहाती ।।
येतां जवळ मराठे शस्त्रें धरितात एकदम हातीं ।। २१ ।।
भाले बर्च्या फेंकिति रागें धरिती मनीं अहंकार ।।
'सूं सूं सणणण' सुटती बाण धनुष्यें करीति टंकार २२
संतप्त पौर वर्षति कढयांतुन फार तापलें तेल ।।
ढकलिति दगड धडाधड ऐशा प्रळयांत कोण वांचेल? २३
लावुन शिड्या तटाला वर जाणें कर्म हें असे खोटें ।।
हटती शूर मराठे आश्चर्यें वदनिं घालिती बोटें ।। २४ ।।
मग ते सुरुंग लावुनि यत्नें बघती तटीं करूं भंग ।।
परि तो अभंग राहे घडिलें ओतून लोह जणु अंग ।। २५ ।।
पहिल्या आठा दिवशीं युद्धांत सहस्र दोन भट पडले ।।
मेले शूर गुणी किति त्यांचे बहु मित्र सोयरे रडले ।।२६।।
मेले तसेचि समरीं पौरांचे पांच सातशें वीर ।।
हानी मोठी झाली परि त्यांनीं सोडिला न लव धीर ।। २७ ।।
एके रात्रीं बसला होता तंबूंत वीर होळकर ।।
ज्या पौर-शौर्य वदलें व्यर्थोद्यम[1] तूं असाच चोळ कर।।२८।।

---

1 फुकट आहे प्रयत्न ज्याचा.

तों वार्ता त्यास कळे जिंकाया नगर युक्त हा समय ॥
ईशान्येस सुरुंगें तट ढांसळला घडे महा प्रलय ॥ २९ ॥
आवेशें मग वदला "जे माझे म्हणविती खरे मित्र ॥
येतिल माझ्या मागुन ऐशा समयीं धरून करिं शस्त्र" ॥३०॥
ती भव्य दिव्य मूर्ती उत्साहें भरून शोभली फार ॥
गेली छाती दाटुन चमके नेत्रांत तेज अनिवार ॥ ३१ ॥
तों सरदार विचारी वदले " स्वामी दिसे न हें युक्त ॥
जोडुनि करांस विनवूं ऐकावें आज आमुचें उक्त ॥ ३२ ॥
कोटा धुळीस मिळवुन इच्छा आम्हांस बंड बुडवाया ॥
आहे तुझ्यापरि पदीं समरीं रजपूत सर्व तुडवाया ॥ ३३ ॥
ऐश्वर्य पेशव्याचें वाढावें म्हणुन आमुचा जन्म ॥
हें वाण करिं सतीचें आचरिलों घेउनी समर-कर्म ॥ ३४ ॥
क्षुल्लक रजपूतांला भीतों वाटे असें तुला काय ? ॥
जाइल जेथें भाला देतिल हरिचे तिथे विजय पाय ॥ ३५ ॥
परि काळ वेळ पाहुन वागावें बोलती असें लोकीं ॥
पश्चात्ताप न होवो संतत दुःखद कधीं मग विलोकीं ॥३६॥
ही मध्य-रात्र झाली अंधारें सर्व भुवन भरणार ॥
अज्ञात देश शत्रुहि मायावी घोर कर्म करणार ॥ ३७ ॥
कोसळला तो तट जरि होइल रात्रींत नीट नच वाटे ॥
भांडूं उद्यां सकाळीं नेऊं नगरीं स्व-सैन्य त्या वाटे ॥ ३८ ॥
इच्छा जरि तव असली जातों आम्ही समस्त सरदार ॥
मिळवावया यशःश्री आलों येथें त्यजन घरदार ॥ ३९ ॥

वार्धक्य तुजसि आलें सोसूं न श्रम शरीर हें युक्त ॥
होइल जिवा अपाय हि बाळगिती धाक हा तुझे भक्त ॥ ४० ॥
म्हणुनी विनंति करितों बाहेर पडूं नये तुवां आज ॥
आज्ञा दे तव सेवक येतिल साधून सत्य हें काज " ॥ ४१ ॥
मल्हारराव बोले, " ध्याया कोटा प्रसंग हा आहे ॥
एकेक क्षण जातो भ्याडासम भीति दावितां कां हे ? ॥ ४२ ॥
पुरुन उरेन जगाला झालों जरि वृद्ध केंस हे पिकले ॥
किति देशांचीं दैवें असती माझ्या करांत हें न कळे ! ॥ ४३ ॥
केला निश्चय जो कीं ब्रम्हा फिरवूं शकेल तो न लव ॥
कां मी भोक्ता दवडिन आलें हातास जें यशोविभव " ॥ ४४ ॥
ऐसें वदे व्यवस्था सांगे त्यांतें करावया सिद्ध ॥
कांहीं निवडुन घेतो संगें करण्यास रात्रिचें युद्ध ॥ ४५ ॥
तों दिल्लिरखानानें अपकार समस्त पूर्व आठविले ॥
होळकराच्या साह्या निवडक कांहीं पठाण पाठविले ॥ ४६ ॥
वेगें पायदळाची टोळी घेऊन जाय मल्हार ॥
करितें दिशा सुगंधी ज्याचें परिफुल्ल कीर्ति-कल्हार ॥ ४७ ॥
विश्वासु स्वामीचें रक्षण करण्यास जीव देणार ॥
होते त्या टोळितले ख्यात बळी माण-देशाचे वीर ॥ ४८ ॥
दोन हजार असे हे एकंदर लोक जाहले संगें ॥
घटकेंत एक आला गोटाबाहेर होळकर अंगें ॥ ४९ ॥
सत्वर पाउल टाकी स्वीकारी आडमार्ग जायाला ॥
गांठूं रजपूतांला हिंमत अत्यंत वीर-रायाला ॥ ५० ॥

जाऊन गुप्तमार्गें पोंहचला त्या. तटासमीप बळी ॥
ऐके कुणकुण कांहीं आंतुन तो कान देउनी जवळी ॥ ५१ ॥
होता उजेड केला पेटवुनी आंत दीपक मशाला ॥
जमले पौर सभोंतीं नीट करूं भिंत पाहाती विशाला ॥ ५२ ॥
बोले एक " गड्यांनो ! नीट मनुष्याकृती मला दिसती ॥
वाटे खरेंच मजला येथ मराठे कुठे तरी असती " ॥ ५३ ॥
" भिंतऱ्या जेथें तेथें दिसति मराठे ! न मार हांकेला " ॥
बोलून सोबत्यांनीं त्याच्या गोंगाट हांसुनी केला ॥ ५४ ॥
हंसण्याचा न प्रतिरव भिंतिस आपटुन पावला विलय ॥
तों नगर-रक्षकांवर एकाएकींच जाहला प्रलय ॥ ५५ ॥
होउन पुढे मराठे रागेंत तसेच काढिती बार ॥
शतसंख्य पौर मेले रंभा तत्कंठिं घालिती हार ॥ ५६ ॥
इतक्यांत पौर आले धांवुन मागून ओरडत रागें ॥
त्यांवरि निज वीरांतें जाया मल्हार त्या क्षणीं सांगे ॥ ५७ ॥
मग शत्रुमित्र झाले एकाएकींच एकवट सुभट ॥
करिती खटपट पटपट मरति हठें कपट दाविती निपट ॥ ५८ ॥
मल्हार उग्रकर्मा रजपूतांतें कृतांत[1] दिसताहे ॥
भक्ति-रसें शत्रु-शिरें अमित तदा भूमि-देविला वाहे ॥ ५९ ॥
ते नगर रक्षणारे धाकें सोडून समर पळतात ॥
झाला गोंधळ तेव्हां हांका मारून कोण वळतात ? ॥ ६० ॥
यशवंतराय आला इतक्यांतच जेंवि मातला नाग ॥

---

[1] यम.

कीं अन्य गुहेंत शिरे म्हणुनि जणो काय खवळला वाघ ॥ ६१ ॥
धांवे गर्जुनि सांगे मागें लोकांस धीट परताया ॥
" रजपूताच्या येउन जन्मास अयोग्य काय करितां ? या ॥ ६२ ॥
पूर्वज लाजिरवाणें तुमचें हें कर्म पाहुनी सारे ॥
रडतील वर बघा कीं शोभति जे दिव्य कांतिनें तारे ॥ ६३ ॥
तुमचीं होऊन मुलें मोठीं घेतील शस्त्र ज्या कालीं ॥
आठवुनी ही दुष्कृति लाजेनें मान घालतिल खालीं ॥ ६४ ॥
केव्हां तरी मरावें जन्मा येउन न काय मनुजानें ॥
धन्य म्हणावा देशा सोडविली अर्पिली स्वतनु ज्यानें ॥ ६५ ॥
जरि काळें मुख करुनी पुर देणें शत्रुच्या करीं द्यावें ॥
तरवार हीच घेउन मातें तोडून आज यश घ्यावें " ॥ ६६ ॥
यशवंतोक्ती ऐकुन लाजुन परतून धांवले पार ॥
ते दक्षिणींस होती भयद जसे काय राशिला सौरं[1] ॥ ६७ ॥
उठले जाले जागे नागर कोट्यांत गडबड उडाली ॥
दुंदुभि वाजति गाजति तोफा, नगरी तया रविं बुडाली ॥ ६८ ॥
झाला यशवंत पुढें सर्वांच्या झगडतो जिवापरता ॥
लाजवि निजशत्रूतें अद्भुत करणी रणामधें करिता ॥ ६९ ॥
तळपति त्या आपटती पाडिति ठिणग्याच काय तरवारी ॥
धांवे एक कराया वार दुजा त्यास शीघ्रतर वारी ॥ ७० ॥
दोहन मान हि सागर संगें घेउन हजार दोन भट ॥
यशवंताच्या आले साह्या झुंजोनि दावितात हट ॥ ७१ ॥

---

1 शनि.

उत्साह पौर-पक्षीं तेव्हां युद्धार्थ तत्क्षणीं वाढे ॥
अद्भुत साहस कृत्यें करितां कौशल्य दाविती गाढें ॥ ७२ ॥
अरुणोदय तों झाला आशा-चंद्रास अस्त ये पूर्ण ॥
कोटास मग निघाले त्यजुन मराठे रणांगणा तूर्ण ॥ ७३ ॥
त्या दिवसापासुनियां मल्हार तटावरी करि न घाला ॥
मोर्च्यांवरून मात्रच तोफांचा मार ठेविता झाला ॥ ७४ ॥
घालूनियां गराडा कोटा-शहरासभोंवती बैसे ॥
स्वांतीं संतत चिंता व्हावे हे नम्र नागरिक कैसे ? ॥ ७५ ॥

श्लोक.

रक्षावया सतत चिंति असे उपाय ।
राहून सावध पुरा यशवंतराय ॥
आज्ञेंत वागुनि सहाय तयास होती ।
ते पौर संकट-निवारणिं हेच रीती ॥ ७६ ॥

---

१ मनांत.

# सर्ग अकरावा.

दिल्लिरखान यशवंतरायास ठार मारण्याकरितां बादल या नांवाच्या भिल्लास पाठवितो—तो भिल्ल यशवंतरायास गांठतो—द्वंद्व-युद्ध—बादल जखमी लागून पडतो—तो मरतांना कृतकर्माबद्दल पश्चात्ताप दाखवितो—जुनी ओळख—यशवंतराय भिल्लास आश्वासन देतो—प्राणोत्क्रमण—विलक्षण मसलत—दिल्लिरखानास ठार मारण्याकरितां यशवंतराय बरोबर कांहीं निवडक लोक घेऊन निघतो—चांदण्या रात्रीचें वर्णन—मराठ्यांच्या छावणींत प्रवेश—दिल्लिरखानाचा वध—मोंगलांची धांदल.

## श्लोक.

कोटापुराभोंवतिं नित्य यापरी । मल्हार तो युद्ध हळू हळू करी ॥
वार्ता घडे एक पुरांत अद्भुत । पौराग्रणी शौर्य जयांत दावित ॥ १ ॥
सारून रात्रीं यशवंत भोजन । आला महालीं आपुल्या जिन्यांतुन ॥
टाकी हळू तो पद हिंडतो सुखें । स्तोत्रें पवित्रें म्हणतो तिथे मुखें ॥२॥
होता दिवा एकच टांगला वरी । जो भोंवतीं अंधकशी प्रभा करी ॥
तींतून चाले यशवंतराय तो । येतां तिथे एक मनुष्य पहातो ॥ ३ ॥
होती जया उंच भयाण आकृती । नेत्रीं हिरे कीं जणु दोन शोभती ॥
अंगें कठोरें बहु-शक्ति-संयुत । कोणी असा दुष्ट मनुष्य भासत ॥४॥
आला पुढें तो तरवार सांवरी । मुद्रा तयाची दिसण्यांत बावरी ॥
बोले कठोर-स्वर काय भाषण । आश्चर्य दावी यशवंत ऐकुन ॥ ५ ॥
“ आयुष्य-तंतू तुटणार या स्थळीं । मी हा तुझा नाश करीतसें बळी ॥
रक्षावया देवहि होय न क्षम । जाशील कोठें न करांतुनी मम ॥ ६ ॥
आयुष्य कांहीं क्षण शिष्ट राहिलें । तूं ईश्वराचीं स्मर त्यांत पावलें ॥

जो बुद्धि देतो मजला करावया । हें कर्म कीं प्राण तुझे हरावया " ॥ ७ ॥
बोलूनियां दुष्ट पुढेंच धांवला । अत्यंत कोपा यशवंत पावला ॥
" माझ्याच हातें मरणें तुवां असें । दुष्टा कपाळीं लिहिलें तुझ्या असे " ८
उड्डाण मारी वर हात ठेवुन । तो जागच्याजागिं उभाच राहुन ॥
जी गुप्त होती तुळईंत ठेविली । एका क्षणीं ती तरवार काढिली ॥ ९ ॥
बोले–" तुझा नाशक मी असें उभा । ये तूं पुढें पूर्ण तुला असे मुभा ॥
त्वत्तुल्य आले जरि वैरि ते दहा । मी लोळवीतों इतक्यांसही पहा ॥ १० ॥
पाणी दिलें या तरवारिला नवें । त्याची परीक्षा करण्यास आठवे ॥
चाले शरीरीं तव चांगली जरी । कारागिरा देइन मोल मी तरी ! " ॥११॥
ते दोनही मंडळ घेउं लागती । संधी कराया मग वार पाहती ॥
जैशा विजा त्या तरवारि नाचती । होतो तिथें शब्द खणाखणा किती ॥१२॥
संक्षेप विक्षेप शरीर–दृष्टिला । प्रक्षेप शस्त्रां चिर तेथ चालला ॥
क्रोधामधें ते मणिबंध चाविती । आकाशपृथ्वी करूं एक पाहती ॥ १३ ॥
जों जों घडे चापल शस्त्र-संगरीं । प्रत्येक उत्साह मनीं नवा धरी ॥
प्रत्येक ते अद्भुत डाव दाविती । आलाच हातीं निज शत्रु भाविती ॥१४॥
जें आवडे शस्त्र तया तया मिळे । दोघांस होतीं बहु योग्यशीं स्थळें ॥
प्रत्येक मोठा अपणास मानितो । झाला चमत्कार कथील कोण तो ! १५
त्या काळि कोटयामधिं खड्ग घेइल । दावील मोठें कमला-सुता बळ ॥
होता न कोणी नर धन्य यापरी । ज्यापासुनी तो यशवंत भी धरी ॥१६॥
तेव्हां चमत्कार मनास वाटला । धास्तीहि कांहीं यशवंत पावला ॥
आहे तरी कोण उभा पुढें असा । जो घात पाहे करण्यास काळसा १७

---

१ मणगटें.

तारुण्य उत्साह सुहस्त–कौशल । अंगांतलें थोरहि मूळचें बळ ॥
तें जागच्या जागिंच सर्व राहिलें । येऊन हें संकट थोर कोसळे १८
दायास घापा यशवंत लागला । शक्ती गळूं लागलि फार भागला ॥
बिंदू कपाळावर घाम सांठुन । व्यायाम तो हस्तपदांस होय न ॥१९॥
बोलावुं कोणास सहाय काय मी ? । झालों असें या समयास मी श्रमी ॥
वाटे असें मान–धनासत्या पुन्हा । तो एकटा साह्य नसोच आपणा ॥२०॥
अंगीं पुन्हा हिंमत एकदा धरी । चालून गेला मग तो अरीवरी ॥
ऐसा करी एकच वार कीं बळें । जेणें जणो डोंगर वैरि कोसळे॥२१॥
मारेकरी तो पडला महीवर । येऊन मूर्च्छा पसरूनियां कर ॥
डावे कुशी वार असाध्य जाहला । त्यांतून तों रक्त पडे भळाभळा २२
पैरेश आश्चर्यभरें बघे पुढें । मारेकरी दृष्टिस त्याचिया पडे ॥
ठेवून खड्गावर हात ओणवे । पोटीं दया पाहुन शत्रु जाणवे ॥२३॥
धांवून आलीं वर कांहिं माणसें । तों त्यांस मूर्च्छागत वैरि तो दिसे ॥
राहे न्यहाळीत तया उभा धनी । आश्चर्य हें पाहुन होतसे मनीं ॥२४॥
बोले दयार्द्रांतर काय चाकरां । "व्हाहो पुढें सावध त्याजला करा ! ॥
त्या बापुड्या कांहिं असेल बोलणें । बोलो सुखें त्यास न यांत वांचणें२५
जाणावया उत्सुकता असे जरी । दुष्टास या प्रेषण कोण तो करी ? ॥
जाणाल तेंही पुरवाच हेतु हा । होईल तो सावध कीं पहा पहा !"२६
हळू हळू सावध दुष्ट जाहला । स्वनेत्र पाहूं उघडून लागला ॥
मुखांतुनी अस्फुट शद्ब काढितो । बघून दैन्यें जल पूर्वि मागतो २७
जाऊन बैसे जवळी धरी कर । बोले हळू तो यशवंत सुस्वर ॥
"मीं काय केला अपराध थोरसा । आलास घ्याया जणु सूड तूं असा"२८

मारेकरी तो करि नेत्र खालते । काढी प्रयत्नें मग खोल शब्द ते ॥
"मी क्रूर-कर्मा अति दुष्ट बादल। ध्याया नसे योग्य तुझ्या घरीं जल२९
दिल्लीर धाडी मज मारण्या तुला । आलों मनीं दुष्ट धरून हेतुला ॥
भिल्लांतला नायक मीच बादल । ज्याचे भयें ऐकुन कांपती बळ" ३०
हें ऐकतां विस्मय फार जाहला । मोठया स्वरानें यशवंत बोलला ॥
" तूं काय तो बादल ? नांव ऐकुनी । होतें पहावें तुजला असें मनीं ३१
भिल्लामधें नायक तूंच काय तो ? । कीर्ती जयाची जन सर्व जाणतो ॥
राजे हि होते तुज भीत बापुड्या ! । आलास कर्मेंच दशेस येवढ्या ३२
तूं वाटमाऱ्या बसणार काननीं । पांथस्त लोकां लुटणार हाणुनी ॥
या देशिं कोणी नव्हता तुझा अरी। जो खड्ग-युद्धास तुझ्या सवे करी३३
अंगीं असोनी गुण ते सहस्रशा । कामांत आला नसतास तूं अशा ॥
होतास मोठा चढतास योग्यते । आयुष्य गेलें तव व्यर्थ वाटतें ! ॥३४॥
जगन्नियंत्या परमेश्वरास हें । नराधमा ! कर्म तुझें कसें सहे ? ॥
म्हणोन मेलास करींच माझिया । पराभवातें वरिताय कासया ? ॥३५॥
शत्रुत्व संपादुनि दिल्लिरासवें । जो लाजवी होळकरा पराभवें ॥
आहे असा मी तुज हेच ठाउक। मीकोण ही देइन आज ओळख ३६
चोवीस वर्षें घडलीं कयेस या । तो काळ तूं आठव टाकुनी भया ॥
होतास तेव्हां मद-मत्त यौवनें । हत्तीपरी हिंडत घोर तीं वनें ॥३७॥
क्रूरा ! तुझें शौर्य अचाट संगरीं । नाहीं दयेचा परि लेश अंतरीं ॥
घेसी जनांचीं लुटुनी धनें किती !। तूं मारिसी जीव तयां नसे मिती३८
एका प्रसंगीं निज सेवकांसह । जातां पथीं भोगित दुःख दुस्सह ॥
कोणी अशी स्त्री कमळाख्य सुंदरी । ती बापुडी सांपडली तुझ्या करीं३९

हा लाभ मोठा तुज वाटला खरा । होतास तूं जात पळून तस्करा ॥
तों वीर आला जगदेव सद्गुणी । तो सोडवी तीस तुझ्या करांतुनी ४०
युद्धांत मेले बहु भिल्ल सोबती । तेव्हां तुला वार हि फार लागती ॥
झाले न तेव्हां परिपूर्ण शासन । आला असे हा म्हणुनीच कीं दिन? ४१
माझा पिता तो जगदेव सन्मती । माता हि माझी कमला महासती ॥
ती गांजिली त्वां अबला म्हणूनियां। मी पुत्र तीचा तव शत्रु निर्दया" ४२
बोले तदा स्फुंदत बादल स्वयें । "माझी तुला काय म्हणून कींव ये ?॥
पापी जगीं हा परिणाम पावलों । दुष्कीर्तितें संतत पात्र जाहलों ४३
औदार्यशाली स्वजनांत तूं हिरा । रक्षावया पाहसि या पुरा बरा ॥
द्यावें तुला साह्य म्हणून म्यां जरी । दुर्मार्ग दावी धनलोभ हा तरी ४४
आलों जरी मी नसतों पुरांत या । देतों तुला संधि न सूड घ्यावया॥
यावा मला मृत्यु इथें तुझ्या करें । हें ईश्वरें इच्छित वाटतें खरें॥४५॥
पाहून देवा! गहना तुझ्या कृती । वाटे मना विस्मय गुंगते मती ॥
जो पातकी घातक मातला खळ । दंडावया त्या तुज मार्ग पुष्कळ!" ४६
ऐसें वदे श्वासहि टाकि दीर्घसा । लावी वरी बादल दृष्टिला तसा ॥
दुःखांत मोठ्या गत-गोष्टि आठवी । तो जन्म-भूमीप्रत चित्त पाठवी ४७
आयुष्य हा मार्गच थोर चालुन । विश्रांति घेणार इथेंच जाणुन ॥
मागें बघे तों स्वचरित्र चित्रसें । राहे पुढें त्या भिववीतसे जसें ४८
लक्षावधी लोक भिकेस लागले । याच्याच हातें किति मृत्यु पावले ॥
मूर्ती तयांच्या दिसतात येउन । भीती उरीं जाय तदा धडाडुन॥४९॥
जो स्वर्ग या भूमि-तलावरी खरा । त्या सौख्यदायी स्मरतो मनीं घरा॥
भार्या सुगात्री तरुणी धरी मनीं । तो बाळ ही सुंदर धाकुटा गुणी५०

आणून अश्रू नयनांत बोलत । आर्त स्वरें तो कमला-सुताप्रत ॥
" कोपानळीं[1] मी तव दग्ध जाहलों । जें कर्म केलें फळ नीट पावलों ९१.
विज्ञापना वास्तव नम्र मी करीं । आहेत जीं कीं मम माणसें घरीं ॥
त्या दुर्बळीं आग नकोच पाखडूं । घेईन मी सूड असें नको वदूं " ९२.
पौरेश बोले " भलतीच कल्पना । कां बादला येत असे तुझ्या मना ? ॥
या वेळिं तूं होउन शांत चिंतणें । श्रीशंकराचींच पदें सुपावनें " ॥९३॥
तेव्हां वदे बादल काय भाषण । आतां असे निर्मळ शांत मन्मन ॥
'हे राम! हे राम! ' वदेन मी मुखें । सोडून जाईन महीतळा सुखें " ९४.
नाडी हळू चालुन बंद राहिली । बर्फाप्रमाणें तनु गार जाहली ॥
तों प्राण ही सोडि तनूस नश्वर । गेला असा बादल तो भयंकर ९५.
ये आंत तों धांवत वीर दोहन । द्वारांतुनी बोलत लोक—मोहन ॥
" मित्रा! उदारा! भय थोर येतसे । आला पुरीं बादल ऐकिलें असें ९६.
वृत्तांत माझा मज दूत सांगती । घ्याया तुझा प्राण पठाण पाहती ॥
त्यांनीच हा बादल धाडिला पुरीं । जीवांस जो दुष्ट असंख्य संहरी " ९७.
मित्रास तेव्हां यशवंत बोलला । " ये हा पुढे बादल पाहिं पाडिला ॥
माझ्याच हातें अति नीच तो मरे । हें मेळवीलें यश थोर मत्करें " ९८.
ऐकून हें दोहन धांवतो पुढें । आश्चर्य-दृष्टी बघतो तयाकडे ॥
हा बादलाचा बघुनी पराभव । तो थोर मानी यशवंत-वैभव ॥९९॥
कृत्यें खळाच्या बहु कोपला भला । पौराधिकारी यशवंत बोलला ॥
"दिल्लीर हा दुष्ट मदांध सर्पसा । नाशूं अम्हांला न बघेल तो कसा? १००
हा खान राहील जिवंत जोंवर । विश्रांति चित्ता नच आमुच्या तर ॥

---

1 कोपरूपी अग्नींत.

मारावया यास सुयुक्ति काढिजे । हा पूर्ण झाला मम हेतु पाहिजे "॥६१॥
प्रत्युत्तरा दौह्नसिंग देतसे । त्याच्या मनीं एक विचार येतसे ॥
तो साम्य साधारण पाहतो बळी । आकार उंची यशवंतबादलीं ॥६२॥
"शौर्याकरा! नागर-लोक-संमता! । घेशील याचा जरि वेष तूं स्वतां ॥
गोटांत जाऊं अरिच्या सुसावध । दिल्लीरखाना ठकवूं करूं वध" ६३
ती युक्ति या मानवली बरें म्हणे । "साधीन मी वेष असा पहा पणें ॥
पोषाक काळा तनु वर्ण सांवळा । डोकीवरी मंदिल यास हा निळा ॥६४॥
दाढी मिशा थोर मुखासभोंवतीं । गालीं कपाळावर वार दीसती ॥
हें सर्व साधेल अशाचसारखें । होईन मी बादल सांगतो निकें ॥६५॥
दिल्लीर घातास नसेल शंकत । भेटूं तया आपणही अकल्पित ॥
ही रात्र आहे उमगूं न आपण । श्वानास मारूं चल जाउं ओढुन ६६
तूं शौर्यशाली भट मान सागर । वेषांतरें आज चला बरोबर ॥
पन्नास घेऊं जन साहसी सवें । ज्यां भीति ऐशा समयीं न जाणवे ६७
ते छावणीपासुनियां उभे भले । होतील कीं दोन हजार पावलें ॥
ठेवूं उभे एक हजार नागर । नानास्थळीं सावध अंतरावर "॥ ६८ ॥
झाली तयारी घटकेंत चांगली । मार्गास ते लागति उत्सवें बळी ॥
वेशींतुनी बाहिर येति जों पहा । तों रात्र झाली घटका तिथे दहा ६९
भासे नभा निर्मळ रंग सांवळा । कीं घोटुनी साफच केलि हे शिळा ॥
शोभे मधें सुंदर रात्रि—नायक । कांती तयाची अति हर्ष—दायक ७०
मोडी करी जो भुवना क्षणामधीं । दुग्धांबुधी तो घुसळी स्वयें विधी ॥
हा ठेवितो काढुन यत्न-पूर्वक । आकाश-पात्रीं नवनीत-गोलक[1] ॥७१॥

---

१ लोण्याचा गोळा.

या कंदुका[1] घेउन सुंदरा अशा । खेळे विलासें जणु पूर्व ती दिशा ॥
क्रीडेंत हा आपटतां जमीनिला । आकाश-मार्गीं वर नीट चालला ७२
फांके मही-मंडळिं शुभ्र चांदणें । दुग्धचें जें सारवितें जगा क्षणें ॥
मैदान झाडें आणि टेंकड्या घरें । दृष्टीस येतात पदार्थ पांढरे ॥७३॥
पाटांतुनी निर्मळ पाणि वहातें । त्यांतून चंद्र-प्रतिबिंब शोभतें ॥
डोळ्यावरी अद्भुत तेज तों पडे । पाराच हा लोळत चालला पुढें ७४
मैदानही शांत समस्त भासतें । वारा सुटे गार हळू हळू तिथे ॥
पानें फुलें हालति वृक्षिचीं हळू । भीतात येईल कुणा जणों कळूं ७५
वेळीं अशा तो यशवंत चालला । सर्वांपुढें, सत्वर टाकि पावलां ॥
घालूनियां मान उगाच खालती । नानापरी आंत विचार चालती ७६
क्रूराकृती बादल-युद्ध त्यासवें— । तो जिंकिला वैरि सुवीर्य—गौरवें ॥
तोंडांतुनी जें वच त्याच्या पडे । तें राहिलें सर्व अनुक्रमें पुढें ॥७७॥
या वेळपर्यंत जशीं महाभयें । आलीं बळानें तरलों तयां स्वयें ॥
सर्व स्वकार्यं सुरळीत चाललीं । शक्ति स्वशत्रूंप्रत पूर्ण दाविली ॥७८॥
होणार कैसें न कळे पुढें परी । विश्वास या साहसिं कोण तो धरी? ॥
मारीन मी दिल्लिरखान काय तो?। कीं मृत्यु येतो मज? कोण जाणतो?७९
जों जों पुढें जाति बघून छावणी । तों कर्णमार्गीं पडतो महा-ध्वनी ॥
तंबूतला नीट उजेडही दिसे । तीं स्पष्ट येती नजरेस माणसें ॥ ८० ॥
मागें स्ववीरां यशवंत ठेवुन । संगें तिघेही सरदार घेउन ॥
चाले पुढें किंचित थांबुनी तसा । ऐके बघे भोंवति सावकाशसा ॥८१॥
रात्रीं मराठे करणार रक्षण । तेथें उभे जे न विसंबती क्षण ॥

---

[1] चेंडूस.

दृष्टी चुकावूनच संकटा तरे । रस्त्यांत एका शिरला पुढें सरे ॥ ८२ ॥
पाहे किती बैसुन चांदण्यामधें । जेवीत होते सुख तेंच त्यांस दे ॥
गोष्टी किती सांगति हांसती तिथें । स्वच्छंद ते खेळति नाचती कुठे ८३
तंबू तयाला मग एक दीसला । येऊन दारीं क्षण एक थांबला ॥
होते उभे अंगणि शस्त्रधारक । त्या दिल्लिराचे बहु सज्ज सेवक ८४
एकास बोले यशवंत सादर । "जागा असे आंतच काय द्रिल्लिर ? ॥
सांगा तया बादल मी इथे असें । इच्छा मनीं त्यास पहावया वसे" ८५
तो बोलला "बादल शौर्य-सागर । येवो सुखें दाविन वाट सत्वर ॥
माझा घनी उत्सुक त्या पहावया । आधीं पुढें जाउन सांगतों तया" ८६
आला क्षणें हात धरून नेतसे । निर्धास्त मागें यशवंत जातसे ॥
ते द्रोहनादी थबकून राहती । लावूनियां सावध कान ऐकती ॥ ८७ ॥
कोंचावरी खान खुशाल बैसला । हुक्का मुखा लावुन ओढितो भला ॥
तोंडीं धुराचे धरि लोळ सोडितो । जातां वरी देउन चित्त पहातो ८८
तों मद्य-पानें बहु धुंद द्रिल्लिर । पाहे पुढें बादल जोडुनी कर ॥
नायास सांगे स्वजनांस बाहिर । हा एकटा मात्र असो बरोबर ॥८९॥
बोले-"प्रिया! संगर-धीर बादला! । दे सौख्य वृत्तांत कथून आपुला ॥
तो सांपडे काय तुझ्या करीं अरी ? । आलास तूं साधुन कार्य कीं पुरीं?"९०
प्रत्युत्तरा कृत्रिम-बादलें दिलें । "मोठ्या प्रयत्नें तव कार्य साधिलें ॥
गेलों तिथे जाउन गुप्त बैसलों । चिंतीत मी पाहत संधि राहिलों ॥ ९१ ॥
त्याच्या घरीं जाउन गांठिलें तया । झालों पुढें टाकुन मी भया दया ॥
खंजीर पोटीं खुपसून पाडिला । स्वर्गास वेगें यशवंत धाडिला" ॥९२॥

ऐकून हें खान मदांध बोलतो । रंगांत येऊन खुशाल डोलतो ॥
" कां आणिलें नाहिंस शत्रुचें शिर ? । झालें मला जें असतें सुखाकर[1] ९३
स्वच्छंद मी त्यावर बा न नाचलों । नाहीं स्वलोकीं स्तुति-पात्र जाहलों ॥
मीं पाठवीलें असतें तया शिरा । भाल्यास टोंचून सुखें दिगंतरा! " ॥९४॥
हें ऐकुनी क्रोध मनांत नावरे । डोळे करी तो यशवंत बावरे ॥
मारी उडी सिंहसमान दिल्लिरा । पाडूनियां लावि कटयार तो उरा ॥९५॥
दाबूनियां तोंड उरावरी वसे । दिल्लीर या वेळि सुटूं पहातसे ॥
पैरेश शस्त्रें दुसऱ्या क्षणीं करी । निर्जीव दिल्लीर बलाढ्य तो असे ॥९६॥
बाहेर तेव्हां यशवंत धांवला । एका क्षणीं मित्रजनांत पावला ॥
बाहेर गोटांतुनि धांवती बळें । वाटे न वारा इतुक्या जवें पळे ॥ ९७ ॥
मारेकरी येउन आंत शीरले । मारून खानास पळून चालले ॥
वार्ता अशी सर्व जनास ठाउक । झाली क्षणें फारचि भीति-दायक ॥९८॥
' अल्लारहीम बिसमिल्ला ' असा करिति गिल्ला समस्त यवन ।
मल्लां चढे स्फुरण हल्ला करूं म्हणति कल्लाच जाय उडुन ॥
सल्लालन-प्रमति-बल्लाळ-भूप-भट[2] भॅल्लांस[3] घालिति कर ।
सल्लाभ मानुनिच सल्ला विचारिति न मल्हार घे पथकर ॥९९॥

---

१ सुखाची खाण. २ साधूंचें पोषण करणारा व बुद्धिमान असा बाळाजी बाजीराव याचे वीर ( मराठे ). ३ भाल्यांस.

## सर्ग बारावा.

अनंताचार्याचा पुण्यापर्यंत प्रवास—पुण्यासभोंवतालच्या प्रदेशाचें वर्णन—पुण्याचें वर्णन—जुनें पुणें व नवें पुणें यांच्या स्थितींतील महदंतर—त्यावर कवीचे विचार—अनंताचार्यानें वर्णिलेली त्या वेळची पुण्याच्या दरबारची स्थिति—आपलें काम सदाशिवरावभाऊकडून करून घेण्याबद्दल अनंताचार्याचा निश्चय.

श्लोक.

यमे-दिशेस[1] अगस्त्य जसा निघे । विबुध-नायक-कार्य[2] करूं बघे ॥
नगर-नायक-कार्य-परायण[3] । द्विज[4] तसा निघतो करुनी पण ॥ १ ॥
स्वपथ चालुन कोस दहा दहा । सघन गांठित दक्षिण-देश हा ॥
विविध-देश-विशेष-निरीक्षण[5] । करुनियां हरिखें[6] भरलें मन ॥ २ ॥
भवतही[7] उगवूं नशके जिथे । सरळ उंच नभाप्रत पोंचते ॥
उठति चार दिशांस असे भले । बघत डोंगर विंध्य-गिरींतले ॥ ३ ॥
बहु सख्या मिळवून नद्या सवें । पतिस पश्चिमदेशिं मिळे जवें ॥
सुसलिला[8] विमला जन-शर्म-दा[9] । निजपथीं तरला द्विज नर्मदा ॥ ४ ॥
न किरणा रविच्या मिळते गती । पशु जिथे भय-दायक राहती ॥
विमल वाहति निर्झर[10] आंतुन । बघत सातपुड्यांमधलें वन ॥ ५ ॥
हळुहळू जंव दक्षिण-देशिं तो । शिरतसे बहु विस्मय पावतो ॥

१ दक्षिणेस. २ देवांचा राजा इंद्र याचें कार्य. ३ यशवंतरायाचें कार्य साधण्याविषयीं तत्पर. ४ ब्राम्हण ( अनंताचार्य ). ५ नाना देशच्या तऱ्हा पाहणें. ६ हर्षानें ७ वेगानें. ८ चांगलें आहे उदक जीचें. ९ लोकांस सुख देणारी. १० झरे.

नच सपाट जमीन कुठे दिसे । खडक डोंगर जेथ तिथे असे ॥ ६ ॥
प्रबल वेग गतींस जयांचिया । बहु लहान नद्या दिसती तया ॥
जमिन फार सुपीक कुठे कुठे । परि न मालव-तुल्य[1] गमे इथे ॥ ७ ॥
प्रबल गौर उभार सुरेखसे । वसति उत्तर-देशिं भले जसे ॥
न दिसती रजपूत सुलक्षणी । नविन लोक बघे द्विज दक्षणी ॥ ८ ॥
दिसति येथिल लोक न देखणे । चपळ रांकट निष्ठुर ठेंगणे ॥
दिसाति शांत जरी कपटी महा । सडसडीत परी बळि ते पहा! ॥ ९ ॥
दिसति सह्य-गिरींतिल डोंगर । प्रथित[2] जे चिर भारतं[3]-भूवर ॥
यवन—भूपति—नाश-परायण । शिवं[4] जिथे बसुनी करि गर्जन ॥ १० ॥
परि सदा यशवंत-हितीं मन । विबुधं[5]-वर्य अनंत विचक्षण ॥
जवळ पुण्यपुरा द्विज ठाकला । दिवस जों घटकेवर पावला ॥११॥
झळक मंदिल सुंदर डोकिला । धवल वेष शरीरिं खुले भला ॥
असुन शांत सुकांति मुखावरी । वय उतार शरीर बळी परी ॥१२॥
सकल-शास्त्र-विचार-परायण । सुवचना करिता हरिता मन ॥
सदय होउन शिक्षण पूर्वि दे । म्हणुन ज्या यशवंत गुरू वदे ॥१३॥
द्विज अनंत असा सकलांपुढें । दवडवी स्वहंया[6] दुडक्या पदें ॥
जवळ रक्षक—नायक चालतो । मग अनंत तयाप्रत बोलतो ॥ १४ ॥
"बघ सख्या ! रमणीय सुदेश हा । दिसुन येइ अशा समयीं अहा! ॥
उगवुनी नुकता मिरवे रवी । महि-तला कनकें जणु सारवी ! ॥१५॥
इथुन तेथुन शेतमळे किती । उठुन भूमिस व्यापुन टाकिती ॥

१ माळव्यासारखी. २ प्रख्यात. ३ हिंदुस्थानांत. ४ शिवाजी महाराज. ५ सुज्ञ-श्रेष्ठ. ६ आपल्या घोड्यास.

अर्जुन कार्तिक मास न संपला । म्हणुनि गारच देश दिसे भला १६
दंव नसे सुकलें अजुनी जरी । प्रखर भास्कर ही न करां करी ॥
जमिन हीच धनीण इची करीं । कठिण शेतकरी करि चाकरी १७
बसुनियां छपरावरि गोफणी । धरुन हांकिति पक्षि-गणां कुणी ॥
झणझणा करिं गोफण जों फिरे । पळति दूरचि बापुडिं पांखरें ॥१८॥
कितिक पेटविती जन आगटी । जवळ बैसुन शीत निवारिती ॥
हळुहळू पडतो हुरडा मुखीं । बसुन सांगति गोष्टि तिथे सुखी १९
वय दहा वरुषें शिशु धाकुटे । चपळ धांवति घेउन आउते ॥
कितिक येथ पतींस गुणी स्त्रिया । मदत देति पहा तिकडे सख्या ! २०
हरभरा गहुं बाजरि जोंधळा । पिकुन गार इथे दिसतो मळा ॥
जमिन देइल धान्य सुखें जर । कितिक खाइल मानव हा तर ? २१
कितिक जुंफुन मोट जन स्वतां । वृषभ सुंदर हांकिति तत्वतां ॥
श्रम गमो वृषभां हलका सुखें । करिति गायन सुस्वर हें मुखें ॥२२॥
पसरती निजपक्ष जशीं शिडें । उडति घारि नभीं दिसती पुढें ॥
नजर कोसभरी दुर फेंकिती । त्वरित शोधुन भक्ष्य हि काढिती २३
धरुन वेष निळे हिरवे असे । उडति पक्षि तरूं वरुनी कसे ! ॥
करिति नादित देश मधु-स्वरें । सुख खरें जगिं भोगिति पांखरें २४
घरटियांत बसून पिलांसवें । दवडिती निशिला अति उत्सवें ॥
उठति जों अरुणोदय जाहला । धरिति संतत उद्यम आपुला ॥२५॥
गगन-राज्य अफाट तया रवी । उगवुनी नृपती बहु तोषवी ॥
म्हणुन पक्षिच भाट सुखावले । करिति गायन ही स्तुति भासलें ॥२६॥

---

१ मुलगे. २ रात्रीस. ३ हर्षानें. ४ उद्योग.

पसरलें जरि दाट दिसे धुकें । किरण त्यांत परी शिरकूं शके ॥
खुलति दोनहि एकच होउन । दिसति पारद आणखि दर्पण॥२७॥
दिसति अस्फुट त्यांतुन डोंगर । पसरलीं बहु दाढ वनें वर ॥
म्हणति सह्य जया गिरि हा असे । सकल पश्चिम व्यापुनियां वसे॥२८॥
कितिक जाति नभांत निमूळते । किति सपाट शिरीं गिरि देख ते ॥
कितिक एकच रांग धरूनियां । असति खिंड दिसेन कुठे तयां॥२९॥
गरुड तो शिव भूपति यावरी । रचुन दुर्ग पहा घरटीं करी ॥
तिथुन घालुन झेंप दिनोदिन । लुटित देश करी रिपु-मर्दन ॥३०॥
म्हणुन पूज्य समस्त मराठियां । असति डोंगर हे न मिती तयां ॥
इथुन राज्य–नदी उगवूनियां । पसरली अरिला करिती भया ॥३१॥
शिव अचाट अशी करणी करी । स्वरिपु जिंकुन थोर यशा वरी ॥
म्हणुन तत्स्मरणार्थ असे भले । विजय-दर्शक खांबच रोंविले! ॥३२॥
भरभराट नवाच दिनादिना । सुखवि राज्य मराठि कसें जनां ॥
अचल बैसुन पाहाति हे असे । विगत-पक्ष-जटायु-शरीरसे ॥ ३३ ॥
उगम पावति पुण्य–नद्या वरी । सुखविती भुवनास बहूपरी ॥
विलसती दृढ–दुर्ग किती वर । म्हणुन नीट मनामधिं हे धर ॥ ३४ ॥
दुरून वाहत येति मुळा मुठा । विलसती तरु–कुंज तया तटां ॥
भगिनि काय सुशील म्हणूनियां । करित गोष्टि सुखें फिरतात या ३५
दुरून थोर पुणें दिसुं लागलें । बघुन धातिल नेत्रच आपुले ॥
प्रबल दैव असे म्हणुनी पुर । घडतसे नयनांप्रत गोचर !॥ ३६ ॥
असुन गांव लहान भिकारडें । पुर इथे उठलें तरि केवढें ! ॥

---

१ पारा, २ ज्याचे पंख नष्ट झाले आहेत अशा जटायूच्या शरीराप्रमाणें.

वसति हिंदु-पदाधिपती बरे । गहन काल-महात्म्य असे खरें ! ॥ ३७॥
अखिल-देशे-नृपाल अशा स्थळीं । नमिति येउन राज-पदा बळी ॥
बघति वाट हुकूम कसा घडे । तदनुकूलच वर्तन ही पुढें ॥ ३८ ॥
यवन—राज्य—तमें जग घेरिलें । म्हणुन हिंदु महाभय पावले ॥
उगवती रविसे भट पेशवे । पळति शत्रु तयां नच राहवे ॥ ३९ ॥
स्वपद हें दिधलें करुनी कृपा । स्तवन योग्यच शाहु महानृपा ॥
करि रवी निज अर्पण तेज कीं । अनेंळि मावळतां नच तारकीं ॥४०॥
मधुर गायन नर्तन वादन । उपवनांत विलास सुभोजन ॥
सकल लोक इथे उपभोगिती । प्रतिदिनीं नव उत्सव चालती ॥४१॥
धरुनियां तरवार सखी करीं । भरुन चंदन रक्त तनूवरी ॥
रण—वनीं यश हंस धरावया । रसिक वीर तयार पुण्यांत या ॥ ४२ ॥
फिरुन आठ दिशांस सुपंडित । करुन खंडित सद्गुण—मंडित ॥
विविध—शास्त्र—वनांतिल केसरी । दुरुन येउन राहति या पुरीं ॥४३॥
मधुर निर्मल सौम्य सरस्वती । सुकवि जे वदनांतुन काढिती ॥
कारिति संतत संत—सुवर्णन । लुटुन नेति पुण्यांतून या धन ॥४४॥
करिति वाडवडील अशा कथा । नयनिं वैभव तें बघतों स्वतां ॥
वसति—देश जरी अपुला दुर । परिसतों परि कीर्ति निरंतर ॥ ४५ ॥
झळकती दुरुनी दिसती अहा ! । कळस निर्जर—[४]मंदिरिंचे पहा ॥
गगन—छत्रच सांवरुनी शिरीं । दिसाति दंड उभे इतुके वरी ॥४६॥
उचलती स्वशिरें वरती घरें । स्व—धन—गर्वच त्यांस जणो भरे ! ॥
नयन हे खिडक्या उघडूनियां । बघति येतिल कोण पुरांत या" ॥४७॥

---

१ सर्व देशचे राजे. २ अर्गीत. ३ राहण्याचें ठिकाण. ४ देवळांचे.

द्विज अनंत चले हळु पावलीं । उपवनें खुलतात जया स्थळीं ॥
दुरून पाहुन या महिता पुरा । भरतसे मनिं विस्मय कीं पुरा ॥४८॥
जरि अनंत जिवंत असोनियां । बघत आज असे नगरास या ॥
कुठुन पाहिल तो नृप-मंदिरें ? । कुठुन सौख्य विलास इथे खरे ४९
बघुन आज दशेस पुण्याचिया । कवण सुज्ञ म्हणेल पुणें तया ? ॥
न असतें जरि चंचल वैभव । किति सुखी असते मम बांधव ! ५०
असति निर्दय फारच संपदे ! । पळसि काय म्हणून दुरी मदें ? ॥
न रण-शौर्य न साहस सद्गुण । स्थिर करूं शकती तुजला क्षण ५१
न भगवें फडकेल निशाण या । महिवरी, गत जें पुरतें लया ॥
परत घेउन लूट पुण्याप्रत । कधिंच येतिल वीर न सांप्रत ! ॥५२॥
सण घडे दसरा प्रतिवत्सरीं । परि न सौख्य मनाप्रत तो करी ॥
जमुन येउन योध निजस्थळीं । उतरती न पुण्याजवळी बळी ५३
' न रजपूत निजाम न हैदर । नच नजीब बघो तुमचा कर ' ॥
धुळिस त्यां मिळवा न असे कधीं । सुटति आज हुकूम पुण्यामधीं५४
रजत कांचन मौक्तिक माणिक । धन जयां जवळी बहु आणिक ॥
विलय पावति थोर कुबेरसे । धनिक सांप्रत अन्न तयां नसे ५५ ॥
तरुण कोणि कुलीन महाजन । स्व-कुल-वैभव आठवुनी क्षण ॥
बघति दीन जुन्या तरवारिला । फुकट जन्म तयांप्रत भासला ॥५६॥
वसति पुण्य-पुरेंशा जिये बरे । नयन-सौख्यद सुंदर मंदिरें ॥
प्रभु-महाविरहाग्नि न सोसवे । म्हणुन जाळुन घेति न राहवे ! ॥५७॥
बसुन आस्व उंच हयांवर । करिति रक्षण जेथ निशाभर ॥

---

१ रूपें. २ पेशवे. ३ धन्याच्या विरहाचें दुःख.

दिसत तें शनवार-पटांगण । किति उदास! जना बघवेच न ! ॥५८॥
समयिं त्या असतां चढती कला । स्व-धन संचय पुष्कळ खर्चिला ॥
सघन पूर्व-जनीं रचिलें घरां । उठविलें नगरीं जणु डोंगरां! ॥ ५९ ॥
सुख-विलास-निमग्नच माणसें । वसुन उत्सव जेथ सदा असे ॥
पडति तीं सदनें प्रतिवत्सरीं । कवण दागदुजीहि तयां करी ? ॥६०॥
अतुल वैभव शास्त्र-कला-गुण । सकल जाति पुण्यांतुन लोपुन ॥
नवनवीं व्यसनें नव दुर्गुण । नव विचार इथें नव भाषण ! ॥६१॥
जरि पुढें आणखी शत वत्सर । स्थिति अशीच असेल अम्हांवर ॥
स्व-जन-राज्य इथें वसलें असें । वदति कीं अमुचे पणतू कसे ? ६२
जनहि दुर्बळ होति दिनोदिन । विसरले अपुले मुळचे गुण ॥
बदलुं पाहति पद्धति ते जुनी । म्हणुन फार विषाद वसे मनीं ॥६३॥
जंव विचार असे मनिं खेळती । बहु उदास तयां घडते स्थिती ॥
म्हणुन एकिकडेच तयां करूं । पुनरपि स्वकथेस करीं धरूं॥ ६४ ॥
मग अनंत पुन्हा वदुं लागला । "हृदयिं संशय फार बळावला ॥
परिसतील वचा मम पेशवे ? । पुढिल तें भवितव्य न जाणवे ॥६५॥
नृपति बंधु सदाशिवराव तो । सकल काम पुण्यांतील पाहतो ॥
सह ठराव पुण्यांतिल गादिच्या । मसलती करितो दरबारच्या ॥६६॥
विलसतो दुसरा रघुनाथही । निजबळें चिर कांपविता मही ॥
पतरला अटकेवर जाउन । करित धर्मच त्याप्रत बंधन ॥ ६७ ॥
धरून दोनहि बंधु महागुण । सुदृढ मत्सर त्यां करि बंधन ॥
वरचढी बघतात करावया । स्वहित साधुन त्यांतच घेउं या ॥ ६८ ॥

---

१ शनवारच्या वाड्यासमोरील.

शिंदे तसे होळकरादि वीर । मराठि राज्या दृढ खांब धीर ॥
त्यां आवडे तो रघुनाथराव । ज्याचा असे मोहक सुस्वभाव ॥ ६९ ॥
आहे जरी शूर महाभिमानी । सदाशिवा लोक न फार मानी ॥
तो पेशव्याच्याच परि प्रसादें । वाढूनियां होळकरा भया दे ॥७०॥
जाईन भेटूं मग पेशव्यातें । भेटेन आधींच सदाशिवातें ॥
सांगेल तो मार्ग धरीन पाहें । कीं आपणां त्यांतच इष्ट आहे" ॥७१॥

अनंताचार्यांनीं मसलत मनीं हीच धरिली ।
तियेला तन्मित्रें अनुमतिहि तेव्हांच दिधली ॥
प्रवासाचा व्हावा म्हणति जन ते शेवट बरा ।
महोत्साहें मार्गे शिरति बघतां पुण्य-नगरा ॥ ७२ ॥

---

# सर्ग तेरावा.

अनंताचार्य सदाशिवरावभाऊची भेट घेतात—सदाशिवराव अनंताचार्यांस आश्वासन देतो—पेशव्याचें दरबार—अनंताचार्यांचें दरबारांत भाषण—त्या भाषणाचा पेशव्याच्या मनावर परिणाम—वादविवाद—पेशव्याचा निश्चय.

श्लोक.

तो विप्र जाऊन सदाशिवाला । भेटे न जों येउन वेळ झाला ॥
वृत्तांत कोटा—शहरीं उदेला । तो सर्व ही त्याप्रत सांगिजेला ॥ १ ॥
उन्मत्त खानें कवण्या तऱ्हेनें । लोकां छळीलें कथिलें तयानें ॥
जो सिद्ध कोटापुर सोडवाया । वाखाणिलें त्या यशवंतराया ॥ २ ॥
" दिल्ली-पतीनें धन देउं केलें । तेणें मराठे वश त्यास जाले ॥
आले कराया यशवंत-नाश । घालून वेढा बसले पुरास ॥ ३ ॥
प्रत्येक होते दिवसास झुंज । दोहींकडे पावत नाश फौज ॥
आलों म्हणोनी विनती कराया । कीं वांचवावे यशवंतराया ॥ ४ ॥
आहों स्वधर्मी म्हणुनी तयार । मैत्रीस होऊं न धरूं हत्यार ॥
या रक्त-पाताप्रत थांबवावें । आतां न कोणासहि दुःख व्हावें " ॥ ५ ॥
ऐकून हें वृत्त समस्त डोलें । भाऊ तयाला मग काय बोले ॥
" आचार्य यावें दरबारिं आज । पाहीन आधीं तुमचेंच काज ॥ ६ ॥
सांगून मी पाहिन पेशव्याला । ऐकेल माझ्या बहुधा वचाला ॥
पाडीन त्याची समजूत कांहीं । मी पक्ष घेतों तुमचाच पाहीं ॥ ७ ॥
वाड्यांत होतो दरबार जेव्हां । हा जाणवा अर्ज नृपास तेव्हां ॥
जें जें तुम्हातें वदणें वदावें । सर्वांस तें विश्रुत तेथ व्हावें " ॥ ८ ॥

त्या रात्रिं झाला दरबार आले । झुंजार ते मानकरी मिळाले ॥
गेला भरोनी शनवार–वाडा । ऐसा जमे लोक–समूह गाढा ॥ ९ ॥
जाया निघाला मग तो अनंत । मार्गीं चमत्कार बघे अनंत ॥
जीं जीं बघे वस्तु नवीन वाटे । पाहून आश्चर्य मनांत दाटे ॥ १० ॥
नानाप्रकारें करुनी सुवेष । ऐश्वर्य दावूं बघते अशेष ॥
फेकीत दृष्टी भंवति अमंद । तेथें किती जाति खुशालचंद ॥ ११ ॥
शृंगारिलें अश्व सुभूषणांनीं । कित्येक त्यांच्या वरती बसूनी ॥
रस्त्यांत डौलें फिरतात.दृष्टी । लोकांचिया ओढुन ते धरीती ॥ १२ ॥
वारांगना सुंदर पद्म–नेत्री । जातात मार्गांतुन रम्य गात्री ॥
त्या मारिती चंचल वक्र डोळे । ते बाण फाडूनच ऊर गेले! ॥१३॥
श्रीमंत संभावित सभ्य लोक । जातात देवालयिं ते अनेक ॥
धंदे किती आटपुनी निघाले । याया गृहा, एकच गर्दि चाले १४
पोटें परान्नें फुगवून तट्ट । खुशाल येथें बसतात भट्ट ॥
हे मठ्ठ बुद्धींत शरीरिं लठ्ठ । दानालयीं दाविती घट्ट हट्ट! ॥ १५ ॥
रस्त्यांत गर्दी. मिळतो न वाव । जाती निराळ्या विविध–स्वभाव ॥
वेषांत वृत्तींत तसे निराळे । एका स्थळीं लोक कसे मिळाले ॥१६॥
तो विप्र जाऊन नृपालयांत । पोंचे तसा नीट महासभेत ॥
तेथें व्यवस्थापक येउनीया । योग्यासनीं सांगति या बसाया ॥ १७ ॥
पाहे सभेला सरदार लोक । युद्धप्रयायी बसले अनेक ॥
ठोकून वीरासन धीर मुद्रा । धिक्कारिती दाउन जे समुद्रा ॥ १८ ॥
जों शत्रुचा थोर पडून घाला । राज्यास धोका अनिवार आला ॥

---

१ सर्व.

ज्यांनीं बळें तो परि दूर केला । होते असे वीर तया सभेला ॥१९॥
वंशांतले वीस पुरुष ज्यांचे । स्वराज-कार्या झटणार साचे ॥
गेले मरोनी लढतां रणांत । सभेंत होते बहु राज-भक्त ॥ २० ॥
व्यापार शेती कुल-वृत्ति यांतें । धिक्कारुनी शस्त्र धरून हातें ॥
जे वैभवाला चढले अपार । होते असे शूर सभेस फार ॥ २१ ॥
कोणी महात्मे असतां लहान । जे तर्किले सुज्ञ-जनीं न सान ॥
ज्यांचा प्रतापार्क उजेड पाडी । पृथ्वीवरी, भीति अरींस धाडी ॥२२॥
किल्लेकरी सावध पूर्ण सिद्ध । किल्ला मिळेना करुनी सुयुद्ध ॥
वेगें शिड्या लावुन दुर्ग घेते । धैर्यांबुधी योध सभेस होते ॥ २३ ॥
कांहीं नवे काढुन नीति-पंथ । सौख्य प्रजांचे बहु वाढवीत ॥
न्यायें प्रजा तोषित ज्यांहिं केली । होते सभेला जन बुद्धि-शाली २४
पर्जन्य-काळीं रिपु अन्य-तीरा । दांतांत धैर्यें धरुनी हत्यारा ॥
हाणीति शत्रूंस तरून पूर । होते तिथे यापरि वीर शूर ॥ २५ ॥
गाजी मराठ्यांमधि शूर बाजी । जो भासला कीं दुसरा शिवाजी ॥
त्याचे सखे साहस संकटांत । कित्येक होते सरदार तेथ ॥ २६ ॥
गादीवरी शोभत तेथ नाना । दात्यांमधें कर्ण जया म्हणाना ॥
भावांवरी टाकुन राज्य-भार । जो भोगिता भूप-विलास थोर ॥२७॥
दोघेहि बंधू असुनी समर्थ । जे वाढवूं राज्य सदा पहात ॥
डोक्यावरी भार धरील तो कां ? । आणी स्व-सौख्यास कशास धोका? २८
या पेशव्यानें परि पूर्व काळीं । साधून कामें बहु कीर्ति केली ॥
राज्याचिया दुर्गम नीति-शास्त्रीं । प्राविण्य दावी असुनी सुशास्त्री ॥२९॥
नाग्यावरी बैसुन तो पुण्यांत । संकल्प जे गुप्त करी मनांत ॥

येती फळें त्या जणु आपआप । तेव्हां कळे तन्मतिचा प्रताप ॥३०॥
युद्धाविणें जो निजकार्य साधी । उपाय योजी बहु सौम्य आधीं ॥
कोणी तयाला कपटी म्हणोत । न दोष त्या देतिल कोंकणस्थ ३१.
बापाप्रमाणें अतिरम्य-मूर्ति । होती तयाची बहु शांतवृत्ति ॥
काळे तया किंचित थोर डोळे । जें धूर्तता--दर्शक तेज खेळे ॥३२॥
सुदैव तें दावित थोर भाळ । बाहू तयाचे दिसती विशाळ ॥
उभार आकार न पुष्ट भासे । नाना असा त्या दरबारिं बैसे ॥३३॥
विश्वास आणी रघुनाथराव । भाऊ हि तेथें सरल-स्वभाव ॥
शोभेस देती दरबारिं साचे । बैसून जे हातच पेशव्याचे ॥ ३४ ॥
जे मैत्रिला इच्छिति पेशव्याशीं । नृपाळ जे राहति दूरदेशीं ॥
त्यांचे सभेला मुखत्यार हो ते । प्रसन्न मर्जी करण्यास होते ॥ ३५ ॥
झुंजार इब्राहिमखान गारदी । जो शत्रु हे पाक्षि तयांस पारधी ॥
मेहेंदळेही बळवंतराव तो । बैसून सन्मान विशेष पावतो ॥ ३६ ॥
उतार ज्याचें वय भव्य कांती । जो जाणणारा दरबार--रीती ॥
तेथें व्यवस्थापक शुभ्र--केश । गादीपुढें साहि उभा सुवेष ॥ ३७ ॥
बोलावया त्या समयीं द्विजातें । हळूच तो दावित खूण हातें ॥
अनंत राहून उभा सभोंती । पाहे सभा सर्वहि एकदा ती ॥ ३८ ॥
यातें न्यहाळून किती पहाती । परस्परीं गोष्टि हळू करीती ॥
कटाक्षही टाकिति एकमेकां । संकेत केले दुसरे अनेकां ॥ ४० ॥
तो स्पष्ट साधें मधुर स्वरानें । लागे करूं भाषण आर्जवानें ॥
कीं व्यक्त ज्या ज्या विषया करीतो । त्या त्या मधें तन्मय-चित्त होतो ४१.
" बल्लाळ भूपा ! नय-मार्ग--चारिन् । हे हिंदु--लोक-प्रतिपाल--कारिन् ॥

श्रीमंत तूं सत्यच भाग्य-शाली । येवो जयश्री तुज सर्व काळीं ॥४२॥
कोटापुराहून पुण्या निघालों । विज्ञापना मी करण्यास आलों ॥
दयाळु चित्तें परिसून घ्यावी । बुद्धी तुला न्याय करूं घडावी ॥४३॥
स्वतंत्र कोटा असुनी प्रदेश । म्लेच्छांचिया जाय कसा करास ॥
हें सर्व तूं जाणसि लोक-नाथा ! । सांगेन कां तो इतिहास आतां ?४४
हिंदु प्रजा दुर्बल म्लेच्छ-हस्तीं । येऊन जे तेथ अनर्थ होती ॥
राज्यांत दिल्ली—पतिच्या घडून । ते सर्व आले कथितों म्हणून ॥४५॥
दिल्ली-पती दिल्लिर आप्त नेमी । मानी सुभेदार सुभ्यास कामीं ॥
कोट्यास येऊन अनर्थ केले । त्यानें जनां फारचि गांजियेले !॥४६॥
अन्याय-मार्गें कर बैसवीले । व्हावे तसे सज्जन नागवीले ॥
लोभी मनुष्या अधिकार हातीं । सामर्थ्य मोठें नच लाज चित्तीं॥४७॥
वाटे न कांहीं तर रक्त-पात । चुके कराया नच जीव-घात ॥
द्रव्यार्थ मार्गीं भलत्या पडून । घे साधुनी इच्छित कार्य खान ॥४८॥
लोकांस वाटे परि हा न मोठा । अन्याय झाला जरि फार तोटा ॥
दिल्लीर वित्तार्थच ताप देतो । नाहीं तिथे काय करील कीं तो ! ४९.
वित्ताहुनी वस्तु जगांत कांहीं । आहेत ज्यां मौल्यच होत नाहीं ॥
त्या वस्तु घेऊं जंव खान पाहे । होऊन तो एक अनर्थ राहे ! ॥५०॥
धर्मामधें होउं जुलूम लागे । उन्मत्तसा दिल्लिरखान वागे ॥
स्व-धर्म-कर्मं प्रतिबद्ध झालीं । नीती जनाची बिघडून गेली ॥ ५१ ॥
कामांध तो दिल्लिर दुष्ट थोर । कुलस्त्रिया नेइ करून जोर !॥
येईल कोणावर धाड खोटी । रात्रंदिनीं काळजि हीच पोटीं ! ॥ ५२॥
बेबंद झालें सगळेंच राज्य । अन्याय-वन्हीमधिं होय आज्य ॥

वेळीं उभा त्या यशवंत राहे । रक्षावया हिंदु जनास पाहे ॥ ५३ ॥
आहे मराठ्यांत तयास जन्म । अर्थात त्याचें नन-मान्य कर्म ॥
अन्याय देखूं शकला न वीर । गोळा करी लोक धरून धीर ॥५४॥
देऊन कीं तो स्वसुखास लात । कामीं अशा दुर्घट घालि हात ॥
होऊनियां सक्त परोपकारी । राहे उभा सज्जन मृत्यु-दारीं ॥ ५५ ॥
त्यानें तयारी लढण्यास केली । वार्ता अशी जौं नगरीं उदेली ॥
तों भ्याड तो खान पळून गेला । धनी पुराला यशवंत झाला ॥५६॥
झाल्याविणें एकहि जीव-नाश । स्वातंत्र्य पावे सगळाच देश ॥
तों विघ्न आला अविचार एक । भ्याले जया चिंतुनि सर्व लोक ॥५७॥
दिल्लीपती मालक त्या पुराचा । संतापला घातक दुर्बलांचा ॥
मल्हारराया मग लोभ दावी । सैन्यें मराठी निजकार्यिं लावी ॥५८॥
तो राजपूतांसह भांडताहे । रक्षीत कोटा यशवंत राहे ॥
चोहींकडे होउन रक्त-पात । दुःखामधें देश असे समस्त ॥ ५९ ॥
यासाठिं मातें यशवंत पाठवी । कीर्ती तुझी थोर मनांत आठवी ॥
वारूनियां होळकरास सत्वर । तूं शांति देशाप्रत दे सुखाकर ॥६०
वृत्तांत माझा इतुकाच आहे । तो सांगुनी स्वस्थ बसून राहे ॥
तूं एक शब्दा सदया! वदावें । लक्षावधी जीव सुखी असावे ॥६१॥
हातांत येतां अधिकार शक्ती । दीनां छळावें नच राज्य-रीती ॥
हा होतसे हिंदुवरी जुलूम । हें कीं मराठ्यांप्रत योग्य काम ? ॥६२॥
स्व-देश-मुक्तीकरितां झटावें । स्वधर्म-संवर्धन ही करावें ॥
स्व-राज्य-योगें स्वजनांस सौख्य । असे मनीं हें धरि तत्व मुख्य ॥६३॥
ज्याचें असे संमत याच कामा । स्थापी महाराज्य शिवाजि राना ॥

देशोन्नतीचाच जयास काम । तो शोभला वीर-शिरोललाम ।। ६४ ।।
तो स्तुत्य हेतू धरुनी मनांत । हें कार्य हातीं यशवंत घेत ।।
कां आडवे आज तयास येतां ? । कां ही चिर-स्थायि अकीर्ति घेतां ६५
वैराण झाला सगळा मुलूख । खाया नसे अन्न जनां कितीक ।।
लागेल जें घेउन तेंच हातीं । देशांतरा तेथिल लोक जाती । ६६ ।।
व्हावा अम्हां हर्ष तुम्हां पहातां । स्वजातिचे यास्तव भेट होतां ।।
हें आज आलें अमुच्या कपाळा । घेणें करीं की तरवार भाला ६७
जे नित्य कोटा—शहरासभोंतीं । युद्ध-प्रसंग स्वननांत होती ।।
जाती लयाला किती वीर-रत्नें । जीं वाटती दुर्मिळही प्रयत्नें ।। ६८ ।।
दुष्काळ मोठा पडला असेल । कोटयांत कोणीहि सुखी नसेल ।।
शें दोनशें नित्य मनुष्य-घात । होतील दुःखें रडतील आप्त ।। ६९ ।।
झुंझार मोठे तुमचे मराठे । घेतील काळें नगरास वाटे ।।
अपार हानीस वरून कांहीं । नाहीं तयां तादृश लाभ पाहीं ।। ७० ।।
मल्हाररावास हुकूम द्यावा । मोर्चा तयाचा तिथुनी उठावा ।।
झालें असो काय उपाय त्याला । ऐकें विनंती अजुनी दयाळा ! ७१
कल्याण जे इच्छिति पेशव्यांचें । होवो अकल्याण न त्या नरांचें ।।
नाचो जगीं तें भगवें निशाण । म्लेच्छावरी हिंदुवरी कधीं न ।।७२।।
आहेत उन्मत्त अरी जगांत । त्यांच्यावरी सैन्य सुटो अनंत ।।
कोटयांतले दुर्बळ लोक त्यांतें । मारूनियां काय नफा तुम्हांतें ? ।।७३।।
गंगानदी पैलतटीं अपार । जावोत वेगें उतरून वीर ।।
निर्मूळ होवो परधर्मि वैरी । शोभाल तेणें भुवनाधिकारी ।। ७४ ।।

आम्हीं प्रसंगीं रजपूत येऊं । हर्षें यथाशक्ति सुसाह्य देऊं ॥
व्हावे मराठ रजपूत राया । एकत्र अन्योन्य–हिता झटाया ॥ ७५ ॥
श्रीमंत राजे मुखत्यार येथें । जे धाडिती देउन संपदेतें ॥
नाहीं तसा मीं परि विप्र भोळा । होवोन अन्याय म्हणे दयाळा ! ७६.
बोलावयाला निज पक्ष युक्त । नाहीं मला युक्ति वदूं सदुक्त ॥
मी नम्रसा सेवक या पदांचा । पाढा असें वाचित आपदांचा ॥७७॥
नेत्रांमधें आणुन अश्रु-वारी । लक्षावधी दुर्बळ लोक दारीं ॥
माझे मुखें बोलति हे समक्ष । दें त्यांकडे एक कृपा-कटाक्ष !"॥७८॥
बोलून हे शब्द अनंत ऐसें । सन्मान्य आचार्य उगीच बैसे ॥
व्याकर्षिलीं लोक-मनें तयानें । ते बैसती निश्चल विस्मयानें ॥ ७९ ॥
तों पेशवा बोलत रम्य वाणी । पोटीं महात्मा करुणेस आणी ॥
"वृत्तांत जो त्वां कथिला अनंता । झाला अम्हां विश्रुत तो समस्तां ८०
गोष्टींत या होळकरास दोष । द्यावा असें वाटतसे मनास ॥
मल्हार वेढा उठवून जाई । काढीन ऐशी तजवीज कांहीं" ॥८१॥
तों शौर्यशाली रघुनाथ दादा । वेळेस त्या बोलत काय शब्दां ॥
"मल्हारावाप्रत दोष देतां । नाना ! असे दुःख म्हणून चित्ता ॥८२॥
मल्हार तो सुज्ञ जनांस ठावा । प्रताप त्याचा कवणें वदावा ? ॥
त्याच्या मनाला न विषाद व्हावा । विचार कांहीं असला करावा ८३
त्या सार्वभौमाप्रत दिल्लिनाथा । अयुक्त कांहींच न साह्य देतां ॥
पुराण तो भूपति-वंश गाजे । सन्मान देतात म्हणून राजे ॥ ८४ ॥
जे शाहुराजावर बादशाहें । अनंत केले उपकार पाहें ॥
ते पाहिजे आठविलें मनांत । झालों मराठे जरि शक्तिमंत ॥ ८५ ॥

इच्छा जरी उत्तर–देश घ्यावा । तो आपुला बादशहा करावा ॥
सन्मान त्याचा यवनांत वागे । हें ठेवणें नित्य मनांत लागे" ॥८६॥
संतापला ऐकुन या वचाला । सदाशिव श्रेष्ठ तदा म्हणाला ॥
"दादा ! कसेंही म्हणती म्हणोत । न वाटतें तें मजला सुयुक्त ॥८७॥
जो दिल्लिच्या बादशहास तोष । द्याया स्वयें दे स्वजनास रोष ॥
जो शक्ति लावी भलत्याच कामीं । वाखाणितो होळकरास कां मी ? ८८
मेघांप्रमाणें मिळुनी समस्त । एकेक एकत्र अविध होत ॥
मल्हार वायू करितां निराळे । त्यांतें तरी योग्य धरून भाले ॥ ८९ ॥
प्रख्यात-कीर्ती सरदार धीट । पेटे हठा हें गमतें न नीट ॥
कां हिंदुचें रक्त पडेल खालीं ? । इच्छा अशी कीं यवनास झाली ९०
कोटयांतुनी दिल्लिर घालवाया । स्व-राज्य-संस्थापनहीं कराया ॥
जो बेत घाली यशवंतराज । सुज्ञांस तें होइल मान्य काज ॥ ९१ ॥
त्या नागरांचा करुनी विनाश । देणें पुन्हा तें पुर मोंगलांस ॥
ही गोष्ट तो केवळ निंद्य आहे । दुष्कीर्ति देईल अम्हांस पाहें ॥९२॥
हिंदूंत आणी यवनांत मोठें । होणार केव्हां तरि युद्ध वाटे ॥
रक्षूं म्हणोनी रजपूत सर्व । कीं शत्रुचा ते हरितील गर्व ॥ ९३ ॥
यासाठिं येथून हुकूम जावा । मल्हार ताळ्यावर नीट यावा ॥
कोटयांतले लोक सुखीं असावे । त्यांनीं नृपा ! त्वद्गुण-गीत-गावें" ९४

यापरि वादविवाद घडे दरबारिं महा ।
भांडति ते रघुनाथ सदाशिवराव पहा ॥
काय इथे करणें नच पेशवियास सुचे ।
भाउ वदे समयास तया वच तेंच रुचे ॥ ९५ ॥

---

## सर्ग चौदावा.

कोटा-शहराभोंवतीं मराठ्यांचा गराडा—त्या शहरांत दुष्काळ पडतो—कोटा-शहर मराठ्यांच्या स्वाधीन करण्याविषयीं नागरिक लोकांची यशवंतरायास विनंति—यशवंतराय ती मान्य करीत नाहीं—पुण्याच्या दरबारांत घडलेली हकीकत होळकरास कळते—शेवटची लढाई करण्याची मसलत व तयारी—मराठे कोटा शहराचा एक दरवाजा हस्तगत करून आंत प्रवेश करितात—लढाई—यशवंतराय युद्धास निघतो—माता व पुत्र—निकराची लढाई—यशवंतरायाचा पराक्रम—नागरिक लोकांचें आवेशानें व निराशेनें लढणें—मराठ्यांचा जय—यशवंतराय प्राण द्यावयास उद्युक्त होतो—मानसिंग वगैरे त्याचे मित्र त्यास समरांगणांतून एकीकडे काढतात व त्याची समजूत घालितात—तो रजपूत राजांचें साहाय्य मिळवून मराठ्यांशीं पुन्हा लढण्याच्या हेतूनें जोधपुरास जातो—कोटा-शहर मराठ्यांच्या स्वाधीन होतें.

### आर्या.

यशवंत शौर्यशाली सावध रक्षूं पुरा बळें पाहे ॥
कोटा शहरांतिल जन त्याच्या आज्ञेंत सर्वदा राहे ॥ १ ॥
पडले शिथिल मराठे तोफांचा मार बंदही झाला ॥
उत्साह धीर तों तों यशवंताच्या मनामधें आला ॥ २ ॥
आज उद्यां अरि जातिल भांडुन कंटाळतां स्वदेशाला ॥
मोर्चे उठतां मुक्तच आपण होऊं असें गमे त्याला ॥ ३ ॥
परि जागच्याच जागीं हे गोड विचार राहती सर्व ॥
मल्हार तो न जाता घालविता होय त्या जरी शर्व[1] ॥ ४ ॥
अन्नाची सामग्री सरतां येतील पार कीलाला ॥

---

1 शिव.

शस्त्रें ठेवुन होतिल शरणागत हे त्यजून डौलाला ॥ ५ ॥
मल्हार हेंच चिंतुनि कोटा-शहरासभोंवतीं घाली ॥
वेढा तेणें आशा यशवंताची प्रनष्ट ती झाली ॥ ६ ॥
ज्या रजपूत नृपांनीं वचन दिलें साह्य द्यावया मागें ॥
एक न त्यांतुन येउन द्यायाला हात संकटीं लागे ॥ ७ ॥
बाहेरून ते नृपती आंतुन नगरस्थ भांडते हो ते ॥
तरि दक्षणी कदाचित् युद्धा सोडून चालते होते ॥ ८ ॥
परि तें घडलें नाहीं यशवंता न च सुचे तदा कांहीं ॥
दिग्भाग शून्य दाही विप्राची[1] वाट सर्वदा पाही ॥ ९ ॥
नाउन अनंत येइल साधुनियां काम वाटलें नाहीं ॥
होउन निराश यास्तव प्रति दिवशीं फार काळजी वाही ॥ १० ॥
हाहाकार उडाला नगरीं दुष्काळ थोरसा पडला ॥
भयदा दुःखांबुधिच्या[2] सर्वहि जन भोंवऱ्यांत सांपडला ॥ ११ ॥
रस्तोरस्तीं फिरती होउनियां दीन मारिती हांका ॥
कळवळती तें पाहुन सज्जन म्हणतात ' नेत्र हो! झांका! ' ॥१२॥
एकैक मौल्यवान हि विकिती श्रीमंत वस्तु वांचाया ॥
कोठून त्या प्रसंगीं सुचतें त्यां गावयास नाचाया! ॥ १३ ॥
माता कितीक बैसति करती चिंतेंत लावुनी डोळे ॥
केविलवाणें रडती शिशु त्यांतें चित्त पाहुनी पोळे! ॥ १४ ॥
काळाच्या तोंडांतुन बाळाला सोडवूं धरी आशा ॥
मातृ-स्नेहें माता शांतीनें आपुल्या वरी नाशा ॥ १५ ॥

---

१ ब्राम्हणाची ( अनंताचार्याची. ) २ दुःखसमुद्राच्या.

व्यर्थ प्रयत्न झाले दिवसभरी मूठ धान्य मिळवाया ॥
साश्रु घरीं पति येतो दुःखें भार्येस हेंच कळवाया ! ॥ १६ ॥
सरता धान्य नरांनीं पशुंवरती धाड घातलि पहा ! ती ॥
घोडीं डुकरें कुतरीं उंदिर ही मांजरें हि जन खाती ! ॥ १७ ॥
दुष्काळाची उठली प्रेमळ भगिनी पुरीं महामारी ॥
करूनी खटपट झटपट धरुनि जना कितिक नित्य ती मारी ॥१८॥
काय करावें आतां ऐशा चिंतेंत यत्मनें जळती ॥
कोटयांतील महाजन यशवंताच्या गृहीं तदा मिळती ॥ १९ ॥
यशवंत त्यांस बोले " सोडुं नका धैर्य लोकहो ! अजुनी ॥
पूर्वज-जनाचरित जी रीती विसरून काय होय जुनी ॥ २० ॥
वेढा उठवुन जाइल वाटे मल्हारराव होळकर ॥
निज कार्य-साधनांतीं आतां तुमचा करो न घोळ कर ॥ २१ ॥
बघतात मराठ्यांच्या हातुन जे सोडवूं कुशल मान ॥
जमतात उत्तरेच्या प्रांतांत बलाढ्य ते मुसलमान ॥ २२ ॥
रघुनाथराव येतो शूर पुण्याहून त्यांस दंडाया ॥
सैन्य प्रचंड संगें घेउनियां शत्रु-गर्व खंडाया ॥ २३ ॥
मल्हारराव कोटा सोडुन त्याच्या पळेल साह्याला ॥
आपोआपचि जातो काय बळी प्राण देतसां ह्याला ? ॥ २४ ॥
राहे जीवित देहीं तोंवरि लढतां रणीं खुशाल मरूं ॥
यावच्चंद्र-दिवाकर झटुनी समयास या सुकीर्ति वरूं ॥२५॥
जाऊन शरण आतां नाहीं कल्याण होळकर याला ॥
केला प्रतिबंध तया नेइल तो सर्व नगर विलयाला ! ॥२६॥

झाला असे तयाचा नाश अमित सूड कां न घेईल ?॥
जाळुन नाशुन लुटुनहि त्याच्या न मनास शांति होईल!॥ २७ ॥
यासाठीं या समयीं बैसुं नका धीर सोडुनी स्वस्थ ॥
द्या टक्कर झटुन हठें होळकराशीं पुरांतुनि समस्त "॥ २८ ॥
हें यशवंत महात्मा बोलुन वच नागरां परत धाडी ॥
उत्तेजनपर भाषण करुन निराशा मनांतुनी काढी ॥ २९ ॥
बसला बसला वाटच मल्हार पहात नीट गोटांत ॥
स्वाधीन नगर होइल ऐशी आशा धरून पोटांत ॥ ३० ॥
विप्र अनंत यशस्वी येइ पुण्याहून बातमी लागे ॥
सत्वर जवळी बाहे सरदार तयांस काय मग सांगे ॥ ३१ ॥
"बसलों वेढा घालुन महिने मी तीन या पुरापाशीं ॥
सर्व प्रयत्न झाले निष्फळ आतां कराल गत कैशी ?॥ ३२ ॥
स्वस्थ असे जरि बसलों होइल परिणाम काय हें कळतें ॥
सोडुन कोटा जावें लागेल म्हणून फार मन जळतें!॥३४॥
कांहीं उणें कराया राव सदाशिव घडी घडी पाहे ॥
कानांत पेशव्याच्या सांगाया वेळ साधिल न कां हे !॥ ३५ ॥
पस्तीस तीस वर्षें केल्या त्या ख्यात मीं बहु लढाया ॥
परि कोणी हि न टिकला भगव्या झेंड्यापुढें अरि लढाया!॥ ३६ ॥
येईल पेशव्यांची आज्ञा परतावयास त्या आधीं ॥
करिं एकदाच हरिहर हल्ला करूनी मनोगता साधीं ॥३७॥
इतुके प्रयत्न करूनी कां मी परतेन हात हालवित ॥
घेइन कोटा झगडुन नेइन रजपूत दूर घालवित ?" ॥३८॥

ती युक्ती मानवली सर्वां सरदार शूर लोकांला ॥
शेवटचा यत्न करूं सर्वांचा बेत एकदा झाला ॥ ३९ ॥
ठरला दिवस तयारी केली मोठी लढावया पूर्ण ॥
तरवारी भाल्यांनीं रिपु-सैन्याचें करूं म्हणाति चूर्ण ॥ ४० ॥
प्रातःकाळापासुन झाली सैन्यांत हालचाल सुरू ॥
तों ते नागर सावध सिद्धच निज-रिपु-निवारणास करूं ॥ ४१ ॥
होते वेढुन चवघे भवते सरदार शूर विख्यात ॥
ज्यांचें समरीं कौशल इतिहास-प्रिय जनां असे ज्ञात ॥४२॥
दिनरात्र युद्ध करणें आवडलें हेंच त्यांचिया चित्ता ॥
जो बाजिराय घाली वळवील न बुद्धिमंत कां कित्ता ! ॥ ४३ ॥
ती रात्र पौर्णिमेची होती नुकताच चंद्र वर आला ॥
पूर्वेकडुन भयंकर भडिमार तटावरी सुरू झाला ॥ ४४ ॥
पुरवासी ही ठेविति मार मराठयांवरी तदा उलटा ॥
दोन्ही पक्षांकडल्या भांडतिं तोफा जयार्थ कीं कुलटा ॥४५॥
तों *जानराव चढला गुप्तपणें उंच ही तटावरती ॥
धीट तयाच्या मागुन वीर मराठे हजार वर चढती ॥ ४६ ॥
प्रतिबंध त्या तटावर नाहीं झालाच जानरावास ॥
वेशीवरती जातां पडले नाहींत त्यास आयास ॥ ४७ ॥
'हरहर' करिति मराठे खरतर तरवारि चमकती फार ॥
हल्ला रजपूतांवर करिति न ते जाहले जंव तयार ॥ ४८ ॥
क्षणभर होय चकामक सांपडले शत्रु मारिले ठायां ॥

* मराठ्यांच्या फौजेंतील एक सरदार.

हातां पायां घायां घेउन रजपूत जहाले जायां ॥ ४९ ॥
घटकेंत तट मिळाला वेशीजवळील जानरावास ॥
रण-मंदिरांत रुचला जन्मभरि श्रेष्ठ ज्या नरा वास ॥५०॥
परि त्या वेशीखालीं जमले होते अपार नागर ते ॥
जिंकुन घेऊं पाहे वेश बळी संकटीं कसा परते ? ॥ ५१ ॥
त्यानें खूण दिली ती ऐकुन बाहेर जाहले जागे ॥
तोफांसहित मराठे त्या वेशीजवळ धांवले रागें ॥ ५२ ॥
दरवाज्यावर झाली तोफ सुरू ती धुडूं धुडूं वाजे ॥
गोळे येति धडाधड आपटती तो ध्वनी नभीं गाजे ॥५३॥
होऊन छिन्न गेला दरवाजा उडुन दूरसा पडला ॥
आंत घुसायास बळें वेळ मराठ्यांस योग्य सांपडला ॥५४॥
तोफा ओढुन नेल्या मागें, मल्हार येउनी घुसला ॥
फुरफुरतां कर गर्जे हर्षें आवेश तन्मनीं वसला ॥ ५५ ॥
गडबड झाली ऐकुन उठला यशवंतराय खडबडुन ॥
मातेच्या चरणाला प्रथम मिठी नम्र घालि कडकडुन ॥ ५६ ॥
“ माते ! पुरीं मराठे येतात असें मला खचित कळतें ॥
जातों पुर रक्षाया दावाया त्यांस केवि मम बळ तें ॥ ५७ ॥
झालों विजयी जरि तरि येइन मी तुजसि तोंड दावाया ॥
दाविन कीं तव उदरीं जन्म न म्यां घेतला असे वायां ॥ ५८ ॥
दे आशीर्वाद तुझ्या पुत्राला तोच त्यास तारील ॥
पुण्य-प्रताप तव कीं वाटे मम सर्व शत्रु मारील ” ॥ ५९ ॥
कमला यशवंताला पाहुन समरोन्मुखास गहिंवरली ॥

"मी धन्य धन्य माता बाळा प्रसवून यास महिवरली ॥ ६० ॥
जा वत्सा यशवंता समरीं तुज लाडक्या विजय येवो ॥
प्रभु तव कल्याण करो सांभाळुन तुजासि संकटीं नेवो" ॥ ६१ ॥
दंगा होता तिकडे आला यशवंतराय धांवून ॥
अत्युग्र दिसे क्रोधें नगरीं रिपु—सैनिकांस पाहून ॥ ६२ ॥
आले स्फुरण मुसंडी मारिति डुकरासमान रजपूत ॥
त्यांवरि उठति मराठे रागें कीं उठविलें जणो भूत ॥ ६३ ॥
यशवंतानें केला थोर पराक्रम रणांत त्या काळीं ॥
नेटें परि मल्हारी पाउल एकेक तो पुढें घाली ॥ ६४ ॥
तों प्रळय-मेघ-गर्जन—सम पडला गडगडाट कानाला ॥
थरथर हाले भूमी वाटे जाईल काय पाताळा ॥ ६५ ॥
दक्षिण दिशेस मानी *मानाजी स्वस्थ बैसला नाहीं ॥
तट ध्यायास हळू हळु खटपट होता करीत तो कांहीं ॥ ६६ ॥
त्यानें महाश्रमानें सुरुंग केले तयार पांच तदा ॥
ते एकदम उडाले झाली त्यांचीच गर्जना भयदा ॥ ६७ ॥
जों जों तट कोसळतो तों तों तो धडधडाट रव घडतो ॥
दुःखा येति उमाळे कीं जाणो तट पुनः पुन्हा रडतो ॥ ६८ ॥
हर्षे नाचे पाहुन मानाजी वाट जावयाजोगी ॥
द्वादश वर्षे तपुनी स्वर्ग-पथा जेंवि पाहतां जोगी ॥ ६९ ॥
तों द्वारीं बलशाली दोहन येऊनियां उभा राहे ॥
रण-कुंडांत अमोल्य प्राणांची आहुती करूं पाहे ॥ ७० ॥

* मराठ्यांच्या फौजेंतील एक सरदार.

झुंझार झुंज तेजः-पुंज महा वीर ते मिळुन करिती ॥
ब्रम्हांड-भांड भांडुन पंचानन-गर्जना-भरें भरिती ॥ ७१ ॥
पडला हटास हटवी दोहन मानाजिला करुन वार ॥
खवळे अत्यंत तदा तो निज-रिपु-वंश-कानन-कुठार ॥ ७२ ॥
गंगथडींतिल त्यांच्या होते टोळींत लोक सतराशें ॥
त्यांतें घेऊन संगें धांवे प्रत्यक्ष काळसा भासे ॥ ७३ ॥
तेव्हां दोहन टिकला नाहीं मानाजिच्या पुढें फार ॥
मूर्च्छा येउन पडला भूमिवरी दोन लागुनी वार ॥ ७४ ॥
तों अरुणोदय झाला लढतां लढतां उजाडलें पुरतें ॥
कल्पांतींच्या जलधी-सम राहे गजबजूनियां पुर तें ॥ ७५ ॥
वार्ता मानाजीच्या दूत-मुखें कळुन येत विजयाची ॥
होळकराला तेव्हां हिंमत लागे दिसूं मग तयाची ॥ ७६ ॥
'हरहरहर' गर्जुनियां नेत स्वजनास होळकर पुढती ॥
होऊन पुढें नागर यशवंत-प्रमुख एकसर लढती ॥ ७७ ॥
सैन्यें मराठि सगळीं यशवंताच्या स्थळाकडे वळती ॥
कल्पांत-समुद्राच्या लाटांसम नीट येति आदळती ! ॥ ७८ ॥
कोठें नागर तेव्हां कोठें यशवंतराय हें न कळे ॥
गर्जत हांसत धांवत वीर मराठे पुरामधें घुसले ॥ ७९ ॥
त्या बाजुस मानाजी इकडुन मल्हार दावितो जोर ॥
म्हणती टिकेल कैसा यशवंत अजाण कालचें पोर ! ॥ ८० ॥
नगराच्या मार्गांतुन सैन्य मराठी बळें फिरूं लागे ॥
नागर सागरसिंग-प्रमुख बळी भिउन राहिले मागें ॥ ८१ ॥

तों यशवंत समस्तां बोलावुन जवळ काय बोलतसे ॥
साक्षाद्वाचस्पति ही इच्छिल ऐकावयास बोल तसे ॥ ८२ ॥
"वेशीबाहेर अरी घालविल्यावांचुनी बसे स्वस्थ ॥
पुरुषार्थास तयाच्या धिक्कार असो! उठा जन समस्त " ॥ ८३ ॥
शेवटचा मग हल्ला केला रजपूत पौर लोकांनीं ॥
तो नाद गर्जनेचा बहुधा ब्रम्ह्याचिया पडे कानीं ॥ ८४ ॥
गच्चया खिडक्या पांखीं भिंतीवरही निराश भट चढती ॥
वेडे रागें होउनि नागर झुंजार झुंज ते लढती ॥ ८५ ॥
जे एकदा मराठे शिरले शिरलेच नीट नगरांत ॥
तैलंग विप्र येउन जाइल तो काय परतुन घरांत ॥ ८६ ॥
रस्त्यांत राशि पडल्या प्रेतांच्या परि न शत्रु घालविले ॥
जाऊन चंबळेच्या उदकीं रक्त-प्रवाह कालवले ! ॥ ८७ ॥
गोळे धडाड पडती एकसरें तोफ देत दर वाजे ॥
बहुधा यमें उघडिले नगरीचे आज सर्व दरवाजे ! ॥ ८८ ॥
या प्रतिबंधा पाहुन चढला मल्हार फार तो कोपा ॥
रस्तोरस्तीं आणुन नाक्यावरि नीट रोंखिल्या तोफा ॥ ८९ ॥
ज्ञान-धनाढ्य महात्मा अरिच्या सैन्यापुढें उभा राहे ॥
झाला निराश तेव्हां यशवंत प्राण द्यावया पाहे ॥ ९० ॥
तन्मित्र मान सागर विनविति येऊन हात जोडून ॥
" ऐकुन घे यशवंता ! द्यावा हा मृत्यु-हेतु सोडून ॥ ९१ ॥
असती जिवंत तूं जरि कधिं तरि आम्ही स्वतंत्रता मिळवूं ॥
कळवून स्वपराक्रम होहि मराठे पुरांतुनी पळवूं ॥ ९२ ॥

जलधींत मकर तैसे गुप्तपणें या पुरामधें राहूं ॥
जें जें घडेल तें तें काहीं दिन शांत बैसुनी पाहूं ॥ ९३ ॥
जोधपुराला जाऊन तेथिल रजपूत तूं हि उठवावे ॥
त्यांसह वेगें येउन मारावे सर्व शत्रु लुटवावे ॥ ९४ ॥
येथें पुन्हा तयारी करितों लढण्यास दक्षणीसंगें ॥
तो वीर खरा लोकीं गळतें ज्याचें न धैर्य कीं भंगें ॥ ९५ ॥
आम्ही तुम्हीहि मिळुनी कोटा-नगरा स्वतंत्रता देऊं ॥
ईशापाशीं प्रार्थन करितों तो सुदिन लौकरी येऊ'' ॥ ९६ ॥
ऐसे बोलुन उचलुन घोड्यावर बसविती तया शूर ॥
वेशींतून सुरक्षित गुप्तपणें देति घालवुन दूर ॥ ९७ ॥
मध्यान्हाचा आला वेळ अशा समयिं सर्वही नगर ॥
झालें स्वाधीन मिठी देति मराठे जसे बळी मगर ॥ ९८ ॥

श्लोक.

जेथें तेथें 'हरहर' असा गाजला शब्द भारी।
तेव्हां भाले बहु चमकले शत्रुला शोककारी ॥
नाचे झेंडा समरिं भगवा पौर मेले न थोडे।
गाढे झालें यश महितळीं लोक गाती पवाडे ॥ ९९ ॥

# सर्ग पंधरावा.

यशवंतराय जोधपूरच्या मार्गानें प्रवास करितो—कोटा-शहराविषयीं त्याचे विचार—लहानपणाच्या गोडपणाविषयीं त्याच्या मनांत आलेल्या कल्पना—आईची आठवण—सायंकाळीं दिसणाऱ्या अकृत्रिम सृष्टीचें वर्णन.

श्लोक.

दीडशें हि वरुषें महीं-तळीं । नाचुनी तुडवि जें अरीं बळीं ॥
रामदास करि ज्यास अर्पण । तें निशाण झळके पुरांतुन ॥ १ ॥
जाहला जंव मराठि अंमल । भीति पावति अनाथ दुर्बळ ॥
मानवंत बलशालि नागर । क्षोभ त्यांस चढला अनावर ॥ २ ॥
स्वार पायदळ फार शीणले । तीन मास बहु दुःख पावले ॥
सूड घेउं म्हणतात दक्षणी । दग्ध हें पुर करूं पुरें क्षणीं ॥ ३ ॥
शूर होळकर बेत ऐकतो । नागरांवर दयेस पावतो ॥
शांत कोप पहिलाहि होतसे । सैनिकां मग हुकूम देतसे ॥ ४ ॥
" हो लुटालुट न या नगरांत । सर्व लोक हि सुखांत असोत ॥
वैर जे करिति बादशहासीं । आणणें धरून मात्र तयांसीं ॥ ५ ॥
नाश फार घडला असे रणें । त्यास दुष्ट जन तेच कारणें ॥
यास्तव प्रथम त्यांजला धरा । शोध फार मम मित्र हो करा ॥ ६ ॥
दिल्लि-नायक-पदांस रक्षिता । मी असून रिपु-कीर्ति भाक्षिता ॥
त्याविरुद्ध उठल्या जनाप्रत । दंडणें मजासि योग्य भासत ॥ ७ ॥
अग्रणी हि यशवंतराय तो । दिल्लिला धरून आज धाडितों ॥
हस्तिच्या चरणिं मृत्यु येइल । तेंच शासन सुयोग्य होइल ॥ ८ ॥

जो धरील यशवंतराय हा । पारितोषिक वरील तो महा ॥
शोधुनी सकल भूमि-मंडल । जा धरा त्वरित आणिजे खल " ॥९॥
राव होळकर बोलतो असें । तों मनांत यशवंत येतसे ॥
मूर्ति राहिलि उभीच ती पुढें । प्रीति-लोट सुटला तियेकडे ॥ १० ॥
मग्न होय मग वीर चिंतनीं । काय चालति विचार त्या क्षणीं ॥
कां म्हणून मन राहिना स्थिर? । होय कोण यशवंत हा नर ?॥११॥
या विचित्र पुरुषास एकदा । पाहिलें न विसरेन त्या कदा ॥
कां प्रसन्न मन पाहुनीच या । होय ? काय गुण साधला तया ॥१२॥
त्या अपाय घडला जरि कांहीं । वाटतें न मम जीवित राही ॥
शांत-वृत्ति मग सैनिक बाहे । त्यांस होळकर बोलत आहे ॥ १३ ॥
" सांपडेल यशवंत तो जरी । सौम्य त्याजवळ वर्तणें तरी ॥
दूर जाइल म्हणून सावध । राहणें परि करूं नका वध " ॥ १४ ॥
मानसिंग अणि वीर सागर । जाति घालवित शौर्य-सागर ॥
घे निरोप यशवंत शेवट । त्यांस दे परत धाडुनी झट ॥ १५ ॥
तो हयावर बसून एकटा । कांठि वाट यशवंत तत्वतां ॥
वेष शुभ्र बहु-मौल्य संयुत । याशिवाय नव्हता अलंकृत ॥ १६ ॥
आंतुनी चिलखतास तो धरी । मंदिलें वरिलि सुप्रभा शिरीं ॥
घे कटयार तरवार बांधुन । ढाल पाठिवर शस्त्र-वारण ॥ १७ ॥
भल्ल बाजुवर ठेवि निस्तुल । ठेवि संनिध तयार पिस्तुल ॥
हा मुशाफर असा सजोनि घे । जोधपूर शहराकडे निघे ॥ १८ ॥
तो पुरा फिरून पाहि मागुती । अश्रु फार नयनांत चालती ॥
सौख्य बाळपणचें हि आठवे । दुःख तों न हृदयांत सांठवे! ॥१९॥

सावली किसनदास-सत्कृपा । भोगिलें सुख अलभ्य जें नृपा ॥
हौस फार गमली प्रतिक्षणीं । तें लहानपण आठवे मनीं ॥ २० ॥
शेवटीं फिरुन दृष्टि पाठवी । तो हयास यशवंत थांबवी ॥
तें प्रसिद्ध पुर एकदा बघे । सौख्य मानुन तयांत पूर्ण घे ॥ २१ ॥
पाहतां स्थितिस त्या पुराचिया । कोणत्या न उपजे नरा दया ? ॥
नासधूस धुळधाण तेथिल । अश्रु पाहुन न कोण टाकिल ?॥२२॥
जेथ नांदलि समस्त संपदा । ठाउकी नच कुणास आपदा ॥
तें उदास बहु दीनसें दिसे । भीति दे मसण भासलें जसें ॥ २३ ॥
सुंदरें धनिक-लोक-मंदिरें । जाहलीं जळुन खाक हें खरें ॥
अग्नि लागति कितीस नूतन । लोळ चालति नभांत पेटुन ॥ २४ ॥
कांहिं उंच मजले सुखावह । तोफ-मार न सहून दुस्सह ॥
कोसळून पडतात भूमिला । शत्रुच्या नमिति काय पावलां !॥२५॥
तोफ होतिच सुरू पुरामधें । शब्द थोर करुनी भयास दे ॥
नाद तो त्वरित दूर डोंगरीं । जाउनी प्रतिरवा पुन्हा करी ॥ २६ ॥
कोट शेकडों स्थळिं पडून मोडला । आरपार किति जागिं भंगला ॥
राखण्यास पुर होय साधन । पावला तट म्हणून शासन ! ॥ २७ ॥
आपटून दिनरात्र गोलक । जाहल्या तटिं खुणा भयानक ॥
तो जनास निज दुःख दावितो । डागला महिष काय भासतो ॥२८॥
भोंवती उपवनें मनोहर । प्रीति ज्यांवर करीति नागर ॥
ध्वस्त होउन उदास दीसती । कोण पाहिल सुखांत ती स्थिती? २९
प्रेम सद्गद गळा भरून ये । एक पाउल गमे हलूं नये ॥
हात जोडुन अनन्य-मानसें । काय भाषण सुधी करीतसे ॥ ३० ॥

"हे पुरा! प्रियकरा! जिवाहुन । वाटतें तुजसि दुःख पाहुन ॥
कांपवीत भुवनास नांदले । या स्थळीं नृपति शूर ते भले ॥ ३१ ॥
तेथली स्थिति अशी घडे अहा! । दैव होय उलटें कसें पहा! ॥
शत्रुनें तुजसि फार घेरिलें । दुःख-बीज हृदयांत पेरिलें ॥ ३२ ॥
बादशाह करि बा! तुझा छळ । रक्षणें तव सुतांसि दुर्बळ ॥
हें अवश्य मज कृत्य वाटलें । हांकिले मुसलमान येथले ॥ ३३ ॥
भांडलों मग मराठियांसवें । ख्यात जे भुवनिं वीर्य-गौरवें ॥
मीं धरून तरवारिला करीं । पाहिलें लढुन थांबवूं अरी ॥ ३४ ॥
शत्रुला नगरिं येऊं मीं दिलें । तत्करांत तव पुत्र सोडिले ॥
थोर जाण अपराध हा मम । कोण तुल्य मजसीं नराधम ? ॥ ३५ ॥
नाश जे करिति येउनी पुरा । वैरि जे तुजसि भेटती पुरा ॥
वाहवीति जन-रक्त-वाहिनी । मीच त्यांत पहिला म्हणें मनीं ॥ ३६ ॥
दुष्ट होळकर आंत येउन । वाटतें तुजसि टाकि जाळुन ॥
काय होय न दशा तुझी कळे! । सोडुनी तुजसि दूर मी पळें ॥ ३७ ॥
आपदभ्र तव टाळण्याप्रत । मी जरी न शकलों तुझा सुत ॥
तूं सुखांत परि नित्य राहणें । ईश्वराजवळ हेंच मागणें ॥ ३८ ॥
चाललों दुर तुला त्यजूनियां । दे निरोप कर एवढी दया ॥
शेवटील मज भेट वाटते । दुःख यास्तव मनांत दाटतें ! ॥ ३९ ॥
रम्य राज-सदनें[1] जलाशय । देवळें अमित हर्म्य सुप्रिय ॥
आपण[2] प्रथितँ[3] राज-मार्ग जे । वंदितों नगर-देवतें तुझे " ॥ ४० ॥
यापरी वदुन आपुला पथ । तो धरीत यशवंत सांप्रत ॥

---

१ श्रीमान् लोकांचे वाडे. २ बाजार. ३ प्रसिद्ध.

चालतां मनिं विचार चालले । चित्त फारचि उदास जाहलें ॥ ४१ ॥
हेतु एक धरितां मनामधीं । दावितो उलट वर्तना विधी ॥
चांगले अणिक बेत वाइट । मोडितो विधि धरूनियां हट ॥ ४२ ॥
जों तरूणपण अंगिं संचरे । हौस तों नवनवी मनीं भरे ॥
अल्पशा अनुभवें जगाचिया । शेवटीं उलट भासतें तया ॥ ४३ ॥
आसनीं शयनिं भोजनीं मनीं । ज्यांचिया दिवस जाति चिंतनीं ॥
स्वमसे विफळ सर्व हेतु ते । होति दुःख मग फार वाटतें ॥ ४४ ॥
जी तरूणपणची मती नवी । ती अपक्व म्हणतात हे कवी ॥
सोसण्यास तिज घाव पाहिजे । त्याविणें न उपयुक्त जाणिजे ॥ ४५ ॥
आज तीन महिने लढाइचें । जें चढे स्फुरण फार वेळचें ॥
लागलेंच उतरूं हळूहळू । त्या विचार मग शांत ये कळूं ॥ ४६ ॥
काय मी लढुन मेळवीयलें ? । लोक मात्र अति दुःख पावले ॥
नाहिं लाभलिच कीं स्वतंत्रता । मात्र दिल्लि-पति कोपला अतां ४७
या अशाच दुसऱ्याहि कल्पना । दुःख-दायक विशेष ज्या म्हणा ॥
येउनी हृदय खिन्नता धरी । त्यास शांतवि सुवीर यापरी ॥ ४८ ॥
"वीर-पुत्र म्हणवून सत्कुल । कोण मूर्ख परतंत्र राहिल ? ॥
कार्य साधुन न धन्य जाहलों । दोष हा न मम हें जगा कळो! ४९
काय रात्रदिन जागलों नसें ? । काय पौर-हित पाहिलें नसे ? ॥
कीं जिवावर उदार होउनी । नाहिं काय लढलों पुरांतुनी ? ॥ ५० ॥
यत्न निष्फळ समस्त जाहले । त्यास कारण न दोष आपुले ॥
निश्चयेंच भवितव्यता अशी । ती चुकेल करण्या गुणें कशी! ॥५१॥
सिद्ध शूर रजपूत भूपती । साह्य देउं उठते जरी किती ॥

कां असा प्रळय सोसितें पुर ? । भांडतों मिळुन दोनही जर ॥५२॥
कां न होळकर पावला दया ? । कां उदारमति नाठवे तया ? ॥
कां स्वधर्म-परिपालनास्तव । तो न लावित सुवीर्य-गौरव? ॥ ५३ ॥
हें कळे मज खुशाल पोंचला । जो पुण्याप्रत वकील धाडिला ॥
कां न आलि मग पेशव्या दया ? । तो न कां सरळ आचरे नया?॥५४॥
हें परंतु घडतें कसें जरी । ईश-हेतु असला असे तरी ॥
दुःख-सागरिं बुडोच सर्वदा । जन्म-भू मम सुखी नसो कदा ॥५५॥
आसरा न मजला कुठे वसे । काय दीन हत-भाग्य मी असें ॥
बोध येउन करील चांगला । कोण योग्य पथ दावितो मला ? ॥५६॥
अंधकार पसरे जगावरी । त्यांत चाचपत वाट मी करीं ॥
ठेंच लागुन पडें घडोघडी । इच्छितों मदत दीन केवढी ! ॥ ५७ ॥
धांवतात लहरी चहूंकडे । भूमि दृष्टिस न ती कुठे पडे ॥
मी बुडेन भय वाटतें तरी । पोहतों धरुन धीर अंतरीं ॥ ५८ ॥
तात-पाद जरि भेटते मला । धन्य धन्य असतों सुखी भला ॥
या कपाळिं लिहिलीं न अक्षरें । तीं असें मजसिं वाटतें खरें "॥५९॥
आइलाहि यशवंत आठवी । चित्त तच्चरणिं नम्र पाठवी ॥
जो मनांत भरली न ती स्मृती । लेंकरासम रडे महामती ॥ ६० ॥
" शेवटील हि न भेट जाहली । खंत यास्तव मनास लागली ॥
नाहिं लोळण तिच्या पदांपुढें । घेतली म्हणुन जीव आंखडे ॥६१॥
शील-पुण्य-सरिता* गुणी महा । ईश्वरेंच जननी दिली अहा ! ॥
काय म्यां सुख दिलें तिच्या सुतें । आठवून मन फार कांपतें ॥६२॥

* सुस्वभाव व पुण्य यांची नदी.

भोगिलें अमित संकटांप्रत । दुःख केंवि विसरेल सांप्रत ! ॥
बैसुनी जवळ गोड भाषण । कोण तीजसि करील सांत्वन ?" ॥६३॥
चालतां मनिं विचार या परी । जोधपूर-पथ वीर तो धरी ॥
टेंकड्या चढ उतार भूमिला । अश्व लंघित पळे जवें भला ॥६४॥
सूचना न करितां गुणी हय[1] । चालला पळत नीट निर्भय ॥
किर्र झाडितुन कंदरांतुन[2] । धांवला तरुन तो नद्यांतुन ॥ ६५ ॥
नावमात्रच लगाम घेउन । शांत चित्त यशवंत बैसुन ॥
भोंवती अरवली-गिरी-दरी । कर्मणूक बघतां वनें करी ॥ ६६ ॥
तों उदास दिसुं लागलें वन । अंधकार पसरे हळू घन ॥
सूर्य अस्त-गिरि-मार्ग साधतो । पक्षि-संघ[3] घरट्यांस धांवतो ॥६७॥
गार फार सुटला समीरण[4] । शब्द होय तरु-पल्लवांतुन ॥
गौर गोंडस कळे विकासते । लाजवीति युवती-कपोल[5] ते ॥ ६८ ॥
ताड साग बकुळी शमी वट । उंच पिंपळ तमाल उद्भट ॥
आम्र चंपकहि शाल्मलि-द्रुम[6] । भोंवते मिळुन रक्षिती तम ॥ ६८ ॥
इंद्रनील-सम-नीर[7] सुंदर । धांवतात खडकांत निर्झर[8] ॥
आपटून दगडांत पाझरे । वारि[9], हे पसरले जणो हिरे ! ॥ ७० ॥
ग्राम्य-वन्य-फल-पुष्प-शोभित । वृक्ष भूमिस लवून पावत ॥
पाहुणाच यशवंत ये घरा । देति त्यास मुजराच हा खरा ! ॥ ७१ ॥
श्वापदें फिरति भीति-दायक । सिंह व्याघ्र वृक[10] त्यांत नायक ॥
वास घेत निज भक्ष्य शोधिती । त्यांस दुर्बळ बघून कांपती ॥७२॥

१ घोडा. २ दरींतून. ३ पक्ष्यांचा समुदाय. ४ वायु. ५ तरुणीचे गाल. ६ सांबरीचें झाड. ७ इंद्रनीळ रत्नाप्रमाणें आहे पाणी ज्यांचें. ८ झरे. ९ पाणि. १० लांडगे.

या परि पाहत पाहत चालतसे सुमती ।
कानन–भूमि सुखावह फार तया गमती ॥
मावळला भगवान्दिननायक तो मिहिर¹ ।
पूर्ण तमें भरुनी जग भासतसे बिहिर ॥ ७३ ॥
देउन कान दुरून जल–ध्वनि आयकतो ।
जाउन निर्मल पाहि झरा सुख–दायक तो ॥
खालति एक शिला–तल पाहुनियां उतरे ।
बांधित आणुन अश्व समीप तरूस करें ॥ ७४ ॥

---

१ सूर्य.

# सर्ग सोळावा.

चंद्रोदय—चंद्रप्रकाश—वनवर्णन—यशवंतराय रात्रभर जागत जातो—पहाटेस मार्ग चालूं लागतो—त्याची व भिल्लांची गांठ—लढाई—भिल्ल यशवंतरायास कैद करितात.

**श्लोक.**

ऐशा प्रसंगिं यशवंत वनीं भयाण ।
विश्रांतितें क्षण शिलेवरि घे बसून ॥
घोड्यावरी बसुन वीसहि कोस आला ।
या कारणें श्रम तया सुभटास झाला ॥ १ ॥
गेला झऱ्याजवळ सुंदर गार पाणी ।
पीतां मनांत अमृताचिच गोडि आणी ॥
संध्येस वंदुन फराळ करून कांहीं ।
तो आसनावर बसून सभोंति पाही ॥ २ ॥
जाईल रात्र कशि हाच विचार पोटीं ।
आहे पुढें पडलि ती तरवार मोठी ॥
व्याघ्रादि हिंस्त्र पशुंची मनिं भीति वाहे ।
जाग्यावरी बसुन सावध जागताहे ॥ ३ ॥
या वेळिं कुंकुमच चर्चुनि भाळ-देशीं ।
राहे पतीस निरखूं युवतीच जैशी ॥
तैशी दिशा सजलि उत्सुक काय पूर्व ।
ती तांबडी धरुन कांति दिसे अपूर्व ॥ ४ ॥

निर्वीर भूमि-तल पाहुन अंधकार ।
चाले मदांध गज-हर्ष-भरें पुढार ॥
पूर्वेस त्यास मृगराज मृगांक भेटे ।
हें अंधकार-गज-रक्तच लाल वाटे ॥ ५ ॥
लक्षावधी उगवती गगनांत तारे ।
हे भालदार शशि-भूपतिचेच सारे ॥
बुक्का गुलाल उधळीतच मानपानें ।
ते आणितात निजनाथ महोत्सवानें ॥ ६ ॥
अन्य स्थळीं दिवस घालवुनी विलासें ।
येतो पुन्हा परत लाजत चंद्र भासे ॥
डोकावुनी हळुच रात्रि-वधूस पाहे ।
मर्जी असेल कशि काळजि हीच वाहे ! ॥ ७ ॥
सारून दूर पडदे जलद–स्वरूप ।
आला प्रगल्भ नटराज पुढें अमूप ॥
जों लावितात टक एकच लोक मात्र ।
तों रंग मंडपिं नभीं शशि रम्य-गात्र ॥ ८ ॥
चंद्र-प्रभा गिरि-शिरावर फांकतात ।
ज्यांच्या लपे तम भयार्त गुहोदरांत ॥
राजाच तो मन उदार करून ठेवी ।
डोक्यावरी कर–जणो अभयास दावी ॥ ९ ॥
नानालतौषधिंस जीवन घालणारे ।

१ धनी, पक्षीं चंद्र.

एकाच काळिं जन-नेत्र सुखावणारे ॥
पृथ्वी सुधा-धवल सर्व करून धाले ।
हे शीत शीत-किरणें कर धाडियेले ॥ १० ॥
आकाश-भूमि-गिरि-कंदरिं पूर्ण साचे ।
ओघावरी पडति ओघच चंद्रिकांचे ॥
क्षीराब्धिच्या उठति या लहरीच काय ! ।
कीं सर्व चंदन-रसांत बुडून जाय ॥ ११ ॥
या चांदण्यांत अमृतांत जणो बुडाल्या ।
हर्षांत डोलति हि नाचति मत्त झाल्या ॥
वेली कशा स्वतनुंनीं तरु वेढितात ।
प्रेमें प्रिया धरून तन्मय काय होत ॥ १२ ॥
नाना लता मिळुन एकच गुंत होतां ।
सर्वांस एक समयास फुलेंहि येतां ॥
त्या काननीं घमघमाट सुदूर चाले ।
हर्षांत गोंधळुन चंचल चित्त डोले ॥ १३ ॥
पानें जया असति गारच काळि भोर ।
वृक्षावरी चढति वेलि अशा अपार ॥
त्या वीस पंचविस हात तिथून खालीं ।
झोंकावती म्हणुन सांवलि गर्द झाली ॥ १४ ॥
या वेलि हालति इथे जंव ये झुळूक ।
खालीं फुलें पडति भूमिवरी अनेक ॥

१ चुन्याप्रमाणें शुभ्र.

रे मारुता! शिवुं नको म्हणतात वेली।
हीं आंसवेंच कुसुमें पडतात खालीं॥ १५ ॥
हे ताल साग सरळे गगनांत जाती।
ईर्षाभरें वरचढीच करूं पहाती॥
जों जों वरी चढति बारिक वृक्ष होती।
उच्चत्व इच्छिति तयांत अशीच रीति॥ १६ ॥
छायेंत कांहिं भरतात बिघे जमीन।
हे लक्षं-पक्षि-भरणांत सुदक्ष जाण॥
राजे वनांतिल अशा समयास शांत।
स्तब्धाकृती सुवट-वृक्ष वना पहात॥ १७ ॥
पानें करी शिथिल हालवि कांहिं वात।
चाले सदा सळसळा ध्वनि पिंपळांत॥
हा दुष्ट वायु उमळूं बघतो स्ववंश।
हें ओरडोनि कळकी कळवीति खास॥ १८ ॥
या चांदण्यांत यशवंत पहात राहे।
शोभाभरें खुलत सर्व अरण्य आहे॥
तों गर्जना जवळ आयकण्यांत येती
कोठें तरी जवळ वाघ फिरे वनांतीं॥ १९ ॥
घोडाहि खिकळतसे यशवंत याचा।
सांगे पुढील भय धूर्त नसून वाचा॥
तों एक धांदल उडाली पशूंत सर्व।

१ लाखों पक्ष्यांचें पोषण करण्यांत.

व्याघ्राचिया पुढति दाविल कोण गर्व ? ॥ २० ॥
उड्डाण घेति हरणें मग ताड ताड ।
धांवून भीत वृक होति तरूंस आड ॥
आवेश रानडुकरांस परंतु आला ।
ते गर्जती उडविती वरती धुळीला ॥ २१ ॥
रोरावले वन-करी धडकांस देती ।
कोल्हे कुई करुनि दूर पळून जाती ॥
भ्याला पळे तरस लंगडशाहि घाली ।
गर्दी अशी उठुन एकच रानि झाली ॥ २२ ॥
हा रात्रिचा समय, रान अफाट दाट ।
स्वच्छंद हिंस्रपशु या स्थळिं हिंडतात ॥
घेऊन खड्ग करण्यास तयार घाव ।
तो सावधान बसला यशवंतराव ॥ २३ ॥
चाले पुढें घडिघडी जंव रात्र वेगें ।
त्या जागचें बदलुं रूप विचित्र लागे ॥
जों जों उदास दिसलें वन तन्मनांत ।
जोरें घुसूनच विचार उदास येत ॥ २४ ॥
जी वस्तु भोंवति भयें निरखून घ्यावी ।
शंका क्षणामधिं तिच्या विषयीं भरावी ॥
त्या चांदण्यांत बघतां तितुके पदार्थ ।
भीती मनांत निरुपद्रव ही करीत ॥ २५ ॥
जाळींत चंद्र-किरणीं करुनी प्रवेश ।

जे पाडिले कवडसे महिच्या तळास ॥
ते वाटले नयन कीं उघडून वाघ ।
रोखीत मारिल उडीच धरून राग ॥ २६ ॥
कोठें झुडूप बहु दाट फुटून पान ।
जें चांदण्यांत दिसतें अति कृष्णवर्ण ॥
विक्राळ तोंड पसरून सटा उभारी ।
उड्डाण मारिल गमे मृगराज भारी ॥ २७ ॥
तेथें तयास दिसला अति शुभ्र-वेष ।
कोणी पुढें सरळ धीट उभा पुरुष ॥
तो कोण कोठिल म्हणून करून पृच्छा ।
जाणावयास यशवंत धरीत इच्छा ॥ २८ ॥
कांहीं न उत्तर करी स्थिर तो पुरुष ।
तें पाहतां धरि मनीं यशवंत रोष ॥
हातें धरून मग पिस्तुल नीट झाडी ।
आवाज एकच उठे विपिनीं धडाडी ॥ २९ ॥
'चीं चीं' करीत घरट्यांतुन पक्षि आले ।
बाहेर, तो परि पुरुष न लेश हाले ॥
झाला पुढेंच यशवंत जपून पाही ।
तों वृक्ष-मूल दिसलें दुसरें न कांहीं ॥ ३० ॥
हांसे म्हणे "किति तरी चुकलों भ्रमानें ।
नेलें पहा किितक दूर कसें क्रमानें" ॥
तो रात्र घालवि अशीच असून जागा ।

सोडी न निग्रह कदापि धरून जागा ॥ ३१ ॥
जेव्हां समीप अरूणोदय रम्य आला ।
चंद्र-प्रकाश सुख-दायक मंद झाला ॥
वारा झुळूझुळु सुटे करि गार गात्रें ।
हाले पुन्हा विपिन सर्वहि जीव-मात्रें ॥ ३२ ॥
झाली पहाट पुरती इथुनी निघावें ।
लंघून घांट मग जोधपुरास जावें ॥
ऐसा विचार जंव तो यशवंत आणी ।
तों ऐकतो हृदयभेदक दीन वाणी ॥ ३३ ॥
" कोटयाहुनी भिउन शत्रुस मी निघालों ।
देशांतरा त्वरित वांचवुं जीव आलों ॥
दुर्दैव सोडि न अजूनहि पाठ माझी ।
या जीव कोणि तरि येउन वांचवा जी ! ॥ ३४ ॥
या दांडग्यांप्रत निवारुन लांडग्यांस ।
वाटे न नेइन सुरक्षित मी जिवास ॥
हाडें मरून मम याच वनीं पडावीं ।
कोणास दैव–गति ही तरि होय ठावी ? " ॥ ३५ ॥
हे शब्द ऐकुन उभा यशवंत ठेला[१] ।
घेता करालें[२] करवाल[३] करांत झाला ॥
गर्जे " अरे भिउं नको ! धर धैर्य पोटीं ।
राखीन आज तुज दावुन शक्ति मोठी ॥ ३६ ॥

१ राहिला. २ भयंकर. ३ तरवार.

चाले पुढें चपल धीट विजेप्रमाणें ।
जेथें असा परिसला रव दीन कानें ॥
तों चालली सरळ ती दरडींत वाट ।
डोंगे जिथें उठति दाट नभीं अचाट ॥ ३७ ॥
चंद्र-प्रकाश नव्हता जरि त्या स्थळांत ।
होता उजेड दिसण्यापुरता पदार्थ ॥
संतापले बघति फाडुं नरास एक ।
ते लांडगे दिसति जे जमले अनेक ॥ ३८ ॥
एका क्षणांत थडकें निधि साहसाचा ।
चालून सावध पुढें बलशालि साचा ॥
पाहे सशस्त्र वरती उचलून हात ।
आरोळि ठोकित सवेग शिरून आंत ॥ ३९ ॥
तों गोष्ट दृष्टिस पडे भलतीच कांहीं ।
सुस्तब्ध जीस बघतां यशवंत राही ॥
ते लांडगे-पुरुष तो-सगळे मिळून ।
या भोंवते जमति शस्त्र करीं धरून ॥ ४० ॥
आली कळून मग गोष्ट खरी तयाला ।
गेलों फसून पुरता परि घात झाला ॥
घोडाहि दूर मजपासुन या प्रसंगें ।
हे शत्रु फार नच कोणि सहाय संगें ॥ ४१ ॥
नाहीं जिवंत तरि सांपडणार हातीं ।

१ वृक्षसमूह.

कीं हातपाय जंव हे फिरते रहाती ॥
माझ्या शरीरिं जंव एक हि नाडि वाहे ।
संरक्षणीं झटुन यत्न करून पाहें ॥ ४२ ॥
तों भिल्ल सर्व इकडे वृक-रूप-धारी ।
होते तयार झगडा करणार भारी ॥
संग्राम-धीर चतुरा यशवंतराया ।
वेढून जों बदति कैद बळें कराया ॥ ४३ ॥
तों कोपऱ्यांत दगडावर एक वृद्ध ।
होता पुरुष बसला यमराज शुद्ध ॥
भिल्लां उगीच बसण्यास हुकूम देत ।
ते चित्र-तुल्य अचल-स्थिति राहतात ॥ ४४ ॥
बोले वळून मग तो यशवंतरावा ।
" आहेस कोण कुठला मजलागिं ठावा ॥
झाला बळी बळि असून तुझ्या बळाचा ।
त्याचा पिता समज मी मनिं बादलाचा ॥ ४५ ॥
अन्याय नीति नच भिल्ल कधीं पहाती ।
तूं आज येसि पुरता अमुच्याच हातीं ॥
जो आसरा मजसि वृद्ध पित्यास बाळ ।
त्याला वधून मज पाहविलेस हाल ॥ ४६ ॥
यासाठिं वास्तविक जीव तुझा हरावा ।
घेऊन सूड निज हेतु पुरा करावा ॥
आम्ही परंतु करितों असला विचार ।

मारूनियां तुज न लाभ अम्हांस फार ॥ ४७ ॥
कोणी धरील यशवंत जिवंत हातें ।
देईल होळकर थोर इनाम त्यातें ॥
तें पारितोषिक अलभ्य तुला धरून ।
घेईन हेतु असला बसलों करून ॥ ४८ ॥
रागें हरीन तव जीव परंतु काय ।
आहे जिवंत करूं बादल हा उपाय ॥
रक्तें तुझ्या नच निवेल मर्माधिवन्ही[1] ।
होईल जें मुहित घेइन तें करोनी ॥ ४९ ॥
कोटयांतुनी सुटसि जोधपुरास याया ।
येणार या वन-पथें यशवंतराया ॥
ही बातमी मजसि लागलि हेर गुप्त ।
मी ठेविले सतत वाट तुझी पहात ॥ ५० ॥
ब्रम्हाहि रक्षण करूं न शकेल तूतें ।
तूं सोडिशील न जिवंत कधीं वनातें ॥
जें दैव देइल तयास शिरीं धरावें ।
स्वाधीन शस्त्र हि शरीर तुवां करावें " ॥ ५१ ॥
भिल्लांस काय कमला–सुत बोलताहे ।
" हातांत आज तुमच्या पडलोंच आहें ॥
पाहीन यत्न करुनी पुरत्या हटानें ।
भिल्लांस लोळविन पांच दहा करानें ॥ ५२ ॥

१ माझा दुःखाग्नि.

आहे हत्यार कळतो उपयोग त्याचा ।
मी आसरा धरिन निर्भय कां भयाचा ? ॥
मातें जिवंत धरण्यास न काम सोपें ।
दावीन आज रण–कर्म तुम्हांस कोपें ॥ ५३ ॥
वाटे खुशाल मज कैद कराल हातें ।
ही प्राण–घातक मती सुचली तुह्मांतें ॥
या दुष्ट हो ! करिन खंडविखंड गात्रें ।
येईल जो पुढति हाणिन त्यास शस्त्रें " ॥ ५४ ॥
तों धांवले प्रबळ भिल्ल तया धराया ।
हाणीति चौंहिकडुनी यशवंतराया ॥
तो मंडलाकृति फिरून विजेसमान ।
दे धाक चंचळ पदें करि मारहाण ॥ ५५ ॥
ज्याज्याकडे सरळ रोंखित दृष्टि नीट ।
तो कांपतो चळचळा करि मार्ग नीट ॥
तों मागुनी करिति येउन एक वार ।
चर्मावरी धरुन तो परतूं तयार ॥ ५६ ॥
अंगामधें कवच पूर्विंच त्यास होतें ।
त्या आपटून करि शस्त्र महाध्वनी तें ॥
लाह्याच काय ठिणग्या पडतात खालीं ॥
कोलाहलें भरतसे वन एककाळीं ॥ ५७ ॥
एकाकडे फिरवि दृष्टि दुजास वार ।
गेला मरून तिसरा खल भूमि–भार ॥

जाळींतुनीच बघतो जंव शूर जाया ।
हल्ला करून धरिती यशवंतराया ॥ ५८ ॥
तो वीर्यशालि हिसकाहिसकींत धाडी ।
चौघांस दूरवर भूमि–तळास पाडी ॥
लातेंत सांपडुन ही पडती कितीक ।
ही शक्ति पाहुन अरी धरितात धाक ॥ ५९ ॥
जें तेज केवळ मराठि महाप्रचंड ।
कोटयामधें झळकलें करि शत्रु–दंड ॥
ओसाड या अरवली–विपिनीं[1] सकाळीं ।
भिल्लांस गांठुन भयंकर त्यांस जाळी ॥ ६० ॥
एकेक घाव करि जो बल-शौर्य-शाली ।
तों एक एक भट हाणुन पाडि खालीं ॥
भिल्लांतले प्रमुख नायक कांपतात ।
कोणी पुढें न सरकूं धजला तशांत ॥ ६१ ॥
ते एकदांच उठले सगळेहि भिल्ल ।
चालून जाति धरिती यशवंत मल्ल ॥
झिंजाडि देउन तयां ढकलून दूर ॥
बाहेर जाउं बघतां करि मार्ग शूर ॥ ६२ ॥
खालीं पडे अडखळून चुकून पाय ।
वेगें उठूं न शकला यशवंतराय ॥
तों भिल्ल येउन वरी पडती धरीती ।

---

१ अरवली पर्वताच्या अरण्यांत.

बांधून कैद समयास तया करीती ॥ ६३ ॥
विधि लिहित कपाळीं तें चुके कोण काळीं ? ।
धरून मजसि बांधा हो तुम्हांला खुशाली ॥
खरतर निज तेजें जिंकिती जे जगाला ।
पर-वशपण सोडी काय त्या ही नराला ? ॥ ६४ ॥

---

१ तीक्ष्ण.

## सर्ग सतरावा.

भिल्ल यशवंतरायास घेऊन परत कोटा-शहरास जाण्याकरितां निघतात—यशवंतरायाची व बैराग्याची गांठ—यशवंतराय त्या बैराग्यास आपलीं संकटें व दुःखें सांगतो—तो बैरागी त्यास निर्भय राहण्याविषयीं आश्वासन देतो.

### श्लोक.

वज्राप्रमाणें यशवंत-हस्त । त्यांनून दैवें सुटलों जिवंत ॥
हातांत तो सांपडला म्हणून । भिल्लांस आनंद घडे न सान ॥ १ ॥
जाईल कोठें निसटून भीती । भिल्लांचिया फार मनांत होती ॥
ते शृंखळा ठोकुन हातपायां । कोटयास नेती यशवंतराया ॥ २ ॥
तो स्वस्थितीच्या विषयीं विचार । होता जरी खिन्न करीत फार ॥
जाणून हातां प्रतिबंध राहे । भिल्लांसवें हांसत बोलताहे ॥ ३ ॥
" वाटेल जावें जरि कीं सुटून । या शृंखळा जातिल ही तुटून ॥
ढेंकूळ ठेवून नदी वहातां । कां मूर्ख तीतें अडवूं पहातां ! " ॥ ४ ॥
तो हात दोन्ही सहजीच झाडी । तोडी बिडया[1] भूमि-तळास पाडी ॥
हें घाबरे पाहुन भिल्ल झाले । तों धीर आला यशवंत बोले ॥ ५ ॥
" या अंगला काय करीति मातें ? । मी दूर गेलों असतों स्वपंथें ॥
इच्छा असे जी परमेश्वराची । उल्लंघना केंवि करीन तीची ? ॥ ६ ॥
लोकां प्रसंगीं त्यजिलें पळालों । कोटयांतुनी, जोधपुरा निघालों ॥
कोपावला ईश्वर काय रागें । मातें धरायास तुम्हांस सांगे ॥ ७ ॥
जे यत्न केले विविध प्रकारें । ते जाहले निष्फळ पूर्ण सारे ॥

---

१ बिड्या.

तो हा पुन्हा राक्षस[1]-तुल्य येतो । दुःखी निराशेत बुडून जातो ॥ ८ ॥
ते लोक माझे प्रियमित्र शुद्ध । जे दावणीला असतील बद्ध ॥
जाऊन वेगें मिसळेन त्यांत । मी त्या स्थळीं मृत्यु वरीन शांत " ॥९॥
औदार्य हें पाहुन तन्मनाचें । सन्मान देति स्तवितात वाचे ॥
घोड्यावरी घालुन त्यास नेती । कोटयाकडे संतत चाल घेती ॥१०॥
वाटेंत विश्रांतिस घ्यावयाला । भिल्लांचिया मानसिं हेतु आला ॥
देवालया पाहुन रम्य धाले । ते दोन घंटा उतरूं म्हणाले ॥ ११॥
बैरागि तेथें यशवंत पाहे । मुद्रा जयाची बहु भव्य आहे ॥
त्या प्रेक्षकें पाहुन एक वेळ । तद्रूप ध्यावें मनिं सर्व काळ ॥ १२ ॥
माथां जटा पिंगट जूट–बद्ध[2] । रुद्राक्ष कंठ–श्रवणांत नद्ध ॥
शोभा धरी भस्म ललाट[3]-देशीं । आकाश-गंगा गगनांत जैशी ॥१३॥
ज्याच्या वया सत्तर ऐंशि वर्षें । आहेत भासे बघतांच ऐसें ॥
दाढी मिशा शुभ्र मुखासभोंती । स्वच्छंद वाढून विराजताती ॥१४॥
पाऊस वारा अणि ऊन यांला । सहों जयाचा जणु देह केला ॥
वयोपरत्वें न विकार झाला । देहीं धरी तो बल-संचयाला ॥ १५ ॥
नानाप्रकारें तप आचरून । तीर्थाटनें संतत ही करून ॥
लागे दिसूं दिव्य शरीर-कांती । पाहून ती नेत्र दिपून जाती ॥१६॥
अंगावरी घेउन दिव्य शाल । व्याघ्रासनीं बैसतसे खुशाल ॥
चाले मुखीं मंत्र पवित्र कांहीं । रुद्राक्ष-माला फिरवीत राही ॥ १७ ॥
सौम्याकृती निर्मळ कांति वाटे । पोटीं दयेचा नद काय सांठे ॥
तोंडाकडे पाहुन दुःख पानें । भोगीयलें हें परि सुज्ञ जाणे ॥ १८ ॥

---

१ मुद्राराक्षस नाटकांतील नायक राक्षस. २ बांधलेले. ३ कपाळावर.

मूर्तीस पाहूनच पुण्य-शील । पापें मनुष्याप्रत टाकितील ॥
बोलेल यासीं जरि शब्द दोन । तो स्वर्ग-लोकांस करि प्रयाण ॥१९॥
योगींद्र हा पाहुन दिव्य-रूप । भरून ये हर्ष मनीं अमूप ॥
दृष्टी तदंगीं यशवंत लावी । न पापणी या समयीं मिटावी ॥ २० ॥
हालूं नये तेथुन त्यास वाटे । पोटामधें विस्मय फार दाटे ॥
हा लोक-संताप निवारण्याला । योगींद्र जन्मास जगांत आला ॥२१॥
गंगेंत पापें ढकलून द्यावीं । स्नानें जशी शुद्धि नरें वरावी ॥
दुःखें तशीं सांगुन यास पूर्ण । शांतीस इच्छी यशवंत तूर्ण॥ २२॥
बैरागि तोही सहजीच दृष्टी । ठेवी करी तो जणु दुग्ध-वृष्टी ॥
जों रूप पाहे यशवंत याचें । कल्लोळ पोटीं उठती दयेचे ! ॥२३॥
ज्यांची वदे बोध रसाळ वाचा । परोपकारा अवतार ज्यांचा ॥
ते कोणच्याही स्थितिचा मनुष्य । पाहून दुःखा हरिती अवश्य ॥२४॥
जे जे महात्मे असतात लोक । वरीति वेळीं जरि दुःख शोक ॥
ऐकोनि त्यांची नय नीति रीति । समान दुःखी जन अन्य होती २५
तो योगि जेव्हां यशवंतराया । दे हस्त-संकेत समीप याया ॥
सान्निध्य पावे कमलात्मजात । साष्टांगपातें नमना करीत ॥ २६ ॥
शांतस्वरें वत्सल तो विरागी । दिल्लीर-शत्रूस विचारि योगी ॥
"बा कोण कोठील कळीव मातें। कां भोगिसी बंधन कां श्रमातें २७
स्वकीय वृत्तांत कथून कांहीं । होणार उद्वेग मनास नाहीं ॥
ऐसें जरी वाटतसेल चित्ता । तरि त्वदीया परिसेन वृत्ता" ॥ २८ ॥
तों काय बोले यशवंतराय । "मी अर्पितों त्वत्पदिं नम्र काय ॥

---

१ लष्कर. २ बैरागी.

हे साधु-रूपा सदय-स्वभावा । वृत्तांत आतां मम आयकावा ॥ २९ ॥
आहे मराठ्यांत उदार शूर । प्रख्यात ज्याची बल-कीर्ति दूर ॥
मानी असा जो सरल-स्वभाव । माझा पिता तो जगदेवराव ॥३०॥
आनंदनामें उफळे कुळांत । संग्राम-शार्दूल[1] असे सुवृत्त[2] ॥
आहे तयाला कमला सुकन्या । ती जाण माझी जननी सुधन्या ३१
मातामहाची अणखी पित्याची । झाली तुटातूट अवार्य साची ॥
कोटयास याया जननी निघाली । संगें मला घेउन तेथ आली ३२
ऐशी अवस्था परदेश कोटा । विचार तीतें मग होय मोठा ॥
व्हावी इथे काय गती रहातां । स्वदेश आहे बहु दूर आतां ॥ ३३॥
तों सर्व चिंता पळवावयाला । जो संकटीं कारण एक झाला ॥
पाळी अम्हांला गृहिं कृष्णदास । मी वाढलों त्याच घरीं हताश[3] " ३४
तो वृत्त सांगे मग या प्रकारें । संक्षिप्त त्यातें यशवंत सारें ॥
दिल्लीर कोटा शहरास आला । त्यानें कसा काय अनर्थ केला ॥३५॥
पावून रात्रंदिन दुःख शोक । त्रासून त्याच्या जुलमास लोक ॥
कोटयांत कैसे उठले विरुद्ध । दिल्लीर गेला न करून युद्ध ॥३६॥
पौरास दंडूं मग युक्ति काढी । दिल्ली-पती होळकरास धाडी ॥
झालें कसें त्या पुरि युद्ध गाढें । धैर्ये कसा नागर लोक भांडे ॥३७॥
होऊन त्या वेळिं पुढार अंगें । तो शत्रु हाणी परि कोंवि[4] भंगे ॥
साह्यास आणूं रजपूत-मेळा । चिंतून तो जोधपुरा निघाला ॥३८॥
माया कशी भिल्ल-जनीं रचून । त्या ठेविलें घोरवनीं धरून ॥

---

१ युद्धांत वाघाप्रमाणें भयंकर. २ सदाचारसंपन्न. ३ दुर्दैवी. ४ पराभव पावला.

मल्हारराव पुढती तयाला । ते नेति हें सांगुन तो म्हणाला ॥३९॥
" माझा असे हा इतिहास सांगे । कांहीं समाधान-सुशब्द सांग ॥
एका प्रकारें च न दुःख मातें । गोष्टी किती या छळिती मनातें ! ४०
मी लोक-कार्यार्थ झटूं निघालों । आसक्त रात्रंदिन त्यांत झालों ॥
आयास ते व्यर्थ समग्र होती । या कारणें फार मनास खंती ॥ ४१ ॥
मी वीर-वंशीं उपजून काय । केलें मिळाया यश ! हायहाय ! ॥
आलों तसा येथुन नीट चाले । कोणी न काढील हि नांव काळें ४२
घोड्यावरी बैसुन धीट भाला । साह्यास घेते तरवार ढाला ॥
झेंडा जयांचा अटकेस लागे । मी शोभतों काय तयांत ? सांगे ॥४३॥
करून चिंता दिनरात्र सारखी । स्वदेश झाला असता जरी सुखी ॥
तरि स्व-कर्तव्य सरे जगांतलें । मनास ऐसें असतेंच वाटलें ॥ ४४ ॥
गर्जे तुफानीं खवळे समुद्र । पडे तिथे तैल हि अल्प मात्र ॥
तैसे महात्मे जन संकटांत । पडून त्यातें करितात शांत ॥ ४५ ॥
मी मंद-धी पाहुन तोच सिंधू । गेलों पडाया जंव वारि-बिंदू ॥
तों शब्द केला लव त्यांत गेलों । आलों तसा व्यर्थ जगांत मेलों ४६
माता गुणाढ्या कमला सुशीला । आधार आतां नच कोणि तीला ॥
भर्ता पिता पुत्र असून नाहीं । झाली अनाथा भुवनांत पाहीं ! " ४७
हें बोलताहे यशवंतराय । वैरागियाची स्थिति काय होय ॥
होणार वृष्टी नभ मेघ-जालें । अरे, तसें तोंड उदास झालें ॥ ४८ ॥
अकस्मात डोळ्यांतुनी अश्रु आले । जणो डोंगराला झरे हे उदेले ॥
तसे, येट गालावरी येति खालीं । जणो काय मोत्येंच खालीं गळालीं ! ४९

१ सर्व. २ पाण्याचा बिंदु.

त्या शुभ्र दाढीवर अश्रु येती । तेथेंच वाटे अडकूं पहाती ॥
कीं तीं दंवानें भिजलीं रहाती । जीर्णे तृणे कार्तिक-सुप्रभातीं ॥५०॥
आश्चर्य वाटे यशवंतराया । बैरागि लागे तरि कां रडाया ॥
"हें काय? हें काय? महानुभावा । कां आपणा दुस्तर शोक व्हावा? ५१
या पामराचें परिसून वृत्त । कां जहालें कष्ट-निमग्न चित्त!" ॥
योगींद्र तेव्हां मनिचा विकार । तो आवरी बोलत गोड फार ॥ ५२॥
"बा रम्यशीला! यशवंतराया! । चिंता तुवां ही नलगे कराया ॥
संसार मी सोडुन दुःख-शोका । आहें उदासीन समस्त लोका ॥५३॥
स्थिती तुझी पाहुन त्याचसारखी । स्मृती मला मागिल होय जाण कीं ॥
म्हणून माझें मन धांवलें तिथे । हे अश्रु झाले मम दुःख सांगते ५४
सौख्यांत तूं घालविलेस जन्म । केलें कधीं त्वां नच युद्ध—कर्म ॥
ठावा मनोभंग तुला न लेश । आयास झाले म्हणुनी जिवास॥ ५५॥
औदार्य मोठें सरळ स्वभाव । प्रौढी विचारीं बहु दूर धांव ॥
आनंद-वृत्ती बल शौर्य भारी । एकत्र हें सर्व तुझ्या शरीरीं ॥ ५६ ॥
लोकांस हातांत कसें धरावें । संतुष्ट ठेवून सुखी करावें ॥
तूं जाणतो साधुन घेउं कार्य । होतास तूं धुर्य पदास योग्य ॥५७ ॥
कार्यास जी सिद्धि तुझ्या न आली । कोटयांत लोकांस विपत्ति झाली ॥
तोही तुझा दोष नव्हे सुशीला । घेऊं नको दुःख करून बाळा! ५८
ही ठेंच लागे पहिल्याच वेळीं । तीनें निराशा तव फार झाली ॥
होऊं नको यास्तव तूं उदास । सोडीं धिराची न कधींच कांस ५९
मल्हार ही जाणिल सद्गुणाला । चिंतील तो नाश तुझा कशाला! ॥

१ कार्तिक महिन्यांत अगदीं पहांटेच्या वेळीं. २ पुढारी होण्यास.

मोठ्यांस मोठे न कधीं छळीती । केशास नाहीं तव नाण भीती ६०
देशाभिमानी नय-मार्ग-चारी । धर्मप्रसारा झटणार भारी ॥
मल्हार तो होळकर स्वभावें । त्यातें तुला पाहुन सौख्य व्हावें ६१
धोका जिवाला न तुझ्या वसेल । कोटयास जा निर्भय तूं खुशाल ॥
भेटेन काळें तुज त्या पुरांत । आनंद भेटे समजें मनांत" ॥ ६२ ॥

प्रेमाचे उठति मनीं भरें उमाळे ।
तों वाणी स्फुट वदनांतुनी न चाले ॥
दे आशीर्वचन पवित्र योगिराया ।
तो सांगे मग कमला-सुतास जाया ॥ ६३ ॥

---

## सर्ग अठरावा.

यशवंतरायास मित्र होळकरापुढें घेऊन जातात—दोघांची भेट व संभाषण—यशवंतरायाचा आईस निरोप.

### श्लोक.

मग यावया जनन-भूमिला निघे । यशवंत तो फिरुन मागुती बघे ॥
नच त्या स्थळा त्यजुन दूर जाववे । विष-तुल्य तें विरह-दुःख जाणवे १
शिरिं घेउनी भरियले जलें घट । फिरती पुढें कितिक सुंदरी थट ॥
बलिपुष्ट[1] ही धरि दिशेस दक्षिण । गमला तदा अशुभही सुलक्षण २
म्हणतो मनीं "शकुन चांगले असे । दिसती पुढें न कळतें घडे कसें ॥
खल बांधुनी परि वध-स्थळाकडे । मज नेति हें दिसत थोर सांकडें[2] " ३
मन सांवरे श्रवुन योगि-भाषण । स्थिर शांतता वसलि तेथ येउन ॥
लव राहिलें न भय मृत्युचें तया । न करो हि होळकर वा करो दया ४
"नारि सोनती सुटाति संकटांतुन । खरचीन या समयिं मी स्व-जीवन ॥
खपले बळें झटुन तीन मास जे । नच यावया अरि जयांपुढें धजे ५
मिळवो पुर प्रियकर स्वतंत्रता । किति या हठें सतत भांडलों स्वतां ॥
म्हणुनी न होळकर कोप टाकिल । पुरताच या समयिं सूड घेइल ६
स्मरतें पुन्हा वदत योगि जें वच । भलतें घडे गमतसे कधीं नच ॥
असतात जे सुजन बुद्धि-संयुत[3] । व्यवहार ते असति पूर्ण जाणत ७
बघतां नरा विषम संकटामधें । करि सांत्वना विबुध[4] गोडसें वदे ॥
परि त्याहुनी अधिक योगि बोलला । जवळील हा मनासि आप्त भासला" ८

---

१ कावळे. २ संकट. ३ बुद्धिमान्. ४ सुज्ञ.

दिवशींच त्या नगरिं भिल्ल पोंचती । जंव पावला तपन अस्त-पर्वतीं ॥
पडली मराठि बघतात छावणी । सुखि होय होळकर जेय राहुनी ९
यशवंत तो हळु पुढें करी गती । खल भोंवते मिळुन भिल्ल चालती
रजपूत त्या बघाति खिन्न होउनी । परि काय ते करिति शक्ति त्यां उणी १०
धरिला बळींहि यशवंतराय हा । अशि बातमी सुखद होय जी महा ॥
पसरे त्वरें श्रविंति दक्ष दक्षणी । भरितात ते गगन सिंह-गर्जनीं ११
यशवंत सद्गुण-गणीं विराजित । जन-मान्य होळकर युद्ध-पंडित ॥
बघती कसे निरखुनी परस्परां । म्हणती मनीं नर 'सुधन्य तूं खरा!' १२
नगरीं तया समयिं एक देवळीं । यशवंत होळकर भेटले बळी ॥
दुसराच हा समय भेटिचा अहा! । परि भिन्नता किति दिसे तिथे पहा! १३
बहु आदरें सुखवि पेशवा जया । मिळवून जो रणिं विराजतो जया ॥
जन-मान्य होळकर आसनीं वसे । गगनांत कीं रविच कांतिनें दिसे १४
इकडे तया पुढति पेंर-नायक । रजपूत-लोक-मनिं सौख्य-दायक ॥
दिसला पराजित बलाढ्यही निका । निज कांतिनें रहित चंद्रसा फिका १५
मग शूर होळकर कोप-निर्भरें । करि भाषणाप्रत कठोरशा स्वरें ॥
"यशवंत तूं म्हणवितोस आपणा । यश कायसें मिळविलेंस दुर्जना १६
कृति ज्याचिया सुजन-भव्य-दायक । प्रभु दिल्लिचा तव दयाळु मालक ॥
उठलास त्यावर असें हि जाणुन । स्वजनीं अम्हावरहि शोक आणुन १७
करणी तुझीच सकळांस भोंवती । जगसी सुखें अजुन कोंवि दुर्मती ॥
इतुक्या जिवांप्रत तुवांच नाशिलें । फळ भोग वा स्मरुन कर्म आपुलें १८
नय-मार्ग-तत्पर नृपा न मानिते । स्वजनावरी अतुल दुःख आणिते ॥

---

१ सूर्य. २ साधूंचें कल्याण करणाऱ्या.

तव तुल्य दुर्मदै नगांत येउन । परें-वंचनें अपश जाति घेउन
घटल्या तुझ्या खटपटी जरि किती । धरि जन्म-भू अधिक दुःखदा
नृप-कोप हा अनैल-तुल्य पेटला । शलभापरी पडसि त्यांत दुर्बळ
तुज दोहना हि तव मित्र मंडळा । आणि धाडितों करून बद्ध हि
तुज भेटणें निज सुहृज्जना जरी । दवडीं वृथा समय हा न तूं तरि
झगडून तूं सतत तीन मास ते । बहु नाशिसी स्वजन दुःख
किति पावले विलय वीर कीं हिरे । धन खर्चिलें गाणितँ त्यास का
असुनी असें हि यशवंतराजया । मज वाटतें उचित दाखवू
असतां तया समयिं कोटियामधें । मन दाविसी सरळ थोर सौख
उठलास ज्यावर हत्यार घेउन । अतिरुष्ट त्या नृपतिचें असे म
वचि गुंतलों म्हणुन त्याचिया न ये । तुज मोकळें करूं अकीर्तिच्य
परि होति ज्या खटपटी तयांत मी । न करीं उणें तुजसि सोड
यशवंत ही मग तयास बोलला । परिसून होळकर डोलतो भ
"छळिलें पुरा अरि-जनीं परोपरी । किति पावलों म्हणुन दुःख
रजपूत मीं जमविले लढावया । अपराध तूं म्हणसि त्यास कार
पति दिल्लिचा अति बलाढ्य तो जरी । करुनी कृपा नृपति-धर्म
तरि कायसी गरज होय संगरीं । क्षण हा मनीं कर विचार तूं ख
शिव भूपती स्वजन-सौख्य-वर्धन । करि साहसी झटुन शत्रु-म
पथ योग्य मीं धरियला असून तो । तुज काय बा म्हणुन कोप आ
जुलमी अशा नृपतिशीं लढावया । उठलों बळें यश दिगंति
पुरवूं मवें पडसि तूं स्वहेतुला । अपराधि वास्तव म्हणेन मी

१ उन्मत्त. २ दुसऱ्यास फसवून. ३ अग्नीप्रमाणे. ४ संख्या.

भुवनीं मराठि सरदार झुंजती । यवनांसवेंच परि वैर बांधिती ॥
निज धर्म त्यां सतत वाढवूं मती । करणी तुझी उलट त्यांत जाण ती ३०
करितास तूं न जरि चाल या पुरीं । धन-वासनाच पुरवावया खरी ॥
नगरांत या समज सर्वही जन । असतो बलाढ्य धन-धान्य-वर्धन ३१
तव दुर्नयेंकरून मृत्यु पावतों । परि खेद वास्तव मला न वाटतो ॥
किति मारिले असति लोक तूं बळें । अपराध ज्यां न शिवलाहि ते भले ३२
जरि दंडणें तुजसि होय नागरां । तव दंड तो मजवरी पडो बरा ॥
जन अन्य ते निरपराधि जाणणें । वधितोस त्यां धरून काय कारणें ? ३३
सकळांस मीं उठविलें म्हणोनियां । तरवारि भेटुत गळ्यास माझिया ॥
तव कोप-वन्हिंत पडेन आहुती । जन सर्व जाउत घरास मागुती ३४
समरांत आजवर वीर थोरसे । पडले अनाथ जन अन्य ही तसे ॥
मम रक्त शिंपडून भूमिच्या तळा । इतरांस रक्षण करीन दुर्बळां ॥३५॥
अनयें तुझ्या मुकति लोक जे जिवा । करिती मलीन तव कीर्ति-वैभवा ॥
सरशील काय अर्जुनाहि मागुती ? । पुरली न घातकर हांव काय ती?" ३६
यशवंत शांत गुणवंत यापरी । वदुनी उभा असुन मौन तो धरी ॥
मग त्यास होळकर दूर न्यावया । कथितो मनीं उपजली जरी दया ३७
जवळीच वास-गृह[1] जें उभारिलें । जन पैर बांधुन जियेंहि ठेविले ॥
तिकडे शिपाइ यशवंत याप्रत । झणि नेति ते विजयें-दुर्मदोद्धत[2] ३८
निज मित्र दोहन हि मान सागर । यशवंत पाहत अनेक नागर ॥
दृढ शृंखला चरण-हस्त-बंधन । जखमा शरीरिं बहु आतळे मन ! ३९॥
झुजणार मर्द करणार कीर्तिला । अतिशूर जाणति न मृत्यु-भीतिला ॥

---

१ तंबू. २ जयाच्या दुष्ट गर्वानें उद्धट.

बसले तिये अचल काय पर्वत। करि इंद्र ज्या समयिं पक्ष खंडित ४०
रडले तया बघुन दुःख पावले। जणु जीव बाहिरच जाउं धांवले ! ॥
यशवंत सांत्वन करी मृदु-स्वरें। सुखवी क्षणैक निज मित्र ते खरे ४१
तंव येउनी म्हणत एक चाकर। "असला हुकूम जरि कांहिं तो कर॥
उपजून त्वद्गृहिंच पूर्ण वाढलों। पदरीं तुझ्या वसुन सौख्य पावलों ४२
तुजसारखे न ममताळु मी धनी। बवणार यास्तव मरेन हें मनीं ॥
म्हणुनीच शेवटिल भेट घ्यावया। बसलों इथे मजवरी करीं दया!" ४३
यशवंत सेवक जनांत भक्तिला। बघुनी अशा गहिंवरास पावला ॥
पडतांच संकट सुमित्र सोडिती। म्हणतात ते जन असत्य बोलती ४४
"सखया खुशाल घरिं जा सुखें रहा। सुख होय जेंवि जननीस तें पहा॥
हत-भाग्य पुत्र नसतां तिला कसें। तुजसारख्याविण सुखास येतसे?४५
प्रिय माय पुण्य-चरिता वसे घरीं। तिस सांगतों कळविं नीट यापरी ॥
मीं नित्य तत्पदें स्मरून सौख्य मानितों। परि नेत्र कोंवि निववूं ? न जाणतों ४६
तव पुत्र मी चरणिं नम्र होउनी। करिं शेवटील विनंती धरीं मनीं ॥
उदरीं तुझ्या जननि जन्म घेउन। नच कांहिं केलि करणी झुगे मन ४७
मज हौस फार रणशूर होइन। तरवार गाजविन कीर्ति घेइन ॥
परि इष्ट होय जगदीश्वरा न तें। म्हणुनी चरित्र मम खुंटतें इथे! ॥४८॥
म्हणवूं सुधन्य वदनांतुनी तव। करणी अचाट करितों जगीं नव ॥
जरि कांहिं काळ जगतों महीवरी। परि हाय! हें घडतसे कसें तरी?४९
मजपासुनी सुख तुला किती मिळे। जननी अभाग्य तनुजास हें कळे॥
परि पुत्र-वत्सल दया-नदोद्भव। करिसी कृपा धरिसि थोर गौरव ५०

---

१ विनंती.

मम नाश दिल्लि-पति चिंतितो जरी। तरि काय होळकर तो कृपा करी॥
फिरलें समस्त मम दैव हें असें। म्हणुनी निराश मम जीवनीं वसें५१
मम मृत्यु-शोक लव ही न तूं करी। न उदास-वृत्ति किमपी हि तूं धरीं॥
झुरणीस लावुन न देह शोषणें। न च दुःख-शंकु हृदयांत पोषणें५२
मज एकदा जननि बोलसी अतां। करिं सत्य वागुन तसेंच तूं स्वतां॥
कुळ उच्च त्या उचितसें च वागणें। प्रभु-रोष बैसुन निमूट सोसणें५३
जरि पीर ते मजसि दोष देतिल। तरि त्यांस सांग जरि रुष्ट होतिल॥
झटलों तयां हित करूं मनांतुन। मरतों करून मम देह अर्पण॥५४॥
धन फार नें किसनदास मेळवी। गरिबांस दे सकल त्यांस तोषवीं॥
तव दुःख-जीर्ण तनु तींत शोक हा। खिळवूं नको दृढ सुशांत तूं रहा५५

जन्मास येउन सुखांतच नित्य राहे।
कोणी असा न नर या भुवनांत आहे॥
दुःखें सुखें सकल भेटाति जीव-मात्रा।
आई! विचित्र जगिं या परि लोक-यात्रा" ॥ ५६ ॥

# सर्ग एकोणिसावा.

कमलाबाईचा पिता आनंदराव डफळे याची व मल्हारराव होळकराची गांठ व संभाषण—आनंदराव आपली हकीकत सांगतो—पराभवानें झालेली दुर्दशा—परोपकाराचें कृत्य—त्याचें फळ चौदा वर्षेपर्यंत तुरुंगांत राहणें—तेथून सुटका—वैराग्य.

श्लोक.

मल्हार तैसें यशवंतराजया । बोलून सांगे दुरि न्यावया तया ॥
झाले विनाकारण खिन्न मानस । वाटे जगीं जीवन त्या जसें विष १
भृत्यांस[1] राहूं जवळी न दे स्थित । बैसे उगा तो सुसकार टाकित ॥
खायास प्याया नच घेत आवडी । चिंता कशाची कळवी न एवढी २
तों सेवकें येउन आंत वंदिलें । नम्र स्वरें होळकरा कथीयलें ॥
"गोसावि दारीं तुज भेटुं इच्छितो । आज्ञा कशी यास्तव वाट पाहतो" ३
ठेवावया उत्तर देशि भूपती । धाकांत मल्हार म्हटे महामती[2] ॥
प्रत्येक होते दरबारि हिंडत । तदूत नानाविध—वेष—संयुत ॥ ४ ॥
" गोसावि जो राहि उभाच बाहिर । माझा न तो हेर असेल की तर॥
पाहीन त्यातें दवडून न क्षण "। बोले असें चिंतुन शौर्य—लक्षण ॥५॥
" बाहेर जाऊन तयास घेउन । ये आंत होवो मजलागिं दर्शन " ॥
आज्ञेप्रमाणें मग जाय चाकर । गोसावि तो घेउन येइ सत्वर ॥ ६ ॥
"द्वारीं उभा जाउन राहि बाहिरी । येऊं नको देउं कुणास अंतरीं "॥
भृत्या असें सांगुन वाक्य बोलला । योगीस तो होळकर प्रेंधी भला ७

१ चाकरांस. २ बुद्धिमान.

पाळें जशीं दूरवरी जमीनींत । जाऊन वृक्षास बळत्व आणित ॥
सर्वत्र तैसे मम दूत हिंडती । [1]मंत्रें अरी यास्तव जिंकितों किती ॥ ८ ॥
आहेस तूं दूतच एक जाणतों । केला तुला काय हुकूस नेणतों ॥
सांगीतलें काय कुणा करावया । ध्यानांत नाहींच रहात माझिया ॥९॥
हें योगिनाथें परिसून सत्वर । केलें तदा होळकरास उत्तर ॥
"जैसा तुम्हां मी दिसतों असें तसा । मी हेर नाहीं मज कां करीतसां ?" १०
मल्हार बोले " मग काय कारणें । आलास येथें मज शीघ्र सांगणें ॥
माझी तुझी भेट कधीं न जाहली । कां आज इच्छा मज पाहुं धांवली?" ११
गोंसावि तों बोलत काय भाषण । "केलें अहा ! निर्दय कीं तुवां मन ॥
होता असा काळ जयांत दास हा । पावे तुझी सुप्रिय मित्रता पहा १२
एका स्थळीं बैसुन गोष्टि बोललों । एका स्थळीं दावुन शौर्य वाढलों॥
सव्वीस वर्षे जरि यास लोटलीं । माझी तुला विस्मृति काय जाहली ? १३
शौर्यें स्वकीयें समरीं महाबळी । जो शत्रु–कीर्ती हरिता स्थळीं स्थळीं ॥
आनंद मी हा डफळे कुळांतला । आहें.पहा. ओळखिसी न तूं मला ?" १४
आनंद होऊन विरक्त हिंडतां । पाहे कसा तो कमलेच्चिया सुता ॥
कन्या-सुता जाणुन त्या रडे बळी । ही गोष्ट मीं मागिल सर्गीं आणिली १५
आनंद तो रक्षण नातवा करूं । सन्मित्र दृष्टी पडतां सुखा वरूं ॥
गोटांत तो त्या समयास पातला । आला त्वरें होळकरास भेटला ॥१६॥
खाणाखुणा पूर्ण पटून पोंचल्या । चित्तीं सुखाच्या लहरीच ऊठल्या॥
स्वानंद भारी जरि दाखवी निका । मल्हार कांहीं दिसला गमे फिका ॥१७॥
तो बोलला " बा सदया ! सुहृत्तमा ! । आनंदराया ! सुगुणा ! मनोरमा ॥

---

[1] मसलतीनें.

नेलीं कशीं हीं इतुकीं तुवां दिनें? । कां धन्य केलें न मला स्वदर्शनें?१८
आटांसवें तुंबळ युद्ध जाहलें । तेथें मराठे अपकीर्ति पावले ॥
पासून तेव्हां घडलें कसें कसें । आनंद तो होळकरा कथीतसे ॥१९॥
" सैन्यें मराठी पळतां चहूंकडे । वाटे मला तें अतिघोर सांकडें ॥
कीं लागला डाग यशःशशीस[1] हा । मानी जना दुस्सह होय तो पहा २०
विख्यात माझ्या पथकांतले भट । एकेक गेले फुटुनी भयावृत ॥
मी एकटा वैभव-हीन चाललों । जावें कुठे निश्चय हा न पावलों ॥२१॥
पायीं स्ववेषांतर मी करूनियां । देशामधें हिंडत चाललों तया ॥
गांवांत एके दिनिं एक पोंचलों । जें वृत्त झालें तुज तेय तें कळो २२
विस्तीर्ण देऊळ सुरम्य पाहिलें । विश्रांति घेऊं क्षण चित्त धांवलें ॥
तों पाहिले त्या स्थळिं राज-पूरुष । होते तिथें हिंडत जे अहर्निश २३
सुरालयीं[2] सावध ज्यास कोंडुन । करूं पहारा खपतात हे जन ॥
असे असा कोण पुरूष बंदित । कळावया हें मन होय उत्सुक ॥२४॥
विघ्नाविणें सत्वर आंत जाउन । मीं पाहिला तो गुणवंत सज्जन ॥
जो कृष्णदासाख्य धनाढ्य वत्सल । कोटा-पुरींचा रहिवासि सत्कुल २५
यात्रार्थ तो हिंडत हिंडत स्वयें । घेऊन कांहीं परिवार तेथ ये ॥
कांहीं शिपाई तंव येति त्या स्थळीं । त्या कृष्णदासाप्रत वेढिती बळी२६
या सावकारा छळण्यास दुर्मती । धाडी शिपाई अजमीर-भूपती ॥
पूर्वींच होतें मनिं वैर सांठलें । तें आज घ्यावें उगवून वाटलें ॥ २७ ॥
औदार्य कर्णासम थोर ज्या असे । संपत्ति दासीसम यद्गृहीं वसे ॥
शुद्धस्वभावें व्यसनार्त तो जन । पाहून माझें द्रवलें तदा मन ॥ २८ ॥

---

१ कीर्तिरूपी चंद्रास. २ देवळांत.

जाऊनियां धैर्य दिलें तयास मीं । झालों श्रमी पाहुन त्याजला श्रमी ॥
संगें तयाच्या दिन कांहिं राहिलों । तत्स्नेह विश्वास विशेष पावलों ॥२९॥
स्वप्राण पाशीं स्वयमेव गुंतवीं । आयुष्य खर्चूनि हि यास सोडवीं ॥
आला असा हेतु मनांत माझिया । मी सज्जलों त्याजवरी करूं दया ३०
रक्षूं स्वदेहा परजीव खर्चुनी । तो ही महात्मा नच आयके गुणी ॥
येतात जे सज्जन संकटामधें । शोभा तयांची कति त्यांस फार दे ॥३१॥
' गजेंद्र-लक्ष्मी तुज ईश्वरें दिली । व्ययें तिच्या कीर्ति मिळे तुला भली॥
परोपकारीं तव हेतु आगळे । तुझी जगातें उपयुक्तता कळे ॥ ३२ ॥
प्राणांस भीती तव संकटांत या । यत्नें तयां पाहिन वांचवावया ॥
घे साधुनी संधि अशी कशी मिळे । हानी तुझी चिंतुनि चित्त हें जळे ३३
तूं वांच बा शंभर आणि वत्सर । होई अनाथांस सदा दयाकर[1] ॥
दे निर्गृहाला[2] गृह दुर्गता धन । साधीं सख्या दीन-जनावलंबन ॥ ३४ ॥
देऊळ लक्षावधि राहुंदे उभें । येवोत विद्वान् शतशा तुझ्या सभे ॥
जे यज्ञ-कुंडांतुन धूर चालती । होवो तुला तीच सुलोक[3]-पद्धती ॥३५॥
आयुष्य सद्धर्म-पथेंचि घालवीं । कीर्ती दिगंता अतिपुण्य[4] पाठवीं ॥
बा कृष्णदासा ! पळ येथुनी भला । कामीं तुझ्या खर्चिन जीव आपुला'३६
ऐशा प्रकारें करुनी सुबोधन । वेगें पळाया वळवून तन्मन ॥
मी लागलों संधि पहावया नपूं । त्या सोडवाया दिनरात्रही खपूं ३७
मीं वेष माझाच मराठि त्या दिला । त्यातें, तयाचा निज देहि घेतला ॥
एकया पहांटेस शिपाइ निद्रित । पाहून केलें झणि त्या पलायित ॥३८॥

---

१ दयेची खाण. २ दरिद्री मनुष्यास. ३ स्वर्गाचा मार्ग. ४ अति पुण्य देणारी.

जागे शिपाई करितात ओरडा । झाला वसा ओरडुनीच कोरडा ॥
धांवूनियां धुंडिति सर्व ही स्थळें । कैदी कुठे जाय न तें तयां कळे ३९
रागें मला येउन ताडिती बळें । पोटांत संताप तयांचिया जळे ॥
'वाणी कुठे जाय लपून तो बसे । सांगें तरी जीव तुझा रहातसे' ४०
बोलोनियां यापरि ताडिती मला । कांहीं नफा त्यांस परी न जाहला ॥
जो मीं अबोला धरिलाच एकदा । नाहींच तो सोडियला पुन्हा कदा ४१
जो हाडवैरी नृपतीस भासला । कैदी असा सांपडुनी गमावला ॥
पोटांत भीती म्हणुनी उठे महा । झाली तयां लाज विशेष तैं पहा ४२
घेऊन मातें मग राजसंनिध । गेले तदा जाट शिपाइ दुर्मद ॥
मी राहिलों त्या नृपतीपुढें उभा । ज्याच्या मुखीं शोभतसे जयप्रभा ४३
त्यानें मला ओळखिलें. म्हणे. 'अरे !। हा दुष्ट यायास पुढें कसा सरे ? ॥
हा मत्त नाईक मराठि जाणतों । जो आपणा शौर्य-बलाढ्य मानितो ४४
कां रे तुवां खालति मान घातली ? । कीं आज जिव्हा तव बद्ध जाहली ॥
सैन्यें मराठी जमवून तेधवां । विध्वस्त केला मम देश कां तुवां ? ॥४५॥
षण्मास रात्रंदिन घोडियांवरी । बैसून मंत्री जपले बहू[1] परी ॥
नाहींच निद्रा मज लागली क्षण । तेव्हांच झालें मम देश-रक्षण ४६
तो मी तुला सोडिन आज काय रे ? । त्वां ओढिला मृत्यु धरूनियां करें !
बंदींत आधीं दिन कांहिं घालवीं । आशा-लता घेउ तुझी न पालवी' ४७
कारागृहीं वाक्य वदून यापरी । न्यायास दूर स्वसभेंतुनी करी ॥
मी घालुनी खालति मान चाललों । त्या संकटीं क्लेश न लेश पावलों ४८
जेव्हां करीं शूर हि शत्रु सांपडे । तेव्हां दया दाखविणें तया पडे ॥

---

१ पुष्कळ प्रकारांनीं

सन्मान देती जित शत्रुला गुणी । ही गोष्ट आलीच कधीं न तन्मनीं ४९
एकेक वर्षासम भासलें दिन । चौदा असे वत्सर होय बंधन ॥
ज्या ज्या व्यथा संभवती मनाप्रत । त्या लागल्या होउं मलाहि सांप्रत ५०
आला किती वेळ नभामधें रवी । शोभाभरें भूमि-तळास तोषवी ॥
मातें तयाचा उपयोग कायसा । मीं एकदां पाहियला न तो कसा ! ५१
नाना चमत्कार-युता सवैभवा । सृष्टी मला काय असून तेधवां ? ॥
खोलीच माझें जग त्यांत मी धनी । स्वातंत्र्य स्वप्नामधिं मात्र ये मनीं ५२ .
हातीं बिडी पायिं बिडी सदा असे । खायास ही पोटभरी कधीं नसे ।
ऐशा स्थळीं राहुन देह वांचला । याचा चमत्कार गमे अतां मला ५३
कारागृहीं मात्र कुडी वसे मन । देशांतरा दूर करीत लंघन ॥
एका स्थळीं राहि कधीं न तें स्थिर । चिंता नव्या भोगित मात्र दुर्धर ५४
वेळीं अवेळीं कमला-स्मृती घडे । तों जीव चिंता-जलधीमधें पडे ॥
स्वप्नांत पाहून सुतेस हर्षलों । कित्येक वेळां दचकून ऊठलों ॥५५॥
जो मी मराठा सरदार केसरी । अत्यंत शोभेस पुण्यामधें धरीं ॥
उत्कर्ष-कालीं रडवूनियां अरी । दुर्भाग्य गेलों निजशत्रुच्या करीं ॥५६॥
कारागृहीं मी हतभाग्य सांपडें । वाटे जगीं निष्फळ जन्म हा घडे ॥
जो मान जें सौख्य किड्यास वारुळीं।त्याचा मिळे लेश मला न त्या स्थळीं ५७
त्या कोठडीच्या खिडकींतुनी वरी । पाहे तदा धार दिसे नभोऽतरीं ॥
स्वच्छंद पंखां पसरून चालली । माझ्या मनीं मत्सर-बुद्धि जाहली ५८
पशूंस पक्ष्यांसहि जी स्वतंत्रता । मिळे वनीं वा गगनांत हिंडतां ॥
तियेस भोगूं प्रतिबंध माणसा । मनुष्य ठेवी सुविचार हा कसा ? ५९
संतापलों एक दिनीं सकाळीं । तोडूनियां बंधन गार्द केली ॥

आला शिपाई धरिलें तयाला । एका क्षणीं तो हत-वीर्य केला ॥६०॥
खड्गास त्याच्या हिसकून धांवें । तों स्वार तेथें आणि एक पावे ॥
मीं घातली त्यास उडी धराया । तो कोसळे खालिं तयाच ठायां ६१
घोड्यावरी बैसुन धांव घेतली । मागून गर्दी मग फार जाहली ॥
दैवें दिला हात म्हणून वांचलों । स्वातंत्र्य माझें प्रिय पूर्ण पावलों ६२

रानोमाळीं हिंडुन दमलों मम कन्या ॥
शोधायाला सांपडली ती नच धन्या ॥
संसाराचा वीट मला हा मग आला ॥
वैरागानें वेष असा मीं मग केला ॥ ६३ ॥
हृदय विटलें माझें तेव्हां जगांतिल वस्तुंला ॥
हरि-हर-पदीं तें लावोनी हितार्थच साधिला ॥
मम तनु झिजो अन्यासाठीं निरिच्छपणें सदा ॥
म्हणुन झटलों कामक्रोधां करूं जित दुःखदां ॥ ६४ ॥

गेलों गंगोत्रिला मी हिमनग चढुनी श्रीहरिद्वार-पारीं ॥
काशी-रामेश्वरीं श्री रघुपति-नगरीं श्री जगन्नाथ दारीं ॥
लीला श्रीकृष्ण जेथें घडवित मथुरा-द्वारका-गोकुळांत ॥
जावोनी क्षेत्र-तीर्थें सकळ बघितलीं जाहलें चित्त शांत ॥ ६५ ॥

भोगुन दुःख सुखादि जगांतिल मी श्रमलों ।
हेतु उरे मम एकचि तो तुजलागिं कळो ॥
आणुन मैत्रि मनीं अपुली बहुतां दिवसें ।
घालुन आण सुजाण सख्या विनवीन असें ” ॥ ६६ ॥

# सर्ग विसावा.

मल्हारराव होळकर अजमीरच्या लढाईनंतर घडलेला आपला वृत्तांत आनंदरावास कळवितो—त्या लढाईंत पराजित झालेल्या मल्हाररावाची दुर्दशा—बादल नांवाच्या भिल्लाशीं लढाई—कमळाबाईची सुटका—मल्हाररावास जखमा लागून तो अजारी पडतो—त्याच्या मनाची स्थिति—बाळपणची आठवण—थोरपणांतील उलाढाली—कमलेनें केलेली मल्हाररावाची सेवा—प्रीति—गांधर्वविवाह—वियोग—तज्जन्यदु:ख—आनंदरावानें मल्हाररावाचें केलेलें सांत्वन—मल्हारराव होळकराचा मुलगा यशवंतराय.

**श्लोक.**

आनंदराव स्व-चरित्र सांगे । मल्हार तें देउन चित्त ऐके ॥
डोळ्यांस पाणी मग येउं लागे । तें आवरूं शक्त नसे विवेकें ॥ १ ॥
कित्येक वर्षे नयनांत पाणी । ठावें न ज्यातें जनमान्य मानी ॥
तो स्फुंदला सद्गद-कंठ झाला । आनंदरावा बघवे न त्याला ॥ २ ॥
शत्रु-स्त्रियांच्या नयनोदकानें । कोपाग्निला शांतिस उग्र जो ने ॥
ज्याचा दरारा भुवनांत गाजे । तो ही रडे भीति जयास राजे ॥ ३ ॥
आश्चर्य तेव्हां डफळ्यास वाटे । तो स्वस्थ पाहे निरखून त्यातें ॥
तो बोलला होळकर प्रसिद्ध । वाणी अशी शांतपणें विशुद्ध ॥ ४ ॥
“ आनंदरावा ! अति सुस्वभावा ? । मातें तुझा निर्मळ भाव ठावा ॥
तूं ठेवसी प्रेम असें पवित्र । माझ्यावरी मी न तयास पात्र ॥ ५ ॥
जी प्रार्थना तूं करण्यास येसी । माझ्यापुढें व्यक्त जरी करीसी ॥
ती मी क्षणीं याच पुरी करीन । आनंद अत्यंत मनीं धरीन ॥ ६ ॥
अन्योपकारास्तव देह ज्याचा । आजन्म गेला मन आणि वाचा ॥

केला अशाचाहि महापराध । होतो मना यास्तव फार खेद ॥ ७ ॥
मी घोरकर्मी मति-मंद नीच । आहें पुरें जाणुन या परीच ॥
मोठ्या मनीं ठेव ममापराध । स्नेही दयाळा ! न करींच भेद ॥ ८ ॥
कन्या तुझी ती मम धर्म-भार्या । खाणी गुणां दुर्मिळ धन्य आर्या ॥
मी दुर्मती तत्पति तीस रानीं । सोडून आलों अपुल्या करांनीं ॥ ९ ॥
गर्भें जिची सुंदर देह-यष्टी । झाली तशा घोर वनांत कष्टी ॥
कन्या तुझी ये स्मरणांत जेव्हां । हा व्यर्थ वाटे मम देह तेव्हां॥१०॥
मी वृत्त सांगें स्मरुनी क्षणैक । वाटे तयानें उतरेल शोक ॥
कांहीं न मी चोरुन गोष्ट ठेवीं । माझी कथा सर्व तुला कळावी ११
वेलीस तो अंकुर मात्र येतो । काळें वरी वाढुन वाढ घेतो ॥
काळें तयाला फुटती तंवारे । ते व्यापिती मात्र दिगंत सारे ॥ १२ ॥
वेगें हवेंतून करीत नाद । येतो पडे भूमि-तळा धडाड ॥
गोळा जसा कीं कुलुपी उडून । देहां असंख्यात करी विदीर्ण १३
येतें तसें संकट एक वेळ । तें मांडितें नंतर फार खेळ ॥
कांहीं जना दुःख दिल्याशिवाय । होई न तें नष्ट उपाय काय ? १४
दुष्काळ वा वादळ भूमि-कंप । युद्धें महापूर असे प्रकोप ॥
हे ईश्वराचे समजें मनांत । होतात यांहींच असंख्य घात ॥ १५ ॥
जाटांत तें युद्ध मराठियांत । होऊन झाला मम फार घात ॥
तें दुःख देतें स्मरतां अपार । गेला जरी लोटुन काळ फार ॥ १६ ॥
जी पद्धती भूप शिवाजि घाली । दे ती तयाला जय सर्व काळीं ॥
ती योग्य युद्धांत मराठियांला । आणील कोठें न पराजयाला ॥ १७ ॥
आम्हीं सडे स्वार चहूंकडून । झुंजू जसे शत्रु मधें धरून ॥

तोफा तशा देतिल लाभ काय ?। ही रीति आम्हांस करी अपाय १८
तोफांवरी पायदळावरी ही । विश्वास जो ठेवुन पूर्ण राही ॥
युद्धामधें तो मिळवील कीर्ति । ही गोष्ट वाटे मजलागिं खोटी १९
येतील जे जे परकी फिरंगी । घेऊन तोफांप्रत युद्ध-रंगीं ॥
भाला मराठी पळवावयाला । आहे तयां शक्त गमे मनाला ॥ २० ॥
जाटांसवें तो समर-प्रसंग । होतां वरी सैन्य मराठि भंग ॥
चोहींकडे होउन धूळधाण । गेले मराठे सगळे पळून ॥ २१ ॥
मोडून सर्वां पुढतींहि अंगें । पराजयाचा मज डाग लागे ॥
मी माळव्याला परतावयाला । चालें मनां खेद विशेष झाला ॥ २२ ॥
जे दक्षणी स्वार सडे कुलीन । पन्नास माझ्या जवळील जाण ॥
राखू मला ते झटले अपार । मीं जिंकिलें शत्रुस तीन वार ॥ २३ ॥
मी गुप्त राहीन तरी खुशाल । नाहीं तरी नाश जिवा घडेल ॥
यासाठिं खोटेंच धरून नांव । पवार झालों जगदेवराव ॥ २४ ॥
तें धाकटें घेउन सैन्य संगें । मी चाललों कंठित वाट अंगें ॥
आला धराया रिपु तीन वेळां । नाहींच मी सांपडलों तयाला ॥२५॥
न अन्नपाणी नच वस्त्रपात्र । मिळे प्रवासें थकलेंहि गात्र ॥
रात्री दिनीं चालुन क्षीण आलों । थाराच कोठें न मिळे अम्हांला २६
सांजेस एका दिवशीं समस्त । मिळून होतों गमना करीत ॥
कोसार्ध कोसावरि धूळ लोटे । पाहून आश्चर्य अम्हांस वाटे ॥२७॥
मीं पाहिलें तें निरखून दूर । माझ्याकडे धांवति भिल्ल शूर ॥
नीट व्यवस्थेंत उभे करून । लोकांस माझ्या बसलों विषण्ण ॥ २८ ॥

---

१ लढाईचें ठिकाण हीच रंगभूमी ह्मिजवर. २ खिन्न.

रक्तें तयांच्या भरवूं स्वशस्त्र । हल्ला जरी ते करितील मात्र ॥
वाटेस त्यांच्या न वळेंच जाऊं । आपापले मार्ग खुशाल पाहूं २९
देशांत त्या काळिं महाप्रचंड । करी बळें बादल भिल्ल बंड ॥
त्याचा दरारा सकळांस होता । नामेंच जो कंप पैरीं भरीता ॥ ३० ॥
सैन्यें मराठी फुटुनी पळालीं । लुटून यानें धन फार केली ॥
असंख्य लोकां धरिलें वधीलें । बंदींत नेवोनि हि ठेवियेलें ॥ ३१ ॥
त्या दुष्ट भिल्लास समोर पाहें । माझ्या कशी शांति मनास राहे ॥
दुष्टास त्या शासन योग्य द्यावें । आलें मनीं भिल्ल पुण्यास न्यावे ३२
माझे प्रवासें जन शक्ति-हीन । होते अजारी अणि फार दीन ॥
त्या बादलाची जिरवीन खोड । हेतूस या कांहिं निघे न तोड ३३
तों सांगती येउन दूत माझे । चातुर्य नैसर्गिक ज्यां विराजे ॥
कीं त्या दिनीं बादल भिल्ल घाली । हल्ला मराठ्यांवर लूट झाली ३४
घेऊन संपत्ति मदांध डोले । हर्षें स्वदेशा परतून चाले ॥
आनंदराया! तव धन्य कन्या । घेऊन जातो स्वगृहास वन्या ॥ ३५ ॥
तूं मित्र माझा बहुता दिसांचा । कुलीन लोक-स्तुत-कीर्ति साचा ॥
कन्या तुझी पाहुन संकटांत । मला कसें बा बसवेल शांत ? ॥ ३६ ॥
मी भोंवते स्वार करून गोळा । त्यांतें असा हा उपदेश केला ॥
कीं ' मित्रहो! हा कठिण प्रसंग । साहूं नकाहो क्षण मान-भंग ॥ ३७ ॥
स्वदेशची एक कुलीन कन्या । नेतात हे भिल्ल धरून धन्या ॥
हातीं हत्यारें असुनीं उपाय । करूं न ती सोडविण्यास काय ? ॥ ३८ ॥
कन्या स्त्रिया आमुचिया परांनीं । न्याव्या अशा शुद्र धरून रानीं ॥

---

१ सत्रंत.

बाणा मराठी अमुचा असून । घ्यावें कसें हें तरि आपकून ? ॥३९॥
झालों जरी दीन पराजयानें । वाटेचियाही शिणलों श्रमानें ॥
आम्हांमधें तेज मराठि वागे । हल्ला करूं तेंच अम्हांस सांगे ॥४०॥
उठा धरा नीट जपून भाला । घालाल भिल्लांवर नीट घाला ॥
यथेच्छ वाटे मज घ्याल सूड । दंडाल हा बादल भिल्ल हूड'॥४१॥
हे शब्द माझे परिसून कानीं । मानी मराठे उठले इमानी ॥
घोड्यावरी बैसुन धांवतात । तिराप्रमाणें जणु काय जात ॥ ४२ ॥
'हर्हर्महादेव' करीत शब्द । नेती नभाला निज सिंह-नाद ॥
चोंहींकडोनी करितांच हल्ला । आवेश आला झुजण्यास भिल्लां॥४३॥
मी त्या लढाईंत पुढें सरून । भिल्लां स्वयें झुंज दिलें झटून ॥
हाणीत हाणीत पुढें निघालों । मी बादला सन्निध नीट गेलों ॥४४॥
टोळीवरी शंभर भिल्ल जींत । पाहून हल्ला दचके मनांत ॥
घोड्यावरी घालुन त्या स्त्रियेला । भिल्लांस सांगे तिस रक्षण्याला ४५
कन्या मराठी हरणार दुष्ट । पाहून झालें मम चित्त रुष्ट ॥
मी गर्जलों 'रे मति-मंद भिल्ला ! । मल्हार मी येइं धरून भाला ४६
केलेस जे तूं अपराध हातें । देतों तयांचें फळ तूं पहा तें ॥
खरा जरी तूं अससी शिपाई । न दूर जाया करिशील घाई॥ ४७ ॥
राहें उभा युद्ध करूं हत्यार । घे. राहिजे सावध. हो तयार ॥
दंडीन जेणें उतरेल माज । गात्रें तुझीं छिन्न करीन आज ॥ ४८ ॥
वाटेल भीती जरि शस्त्र घेऊं । इच्छा जरी नश्वर देह ठेवूं ॥
खालीं शिरा वांकव तूं प्रणामें । दे त्या स्त्रियेला कर वाद सामें ४९
त्या स्त्रीस जो तूं धरणार नीच । शिक्षा तुला योग्य असे रणींच ॥

रक्तें तुझ्या भूमिस शिंपडीन । मल्हार मी सत्य जरी असेन[1] ॥ ५० ॥
बोलून हे शब्द तया क्षणींच । मीं गांठिला तो मति-मंद साच ॥
तो ही मला पाहुन रुष्ट दर्प । दावीत आला जणु काय सर्प ५१
ती सुंदरी कांहिं कमी स्वशोक । करी तदा पाहुनियां स्वलोक ॥
मीं पाहिलें कंपित रम्य गात्र । ते अश्रुंनीं पूर्ण तिचे सुनेत्र ॥ ५२ ॥
संग्राम होणार भयाण साचा । पूर्वीं कळेना परिणाम त्याचा ॥
पुण्यें हिच्या होइन मी सुधन्य । वाटे धुळीला मिळवीन अन्य ५३॥
तो भिल्ल रागें मग ओंठ चावी । खायास पृथ्वी जणु भाव दावी ॥
घोड्यास दे टांच चढून आला । मीं घेतला सज्ज करून भाला ५४
मीं दाबिला अश्व पुढें पहातां । तो जों न आला वर सात हातां ॥
मीं मारिला नेमुनि नीट भाला । दिव्य प्रकाशें झळकून गेला ॥५५॥
त्याचा हि भाला चुकवून वेगें । मी धांवलों नीट तसाच रागें ॥
घोड्यांस झाल्या जखमा म्हणून । आलों जमिनीवर भीति-हीन ॥५६॥
आवेश दोघांसहि झुंज देऊं । परस्पर-प्राण रणांत घेऊं ॥
अल्पेंचि काळें परि त्यास खालीं । मीं आणिलें कीर्ति मला मिळाली५७
त्याच्या उरीं देउन पाय राहें । मी जों उभा जीवित घेउं पाहें ॥
धांवून अंगावर भिल्ल येती । बाणीं जणों पाउस पाडिताती ॥ ५८॥
सोसून ते वज्र-समान तीर । माझे मराठे उठले सुवीर ॥
रक्षावयाला मज धांव घेती । भिल्लांस रागें उधळून देती ॥ ५९ ॥
मीं सोडविलें कमलेस वेगें । भिल्लां दिलें शासन योग्य रागें ॥
शत्रू दिले सोडून जाण दीन । झाले मला वार परंतु तीन ॥ ६० ॥

---

१ शत्रु.

सुराजमल्ल प्रिय मित्र माझा । साधूं झटे नित्य मदीय काजा ॥
राज्यांत दे आश्रय या प्रसंगीं । असे यथाशक्ति सहाय अंगें ॥ ६१ ॥
बर्मी मला लागुन बाण वार । जे जाहले ते भयकारि फार ॥
आले जणो ते यम-दूत न्याया । सर्व प्रयत्नें झटलों जगाया ॥६२॥
मी वांचतों कीं मरतों कळेना । निश्चित निद्रा क्षण ही मिळेना ॥
होतों बिछान्यावर मी पडून । रुचे सुचे अन्न न पाणि आन ॥६३॥
डोळ्यांवरी झांपड दाट आली । वाणी मुखांतील हि बंद झाली ॥
ते सोडिती कान हि ऐकण्याचें । न ज्ञान बाहेरिल वस्तु यांचें ॥६४॥
ही रात्र कीं हें दिन ओळखाया । मी शक्त झालों क्षण त्या न ठाया॥
माझी स्मृती सुस्थिर ती रहाली । भिन्नस्थळीं हिंडत भिन्नकाळीं ६५
झाली मनाची स्थिति जी तियेला । वर्णावया शक्ति न या जिभेला ॥
मूर्च्छा नव्हे स्वप्न नव्हे न निद्रा । भिन्नस्थिती होय मनःसमुद्रा ६६
हीं इंद्रियें होउन अप्रबुद्ध । यांच्या गती सर्वहि होति बद्ध ॥
अर्थांत ये चंचलता स्वचित्ता । तेथें जिवाची सगळी व्यवस्था ॥६७॥
उदास जें निर्जन वाळवंट । उष्णांत चालून तयांत वाट ॥
बागेमधें जेंवि शिरे प्रवासी । क्षुधा तृषा क्लेश करीति ज्यांसी ॥ ६८ ॥
तैशीच माझी स्मृति या जगांत । जे जाहले घोर अनर्थ घात ॥
त्रासून त्यांतें करि हायहाय । ती आठवूं पूर्व वयास जाय ॥ ६९ ॥
वाटे पुन्हा होउन मी लहान । आहे गुरें राखित गात गान ॥
तापी नदीचें बहु रम्य तीर । आहेत तेथें कुरणें हि गार ॥ ७० ॥
माझ्या सुखी शांत दुधाळ गाई । घेऊन मी त्या कुरणांत जाई ॥

१ दुसरें.

पांवा मुखीं घेउन वाजवीत । मी बैसलों धेनुस रंजवीत ॥ ७१ ॥
पाणी जिथे सुंदर गार गोड । मी पोंहण्याचें पुरवीन कोड ॥
सोडून काखेमधली शिदोरी । मी बैसलों कोण मला विचारी? ॥७२॥
होतों सुखी खेळुन सोबत्यांत । आशा मनाला शिवली न शांत ॥
जो एकदां दूर कुठें पळाला । आनंद तो नाहिं पुन्हा मिळाला! ७३
शेजारचें नंदुरबार थोर । धनाढ्य वाडे दिसतात दूर ॥
जाणून तें सौख्य न लोभ वागे । माझी मला भाकरि गोड लागे ७४
तेथून धांवे मन दूर देशीं । त्या आडकाठी करणार कैसी? ॥
लक्षावधी स्वार सभोंति राहे । मी माळवा झुंजत घेत आहें ॥७५॥
मी जिंकितों वेढुन देश झांशी । मी भांडतों दायबहादराशीं ॥
भागीरथीच्या उदकांत घोडीं । मीं घातलीं फौज सवें न थोडी ७६
सर्जे हि जिंकून करून दीन । मी मेळवीलें धन कोटि तीन ॥
पाहून माझा अतुल प्रभाव । प्रसन्न होतो मग बाजिराव ॥ ७७ ॥
त्या त्या स्थितीचा घडतां विचार । वेडें फिरे चित्त निमग्न फार ॥
यावें पुन्हा शुद्धिवरी सभोंती । पाहोनियां भीति मनास होती ॥७८॥
होता दिवा मंद जया स्थळांत । उदास ऐशा समयीं प्रशांत ॥
सभोंवती दीन अशक्त पाहे । कन्या तुझी तेथ बसून राहे ॥ ७९ ॥
रात्रीं दिनीं चाकरिला जपून । राहे बिछान्याजवळी बसून ॥
घाली स्वहस्तें शिजवून अन्न । माझी स्थिती पाहुन होय खिन्न ॥८०॥
विसंबली ती क्षण एक नाहीं । करीत बैसे उपचार कांहीं ॥
होतां मला जों सुख-लेश पाही । न हर्ष तीचा गगनांत माई ॥ ८१ ॥
माझ्यावरी प्रीति तिची अपार । मत्चिंतनीं काळजी दावि फार ॥

मातें जपे जेवि पिलांस आई । झाली मला यास्तव हर्षदायी ॥ ८२ ॥
जेव्हां खचे धैर्य निराश होई । तेव्हां मला ती बहु धैर्य देई ॥
केले तिणें जे श्रम तेच आले । फळास तेणें मम कार्य झालें ॥८३॥
झालों बरा यापरि कांहिं काळें । जावें स्वदेशास मनांत आलें ॥
वार्ता अकस्मात मला कळे तों । माझा धनी उत्तर देशिं येतो ॥८४॥
पराजयाचें मम वर्तमान । त्यातें कळे तो बहु होय खिन्न ॥
त्याच्यापुढें मी धजलों न जाया । कीं हर्ष होईल न वाजिराया ॥८५॥
घडेल जेव्हां प्रभुचा प्रसाद । भृत्यास जाया पुढती न खेद ॥
या ही स्थळीं तेथवरी रहावें । वाटे घडे काय कसें पहावें ॥ ८६ ॥
मी राहिलों हा करुनी विचार । जपे प्रयत्नें कमलेस फार ॥
परस्परांचे कळतां स्वभाव । प्रेमा मिळाला सहजीच वाव ॥ ८७ ॥
एके दिनी रात्रिस शांत वेळीं । मातें गुणाढ्या कमला म्हणाली ॥
नेत्रांतुनी वाहति अश्रु, खालीं । ती लाजुनी सुंदर तोंड घाली ॥८८॥
' प्राण-प्रिया ! हे जगदेवराया ! । जी मी विनंती धजत्यें कराया ॥
ती तूं मनीं सांठविं अत्युदारीं । माझ्यावरी प्रीति करीसि भारी ॥८९॥
माझा पिता वत्सल जाय कोठें । मातें न आतां कळणार वाटे ॥
जें बोलणें त्यासच योग्य होतें । माझ्या हिता भाषण तें करीत्यें ॥९०॥
भिल्लांचिया हातुन सोडवून । तूं आणिलेंसी मजला लढून ॥
सत्ता स्वदेहावर सुस्वभावा ! । माझी न राहे जगदेवरावा ! ॥ ९१ ॥
युद्धामधें जिंकुन शत्रु-सैन्य । त्यांच्या धनें फेडिति वीर दैन्य ॥
वांटयास आल्यें तव या प्रकारें । स्वीकार माझा कर सद्विचारें ॥ ९२॥
प्राणांवरी होउनियां उदार । आलास कामा व्यसनांत फार ॥

बक्षीस द्यावें तुज काय आतां ? । देत्यें तुझ्या हा मम देह हाता ९३॥
दाई जया रक्षिति पांच नित्य । ज्या खेळवाया झटले हि भृत्य ॥
ज्या रंजवूं सोडिति आप्त कृत्य । बाल्यांतला हा मम देह सत्य ॥९४॥
ज्याची पिता काळजि फार वाहे । प्रीती हि अत्यंत करीत राहे ॥
तो देह या निर्जन भूमि–भागीं । मी एकटी अर्पितसें अभागी ९५॥
पाहें तुझें सद्गुणरूप शील । मी जाहल्यें मोहित दीर्घ काळ ॥
माझा हि अव्हेर करावयाला । तूं शक्त नाहींस गमे मनाला ॥ ९६ ॥
कन्या जनाची विनय-प्रवृत्ति । सोडून मी जी करित्यें विनंति ॥
प्रीती स्थिती सांप्रतची दयाळा! । हेतू न उद्दामपणा तियेला ॥९७ ॥
अनन्यभावें तुज ईश्वराला । मी अर्चित्यें लाज तिथे कशाला ? ॥
होणार कोणी जरि या जगांत । माझा तरी होशिल तूंच कांत' ९८॥
हे ऐकतांना अमृत–प्रलाप । न सांठवे हर्ष मनीं अमूप ॥
परंतु त्याचा उपयोग काय ? । योजूं शकें कांहिं न मी उपाय ॥९९॥
जो होय आम्हांमधिं जाति–भेद । ठावा मला तो बहु देइ खेद ॥
मोठे मराठे उफळे कुलीन । ही त्यांत कन्या गुणरूप–खाण ॥१००॥
अश्लाघ्य माझें कुळ अन्य जाती । ठाऊक कोठून असे तिला ती ! ॥
खोटें च माझें जगदेव नांव । होती न तें जाणत सुस्वभाव ॥१०१॥
तारूण्य सौंदर्य कुल स्वभाव । प्रीतीमधें निर्मळ फार भाव ॥
गोष्टी अशा मोहक जीवमात्रीं । वेडावलों पाहुन रम्य-गात्री ॥१०२॥
निंदोत वंदोत करोत कांहीं । मी लोक–रीतीस पहात नाहीं ॥
लक्ष्मी घरीं चालुन आलि तीतें । लावावया दूर न धैर्य मातें १०३॥
मी अन्य काळीं मम सत्य नांव । सांगेन हीतें कुल शील गांव ॥

उदार चित्तें अपराध पोटीं । घालील दावील दया हि मोठी ॥१०४॥
झाला असा निश्चय जों मनाचा । मी बोललों हात धरून तीचा ॥
नक्षत्र-तारा-ग्रह-रत्न पूर्ण । विस्तीर्ण आकाश निळें बघून ॥ १०५ ॥
' अंभोज–नेत्री ! कमले ! सुगात्री ! । मी वाहतों आण निवांत रात्रीं ॥
आकाश पृथ्वी जल या दिशाही । साक्षीस ठेवून पवित्र दाही १०६
मल्लारि मार्तंड महाप्रभाव । माझ्या कुळीं जेजुरि–वासि देव ॥
त्याचीं पदें मी हृदयीं स्मरून । मी वाहतों या समयास आण १०७
आम्ही मराठे भजतों जियेला । जी शोभवीते तुळजापुराला ॥
त्या देविचेही चरण स्मरून । मी वाहतों या समयास आण १०८॥
पूर्वीं वसिष्ठादि ऋषी पवित्र । झाले असे निर्मळ यच्चरित्र ॥
मूर्ती तयांच्या मनि आठवून । मी वाहतों या समयास आण ॥१०९॥
शिवाजि शाहू नृप रामदास । ज्ञानेश्वरा ज्ञान–पयोनदास ॥
ध्यानीं तुकोबास हि आठवून । मी वाहतों या समयास आण ११०
कीं आजपासून तुला वरून । राहीन संसार सुखें करून ॥
प्रीतींत आणील बिघाड कांहीं । वस्तूच ऐशी भुवनांत नाहीं ! १११
धर्मार्थ कामीं धरिशील जे तूं । ते सर्व ही मी पुरवीन हेतू ॥
तूं धर्म-पत्नी मम मी हि भर्ता । सौख्यें भजूं ईश्वर सर्व-कर्ता ११२
दारिद्र्य-ऐश्वर्य सुखीं विलासीं । दुःखीं सखी तूं मम पूर्ण होसी ॥
प्राणावरी संकटही पडेल । सोडीन तूतें न असें घडेल ' ॥ ११३ ॥
गांधर्व-योगें अमुचा विवाह । झाला न तेथें द्विज हव्यवाह ॥
होता झरा वाहत मात्र तेथ । मंदस्वरें शब्द करीत जात ॥ ११४ ॥
पुष्पांस जेथें बहु दिव्य गंध । वाहे जिथें शीतळ वात मंद ॥

तीरीं नदीच्या कुरणांत गार । झालें अम्हां खेळुन सौख्य फार ११५
माझ्या सर्वे शूर शिपाइ तीस । होते म्हणें मी प्रिय मित्र ज्यांस ॥
मी कोण हें नाहिं तिला कळून । त्यांनीं दिलें मद्धच आठवून ११६
एकांतवासांत अशीं अनेक । गेलीं दिनें कीं घटिका च एक ॥
माझी प्रिया गर्भ धरी तयानें । आनंद अत्यंत मनांत बाणे ॥११७॥
संगें स्वकीयांतुन लोक घ्यावे । शिकारिला दूरवरी हि जावें ॥
यावें घरा घेउन मांस नित्य । आरंभिलें हें मग मीं स्वकृत्य ॥११८॥
आम्ही शिकारीस असे निघालों । ते एकदां दुर्गम रानिं गेलों ॥
रक्षावयाला कमलेस होते । संगें तिचे लोक घरीं रहाते ॥ ११९ ॥
जों वीस कोसांवरि लांब गेलों । मी एकदां दुर्ग वनांत चालों ॥
तों पाहिले चार मनुष्य तेथें । येतां त्वरेनें अमुच्याच पंथें ॥ १२० ॥
मीं ज्या स्थळीं राहुन काळ नेला । तें होय ठावें स्थळ मज्जनाला ॥
माझे च हे हेर मला पहाया । आले स्ववार्तेस तिथें कथाया ॥१२१॥
ते सांगती कीं मज ' पेशवा तो । सेनेसवें मालव-देशीं येतो ॥
होतें निजामासह युद्ध मोठें । त्या हारवाया झटती मराठे ॥ १२२ ॥
रात्री दिनीं कीं तुमचाच ध्यास । त्या पेशव्याच्या धरितो मनास ॥
गेलां कुठे शोध करी अपार । नाहीं तुम्ही यास्तव खिन्न फार १२३
एका क्षणाचा न विलंब लावा । सर्वां मराठ्यांस सवें बलावा ॥
जा पेशव्याच्या चरणा समीप । उन्मत्त हा होय निजाम भूप ' १२४
स्त्री आपदर्शा समयीं त्यजावें । सांगेल जेथें धनि तेथ जावें ॥
आम्हां मराठ्यांत अशीच चाल । लंघावया कोण तिला धजेल ? १२५
जाऊन मी जों कमलेस भेटें । तेणें घडे फार विलंब वाटे ॥

त्यां धाडिला यास्तव दूत एक । देऊन संगें सुख-वाच्य लेख १२६
'जातों रणा आज निघून हा मी । जो पेशव्याच्या पडणार कामीं ॥
गांठी कधीं होतिल कोण जाणे। वाटे मना खेद विशेष तेणें १२७
मल्हार मी होळकर प्रसिद्ध । ज्या प्रीति-पाशीं करितेस बद्ध ॥
भार्या अशी तूं गुणवंत माझी । व्हावें न का मी यशवंत आजी ? १२८
पूर्वीं तुला मीं मम नांव गांव । केला नसे विश्रुत मत्प्रभाव ॥
साध्वी तुझा हा अपराध केला । तो पाहिजे त्वां विसरून गेला १२९
होतो जरी सांप्रत हा वियोग । भेटावयाचा हि घडेल योग ॥
येईन घालून सुकीर्ति-हार । होऊं नको यास्तव तूं अधीर ॥ १३० ॥
जें मूळचें कोमळ शोभमान । प्रसूतिनें होईल अंग खिन्न ॥
आहेस तेथें च तुवां रहावें । पुढील काळास सुखें पहावें ॥ १३१ ॥
माझा असे मित्र सुराजमल्ल । यत्नें तुझें रक्षण तो करील ॥
रक्षूं तुला वीस शिपाइ तेथें । आहेत ते देतिल धीर तूतें ॥ १३२ ॥
माझ्या करींची तरवार युद्धीं । देईल ती वांछित कार्य-सिद्धी ॥
येईन न्याया तुज मी ससैन्य । दावूं नको यास्तव लेश दैन्य ' १३३
माझें खरें नांव तिला कळावें । गेलों कुठे ज्ञात असें हि व्हावें ॥
मीं धाडिलें यास्तव तें सुपत्र । परी विधीची करणी विचित्र ! ॥१३४॥
मी त्या प्रसंगीं मग बाजिराया । जाऊन भेटें झटलों लढाया ॥
भोपाळच्या संनिध शत्रु गांठीं । मी लागलों जिंकुन त्यास पाठी १३५
आरंभिली ध्वंसुन शत्रु लूट । शत्रूंत झाली पुरतीच फूट ॥
झालें पुण्याच्या दरबारिं नांव । माझें, जनीं वर्णिति मत्प्रभाव ॥१३६॥
त्या गांविं गेलों परतून वेगें । भार्येस भेटूं मज ध्यास लागे ॥

होती न तेथें परि हायहाय ! । देवापुढें काय असे उपाय ? ।। १३७।।
मीं धुंडिलें पुष्कळ आसपास । विलाप केला स्मरुनी तियेस ।।
'ये ये प्रिये रुष्ट कशास होसी ?' । धावें वनीं मारित हांक ऐसी १३८
'मीं काय केला अपराध सांगें । गेलीस तूं सोडुन दूर रागें ।।
आतां तुझे होतिल हाल फार । ये हर्ष दे भेटुन एक वार' ।।१३९।।
मातें कळे कीं मम लेख दूत । घेऊन पाहूं कमलेस जात ।।
त्या भेटले राजपुरूष कांहीं । त्यांनीं तयाला धरिलें उपायीं ।। १४०।।
'कोटयांतला एक गरीब वाणी । आहे मला कां छळितां धरूनी' ।।
ऐसें वदे तो ममदूत धूर्त । 'वंचीन यांतें' म्हणतो मनांत ।।१४१।।
वृत्तांत ज्याचा कथिलास सज्जना । त्या कृष्णदासास धरावया पुन्हा ।।
होतेच हे हिंडत राजसेवक । त्यांच्या करीं हा पडला अचानक १४२
'भला भला सांपडलास दुष्टा । जाशील कोठें पळुनी च आतां' ।।
दूतास माझ्या वदले शिपाई । त्याच्या बिडया ठोकिति हातपायीं १४३
माझी बघे वाट परंतु मी न । आलों म्हणोनी बहु होय दीन ।।
याया स्वदेशा कमला निघाली । जाणें न कोठें परि गुप्त झाली१४४
पासून तेव्हां झुरणी दयाळा ! । लागे मनाला अनुताप झाला ।।
मी कष्टतों तद्गुण–शील–रूप । येतात जेव्हां स्मृतिला अमूप १४५
जन्मांत या होइल काय भेट ? । आशा कशाला मज ती अचाट ।।
संसार–मार्गांतरिं दुःख मोठें । आहे मला एकच हेंच वाटे ।। १४६ ।।
लोकांस ज्या दुर्लभ वस्तु लोकीं । आहेत त्या सर्व मला विलोकीं ।।
नाहींच कांहीं उपयोग त्यांचा । आहे धनी मी यम–यातनांचा १४७
सन्मान ऐश्वर्य मिळून धन्य । झालों तसा होइल काय अन्य ? ।।

मन्मृत्यु–काळीं परि जीव नाहीं । जाणार शांतींत सुखांत पाहीं १४८
परोपकारा करितोस यत्ना । तूं निर्मिता त्या कमला–सुरत्ना ॥
माझा तुझा स्नेह हि पूर्वि दाट । हें सर्व मी जाणतसें मनांत ॥१४९॥
जाणून माझा अपराध मित्रा ! । क्षमा जरी तूं करिशी पवित्रा ! ॥
कांहीं समाधान वरील चित्त । मीं वर्णिलें यास्तव सर्व वृत्त" ॥१५०॥
आनंद तो सद्गद–कंठ झाला । शांत–स्वरें होळकरा म्हणाला ॥
"मल्हाररायां प्रभुचीच लीला । अगाध बा जाणिल कोण तीला ? १५१
पराजयें होय जयास दैन्य । होतें तुझें तें श्रम–खिन्न सैन्य ॥
कन्या–जनाचा अपमान झाला । येणें तुला रोष परंतु आला ॥१५२॥
अनाथ कन्या परदेशिं माझी । त्वां राखिली संकटिं लाज तीची ॥
जिंकून त्या दुष्ट नराधमातें । कन्येस माझ्या हरिलेंस हातें ॥ १५३ ॥
अर्थात तीचा पति व्हावयाला । होतास तूं योग्यच बा सुशीला ! ॥
तूं वीर–वर्या ! जरि हीन–जाती । मानीन मी थोर उणीव कां ती ?१५४
टाकून जाशी कमलेस जेव्हां । गर्भालसा[1] ती बहु होय तेव्हां ॥
पुत्रास दे जन्म सुयोग्य काळीं । ज्यानें जगीं येउन कीर्ति केली१५५
आहे तुझा पुत्र खुशाल कांता । पाहे तुझी वाट सुशील शांता ॥
सव्वीस वर्षे दिनरात्र चिंता । वाहे सती निर्मळ बुद्धिमंता !"॥१५६॥
मल्हार बोले "गुणवंत भार्या । ती भेटते कोठुन सांग आर्या ! ॥
रानीं कुणीं ओढुन दूर नेली । रागें मला टाकुन दूर गेली ॥१५७॥
ऐश्वर्य कीर्ति मम जीव आणी । घालीन सर्वांवर आज पाणी ॥
ती पृथ्विच्या पाठिवरी खुशाल । आहे जरी हें मजला कळेल १५८

---

१ जिचें शरीर गर्भानें जड झालें आहे अशी.

तूं बोलसी कीर्ति करी जगांत । आहे कुठे तो [1]कमलात्मजात ॥
त्या पाहुनी मी निववीन डोळे । वांट्यास वाटे मम हें न आलें" १५९
आनंद बोले मग " काय मित्रा ! । पाहूं तुझ्या इच्छिसि काय पुत्रा? ॥
बंदींत राहे जवळी न काय ? । सुश्लाघ्य मानी यशवंतराय ॥ १६० ॥
धीमान् शौर्य-बलाढ्य पुत्र तुमचा मल्हारराया ! गुणी ।
जो दावी करणी रणीं [2]प्रहरणीं पौरामधें अग्रणी ॥
आणा त्यास धरा उरीं कडकडी आलिंगतां पाहुं द्या ।
सौख्याच्या तुमच्या कुटुंबि सखया वाहोत आतां नद्या" ॥१६१॥

---

१ कमळेचा मुलगा. २ शस्त्रानीं.

## सर्ग एकविसावा.

मल्हारराव आनंदरावानें सांगितलेल्या वृत्तांताबद्दल खात्री करून घेतो–यशवंतरावाच्या पायांतील बिडी तोडून त्यास मल्हारराव होळकराकडे नेतात–तेथें मल्हारराव होळकराचे व आनंदराव डफळे ( वैराग्याचा वेष घेतलेला ) याचें आपल्याशीं खरें नातें काय आहे हें यशवंरायास कळतें–हें वर्तमान ऐकून यशवंतरायाची झालेली स्थिति—मल्हाररावाचें प्रेमळ भाषण—मल्हारराव, आनंदराव व यशवंतराय हे कमलेस भेटण्याकारितां कोटाशहरांत जाण्यास निघतात.

**श्लोक.**

असें आनंदाचें वचन परिसोनी प्रियकर ।
अकस्मान्मल्हारी चकित उठला तो झडकर ॥
तटस्थ स्वस्थानीं क्षणभरि महावीर बसला ।
स्थिती त्याची झाली कवण कवि वर्णील तिजला ? ॥ १ ॥
उभा राहे तेथें जणु अचल पाषाणच असे ! ।
स्थिती शोभा–स्थानीं वदनिं हृदयींची दिसतसे ॥
महाहर्षें नेत्रें टवटवित मुद्राहि दिसती ।
तदा आश्चर्यानें निरखि डफळ्यातें क्षण कृती ॥ २ ॥
म्हणे " हे आनंदा सुचरित सख्या ! पुण्यपुरुषा ! ।
पहासी तूं आजी मजसि ठकवाया तरि कसा ? ॥
असंभाव्या गोष्टी घडतिल मला हें कळविसी ।
मम स्वांतो रक्षूं व्यसनिं यशवंता वळविसी ! ॥ ३ ॥

---

१ धन्य. २ मनास.

अगाधा ज्या लीला असति अथवा कीं प्रभुचिया ।
शके अल्पज्ञानें न नर समजूं पामर तयां ॥
न जाणो तूं होसी अमृत–घनसा वत्सल महा ।
हरीच्या संकेतें करिसि गमना या स्थळिं पहा ॥ ४ ॥
जनांतें कोटयाच्या त्रसित यवनांच्या कर–तळीं ।
बघे यत्नें नूतनें झटुनि जपुनी सोडवुं बळीं ॥
म्हणोनी ते गाती निशिदिन जयाचें सुचरित ।
असे कीं तो माझा सुमति मुलगा ? सांग खचित ॥ ५ ॥
जयाच्या शौर्याचें स्तवन करणें प्राप्त मजला ।
स्व–राज्याच्या पाया निज नगरिं जो घालुं सजला ॥
प्रतापी हा ज्याळे थरथर सदा मोंगल जया ।
असे कीं तो माझा सुत बहुगुणी ? सांग सखया ! ॥ ६ ॥
बळाचा शौर्याचा निधि विदित तो बादल मला ।
असा ज्या वीरानें झगडुन रणीं भिल्ल वधिला ॥
जयाच्या हातानें कुमति खळ तो दिल्हिर मरे ।
असे कीं तो गाजी ममसुत ? सख्या सांगसि खरें ? ॥ ७ ॥
कसा नाचे झेंडा सतत भगवा भूपति–शिरीं ।
प्रचंडे स्वारांचीं प्रबळ पथकें ठेविं पदरीं ॥
असे जिंकूं आम्ही परि न शकलों तीन महिने ।
जया, कीं तो माझा प्रिय सुत असे ? सत्य कथणें ॥ ८ ॥
जया माझे स्नेही प्रबळ हटवूं नित्य झटले ।
न शौर्यानें कोटा झगडुन तयांला परि मिळे ॥

मराठे लोकांचे सकल करिता यत्न विफळ ।
असे कीं तो माझा तनुज यशवंत श्रुत-बल ? " ॥ ९ ॥
असे नाना प्रश्न प्रथम करि मल्हार झफळ्या ।
तयाच्या हर्षाच्या हृदयिं उठती थोर उकळ्या ॥
महोत्सुक्यें तेव्हां झटपट पदें ठाकित फिरे ।
निराशा शंका ही पुनरपि मनीं येउन भरे ॥ १० ॥
वदे तों आनंद स्व-जन-गण-संताप हरिता ।
खरें जें मी पूर्वी तुजसिं वदलों तें जन-मता[1] ! ॥
असा हा सोन्याचा दिवस बघतों धन्य सखया ! ।
प्रसादें ईशाच्या; म्हणुन सदया आठवि तया ॥ ११ ॥
असे येथें देवालय जवळ कोसांवर दहा ।
सकाळीं मी तेथें करित बसलों पूजन पहा ॥
तिथें येतां कोणी तरुण पुरुषाला बघितलें ।
मना माझ्या त्याचें अनुपम असें रूप गमलें ॥ १२ ॥
स्थिती रीती त्याची बघुन गति ही वेष वचन ।
गमे मोठा कोणी तरि व्यसनिं हा मग्न सुजन ॥
सभोंते रानोनी सततच तया भिल्ल जपती ।
बिडया हातीं पायीं जड बहुत ही त्यास असती ॥ १३ ॥
स्वभावें ती त्याची स्थिति बघुन आला कळवळा ।
पुढें त्यातें याया जवळ कर-संकेत दिधला ॥
विचारीलें ' सुज्ञा ! तव तनु कशी बंदिंत पडे ? ।

१ हे जनमान्या.

पिता आई कोठें असति ! तव कोठें जनि घडे? ' ॥ १४ ॥
मला आलें तेव्हां कळून सुख झालें अतिशय ।
कृपा–वृष्टी माझ्यावरि करि कसा श्रीश सदय ?॥
गुणी कन्या माझी स्थळि कवण राहे मज कळे ।
तिच्या पुत्रा दुःखी बघुन मन भारी कळवळे ॥ १५ ॥
तुझ्या हातीं त्याचें मरण जगणें राहत असें ।
कळे तेव्हां माझें स्थितिवर कसें चित्त निवसे ? ॥
तया ' भीती सोडी ' म्हणुन मग आश्वासन–पर ।
सुखाचें बोलोनी वचन उठवीलें झडकर ॥ १६ ॥
तुझा माझा होता बहुत दिवस स्नेह बरवा ।
भरे तेणें चित्तीं ह्मणुन मग उत्साह हि नवा ॥
प्रयत्नें रक्षावा तनुज कमलेचा म्हणुनियां ।
तुला आलों प्रार्थूं प्रथम कथिलें तें च सदया ! ॥ १७ ॥
असे एकाएकीं सुखद नव वृत्तांत कळती ।
जणो कीं हीं स्वप्नें सुखवुन मनाला फसविती ॥
असो आतां पायां पडुन तुजला हेंच विनवीं ।
तुझी भार्या देखो तुजसि यशवंतास सुखवीं " ॥ १८ ॥
महात्मा मल्हारी वचन वदला होळकर तो ।
" जिवांचा प्राण्यांच्या विधि तरि कसा घोळ करितो ! ॥
जयाच्या दृष्टीनें नयन सुखवावे हरहर ! ।
तया मारूं हातीं धरवित हत्यारा खरतर ॥ १९ ॥

---

१ जन्म. २ पुत्र. ३ तीक्ष्ण.

वहातां ओघानें प्रबळ नदिच्या मृन्मय घट ।
जसे अन्योन्यांला बघति थडकू येति निकट ॥
तसा मी संसारीं झटपट कराया झट निघे ।
स्वपुत्राला नेणें जवळ यशवंता जरि बघें ॥ २० ॥
किती पुण्यें केलीं ? कितिक तरि मी जन्म जपलों ।
प्रभो ! त्वत्सेवेला, किती तरि तपें घोर तपलों ? ॥
जयांचीं हीं आलीं अवचित अशीं सुंदर फळें ।
तुझी लीला देवा ! मजसि मति-मंदास न कळे ! ॥ २१ ॥
मनीं इच्छा नाना धरून जन संसार-गेहनीं ।
पुढें जातां जातां थकुन बसती वाट चुकुनी ॥
पिता पुत्रां गांठी पडति समयीं त्या अवचित ।
प्रभूचीं हीं सूत्रें अवघड कळायास खचित ॥ २२ ॥
जशीं कांटेझाडें जवळ पळतां फाडिति तनू ।
तशीं दुःखें पीडा करिति किति मी त्यांप्रत गणूं ? ॥
अशाही संसारीं परि न जन राहील कवण ? ।
जरी देवा ! त्यातें सुखकर असा दाविसि दिन ॥ २३ ॥
सुखें स्वर्गीं नाना असति कथिती ग्रंथ अवघे ।
तयांची या लोकीं तरि कवण तो धन्य चव घे ? ॥
अहाहा ! आनंदा ! सुख मजसि जें आज मिळतें ।
तयाच्या योगानें महि-तल मला श्रेष्ठ गमतें ॥ २४ ॥
नियंता पौरांचा सुभग मतिमंतांत पहिला ।

१ मातीचे २ संसाररूपी अरण्यांत. ३ नायक. ४ सुंदर.

अहंता भिल्लांची हरित सुखै-संतान महिला ॥
विहंता खानाचा निज यश समंतात् पसरितो ।
जयंता त्या जैसा सुरॅप यशवंतास बघतो ॥ २५ ॥
अहो ! आणा कोणी सुजन यशवंता झडकरी ।
बिडेया तोडा वत्सा असुख न घडो लेशहि भरी ॥
उठा आणा माझ्या सकळ सरदारांस जवळ ।
तयांतें पाहूं दे प्रिय तनुज माझा श्रुत-बल ! " ॥ २६ ॥
असें जों मल्हारी वचन वदला गद्गद मुखें ।
कुणी गेले आणूं त्वरित यशवंताप्रत सुखें ॥
प्रयत्नें काढोनी कर-चरणिंचे घट्ट निगड ।
तया नेती स्वामीजवळ पळती ते धडधड ॥ २७ ॥
तयांची ती मुद्रा बघुन यशवंतास नवल ।
गमे जों ते आले साविनय तयाच्याच जवळ ॥
तिथे पाहे पौराधिप चकित वैरागि मुदित ।
महात्मा मल्हार स्थित सदय दृष्टी निरखित ॥ २८ ॥
म्हणे तों आनंद प्रथम " यशवंता ! प्रिय-गुणा ! ।
नको वाढूं देऊं मज बघुनियां विस्मय मना ॥
नसे मी वैरागी जरि तुजसि बाहेरुन दिसें ।
मला आनंदाख्यी समज तव मातामह असें " ॥ २९ ॥
उठे तों मल्हारी दिसलि तरि त्याची स्थिति कशी ।

---

१ गर्व. २ सुख वाढविणारा. ३ नाश करणारा. ४ इंद्र. ५ बिड्या.
६ आनंदराव हें नांव.

पडे गालीं बाष्पे प्रचुर घडते वृष्टिच जशी ! ॥
गळा दाटे वाटे कठिण भरला त्या गहिवर ।
म्हणे " बा ! ये पुत्रा ! मज कर सुखी या महिवर ॥ ३० ॥
मनाची जी माझ्या स्थिति घडतसे पाहुन तुला ।
मनीं प्रेमाचा जो खळबळुनियां लोट उठला ॥
अशा गोष्टी मातें सुचविति खरा तूं मम सुत ।
न कां आनंदाचे मग वचन ऐकेन विहित ॥ ३१ ॥
तुला वत्सा ! झालों प्रसवुन सुखी या महि-तळीं ।
न जाणें दुर्दैवें परि असुनि तूं नित्य जवळी ॥
तुझी आई तूं मी मिळुन सगळा काळ दवडूं ।
मरायाच्या पूर्वी मम हृदयिं हें इच्छित घडू ॥ ३२
गुणी विद्वान्मानी कुशल व्यवहारांत सुकृती ।
पुरस्कर्ता धर्मा नय-पटु उदार-स्थिति-मती ॥
बळें गाढा शौर्यें अतुल सकल-ज्ञान-महित ।
असा माझा पाहें तरूण अणखी सुंदर सुत ॥ ३३ ॥
जशी रानीं कोठें पडलि ठिणगी कोण बघतो ! ।
क्रमें काळें तीचा भयंकर असा लोळ बनतो ॥
मराठा तूं तैसा पडुन परदेशीं निज गुणें ।
अतिप्रख्यातीला चढसि यश तें वास्तव दुणें ॥ ३४ ॥
विचित्रा ज्या गोष्टी कथितिल पुराणांतिल जन ।
कथा वैचित्र्यानें मम अधिक त्यांतें म्हणविन ॥

१ अश्रु. २ पुण्यवान्. ३ नीतिप्रवीण.

तुझ्या कंठीं विद्या सहजचि पडे मोहित तुला ।
धरी ही तारुण्यामधिं हि तव त्या अद्भुत फळा ॥
मना आली प्रौढी सरळपण औदार्य अवघें ।
रणीं या कोटयाच्या तुमुल महिने तीनहि बघें ॥ ४१ ॥
स्वराज्य स्थापावें म्हणुन झटलासी प्रतिदिन ।
करावें मीं याचें उचित असतां नित्य मनन ।
तुझ्या मार्गीं ती ती अडचण पुढें मीं ढकलिली ॥
अशा गोष्टी आतां स्मरुनच मना खंत जडली ! ॥ ४२ ॥
कशाला मीं केलें समर असतें दुंबळ ? मुला ! ।
तुझी कांहीं पूर्वीं जरि मिळवती माहिती मला ॥
कशाला जीवांचा अमित हरिला प्राण असता ? ।
अनाथांचा झाला कहर शहरीं सज्जन-मता ! ॥ ४३ ॥
असो. जी जी झाली मजकडुन पीडा प्रतिदिनीं ।
नव्हे ती मीं केली समज पुरतें हें समजुनी ॥
तुवां सौख्यें आयुःक्रम चिर करावा म्हणुनियां ।
विनंती त्या ईशाजवळ करितों पूर्ण सदया ! " ॥ ४४ ॥
वदे ऐसें प्रेमें रडुनि रडुनी होळकर तो ।
स्वहस्तें सन्मानें धरुन यशवंता बसवितो ॥
तिघे एकामेकां बघुन सुख-सिंधूत बुडले ! ।
तयाच्या योगानें सकळ गत गोष्टी विसरले ॥ ४५ ॥
अभागी तृष्णेनें तळमळत पायस्त पडतो ।
' अहो ! द्याहो पाणी लव तरि ' असे शब्द करितो ॥

जसे झोंके खातां चपळ गगनीं वावडि फिरे ।
मनुष्या आयुष्य-क्रम घडतसे त्यापरिच रे! ॥ ३५ ॥
तुझी आई तूतें धरि जंव न गर्भीं बहु दिन ।
तिला केलें तेथें त्यजुन नृप कार्यार्थ गमन ॥
तयानें हा झाला विरह कमलेचा बहुदिन ।
असो क्षात्रा धर्मा सतत मम धिक्कार कठिण! ॥ ३६ ॥
हंसावें बोलावें क्षणभर बसावें न निचळ ।
रडावें रांगावें दुडदुड पळावें हि चपळ ॥
अशी लीला बाल्यीं तव नच पहाया मज मिळे ।
पिता हा मी तूझा किती तरि अभागी नच कळे! ॥ ३७ ॥
तुला अंकीं माझ्या बसवुन शिकूं साह्य करणें ।
तुवां केल्या प्रश्ना परिसुन विचित्रांस हंसणें ॥
तुवां जें मागावें धरून हठ त्यातें पुरवणें ।
न होतें हें दैवीं म्हणुन गमतें व्यर्थचि जिणें! ॥ ३८ ॥
पित्यानें पुत्राला सकळ शिकवावें समुचित ।
तया शस्त्रें शास्त्रें विविध करवावीं अवगत ॥
मराठ्यांच्या रीती असुन सरदारांत असली ।
न संधी दुर्दैवें तुजसि शिकवूं त्यां बघितली! ॥ ३९ ॥
'जिथें नाहीं पाणी स्थळि तरु अशा एक उठला ।
न माळी त्या पाहे न जल लव ओपी न जपला ॥
परंतु स्वानंदें प्रति दिन चढे तोच वरती ।
सुगंधें तत्पुष्पांतिल मग दिशा सर्व भरती' ॥ ४० ॥

अशा वेळीं लोंढा प्रबळ नदिचा येउन भिडे ।
तसें झालें पौराधिपति यशवंता मग पुढें ॥ ४६ ॥
सुखाब्धीच्या लाटांमधिं बुचकळे मारि मिटक्या ।
रडे हांसे झाली स्थिति बहु चमत्कारिक तया ॥
धरी आजोबाचे चरण मग वंदी स्वजनका ।
गळा दाटे प्रेमें म्हणुन बसला तो क्षण मुका ॥ ४७ ॥
" अहो ! आलें माझें सुकृत अवघें आजच फळा ।
तुम्हां दोघांच्या मी म्हणुन बघतों मूर्ति विमळा ॥
अहो ताता ! केले बहुत अपराध प्रतिदिन ।
क्षमा व्हावी त्यांची म्हणुन चरणातें विनविन ॥ ४८ ॥
जयांच्या म्यां पायां पडुन सुखवावें घडिघडी ।
कराया त्यांच्याशीं सतत झटलों मी वरचढी ॥
पितापुत्रीं झालें रण नवल हें लोक म्हणती ।
अहाहा ! दैवाची किति तरि चमत्कारिक गती ! ॥ ४९ ॥
अहो ताता ! मातामह लवकरी येयुन चला ।
सुखीं माझी जावी बुडुन जननी पूर्ण कमला ॥
न जाणो ती कांहीं करिल भय वाटे मज असें ।
चला जाऊं कोटयामाधिं म्हणुनियां " तो वदतसे ॥ ५० ॥

आनंद, मल्हार, पुराधिकारी ।
घेऊनियां मंडळि अन्य सारी ॥
घोड्यांवरी बैसुनियां निघाले ।
वेगें बघाया कमलेस आले ॥ ५१ ॥

---

## सर्ग बाविसावा.

कमलाबाई यशवंतरायाविषयीं चिंता करिते—तिला यशवंतरायाचा निरोप कळतो—तो ऐकून ती यशवंतरायाच्या जीविताविषयीं निराश होत्साती शोक करिते—तिच्या वाड्यांत मराठे लोक शिरतात—त्यांच्या येण्याबद्दल तिच्या मनांत आलेली शंका—त्या समयीं तिचें वर्तन—मल्हाररावास पाहून कमलाबाई मूर्च्छा पावते.

### श्लोक.

घडलें रण कोटियामधें । जय तें पूर्ण मराठियांस दे ॥
जिकडे तिकडे रडारडी । उठती थोर लहान यामधीं ॥ १ ॥
यशवंत न मान सागर । दिसती दोहन अन्य नागर ॥
पडले सगळेच बंदिंत । पुर कोटा म्हणुनी भयावृत ॥ २ ॥
यशवंत निरोप पाठवी । जननीच्या चरणांस आठवी ॥
न घडो भलतें म्हणे मनीं । कमलेतें सुत–शोक होउनी ॥ ३ ॥
बसली असतां स्व–मंदिरीं । निज पुत्र–स्मरणास ती करी ॥
नयनांतुन अश्रु चालती । वदनीं श्वासाहि उष्ण ऊठती ॥ ४ ॥
"मुलगा कुल–दीप लाडका । परदेशीं कुशली असेल का ? ॥
अथवा अरि टाकुनी भया । क्षण देती न बसूं कुठे तया ? ॥ ५ ॥
यशवंत थकेल चालतां । स्वशिरीं पाउस ऊन सोसतां ॥
श्रम सोसुं कसा शकेल कीं । स्थिति ऐशी न तयास ठाउकी ॥ ६ ॥
अजुनी घर सोडुनी कुठे । नच गेलें मम बाळ धाकुटें ॥
फिरला असशील बांसरा ! । किति तूं दूर ! तुला न आसरा ॥ ७ ॥
जरि भूक तहान लागते । तरि मी नित्य तुला विचारतें ॥

जवळी बसवून बाळका । परदेशीं वदतील गोड कां ? ॥ ८ ॥
बघतें तुजला हि एकदां । यशवंता असतें सुखी तदा ॥
तिळ तीळ तुटून जीव हा । गमतें जाइल बाहिरी पहा ! ॥ ९ ॥
मिळुनी तव मित्र भोंवते । स्थिर यत्नें जपतात कीं तुतें ॥
अथवा रिपु-सैन्य वारिधी । छळिती जेंवि सशास पारधी ! ॥ १० ॥
सुजनें तुज आसरा दिला । कवणें जाणुनि संकटीं मुला ! ॥
अथवा फिरतोस निर्जनीं । विपिनीं[1] भूक तहान लागुनी ॥ ११ ॥
निज कार्य न सिद्ध जाहलें । म्हणुनि त्वन्मन खेद पावलें ॥
हत-वीर्य हत्यार ठेविसी । कठिण क्षत्रिय-धर्म टाकिसी ॥ १२ ॥
अथवा मिळवून सोबती । दुसरे ज्यांस अपार हिंमती ॥
बघतोस पुन्हा अरींप्रत । रणिं जिंकूं तरि काय सांप्रत ? ॥ १३ ॥
मम बालक कोणत्या स्थळीं । वसला काळजि हीच लागली ॥
प्रभुजी ! कर एवढी दया । सदया संकटिं रक्षिजे तया।" ॥ १४ ॥
कमला बहु दीन यापरी । यशवंत-स्मरणास ती करी ॥
खिडकींतुन पाहते दुर । वर आकाश अपार—विस्तर ॥ १५ ॥
हिकडे तिकडे फिरे त्वरें । दिसतें तोंड निराश बावरें ॥
पडते महिला क्षण क्षण । करिते खोल सुदीर्घ-चिंतन ॥ १६ ॥
इतक्यांत महालिं चाकर । विनवी येउन जोडुनी कर ॥
"तुजलागिं निरोप सांगुनी । मज धाडी यशवंत सद्गुणी" ॥ १७ ॥
कमला उठली समुत्सुक । खुलती हर्ष-विफुल्ल नेत्रक ॥
"सुजना मज सांग सांगरे ! । यशवंताप्रत पाहिलें खरें ? ॥ १८ ॥

---

[1] वनांत.

मम बाळ खुशाल कीं असे ? । कवण्या जाउन तो स्थळीं वसे ? ॥
मज काय निरोप पाठवी ? । वद. कांहीं न मनांत सांठवीं " ॥ १९ ॥
मग चाकर खिन्न तोंड तो । करि शोकें मुसकार सोडितो ॥
" कमले ! सुख सर्वदा मिळे । कवणा धन्य नरा न हें कळे ॥२०॥
सुख दुःख रहाटगाडगें । वरि आम्ही घट बद्ध जीव गे ॥
फिरवी प्रभु जेंवि इच्छितो । म्हणुनी आम्हि तसेंच फीरतों " ॥२१॥
हळु भीत च भीत बोलतो । कमलेला हि सचिंत पाहतो ॥
वदला यशवंत जे धनी । सगळें नीट मनांत आणुनी ॥ २२ ॥
मरणार असें कळोनियां । सुत जो धाडि निरोप त्या तया ॥
परिसून दशा घडे कशी । कळवाया मम जीभ कायशी ! ॥ २३ ॥
बसली घटकाभरि स्थिर । न तदा हालवि नेत्र सुंदर ॥
जणु वीज पडे नभांतुन । कमलेच्याच शिरीं धडाडुन ॥ २४ ॥
मग शोक समुद्र तुंबळ । करि पोटीं सहसा उचंबळ ॥
नयनांतुन येइ बाहिर । मुख टाकी भरुनी अनावर ॥ २५ ॥
पहिले जरि ओंठ तांबडे । रडतां झालि तयां नवी चढे ॥
सुटला जणु हार मौक्तिकें । पडती अश्रु-जलें अमोलिकें ॥ २६ ॥
दगडासम ज्या असे मन । जरि तेथें असता असा जन ॥
रडल्याविण त्या न राहवे । कमलेच्या वदना न पाहवे ! ॥ २७ ॥
" अपराध करून काय मी । भगवंता ! अशि होतसें श्रमी ॥
किति कोप तुझा सुदारुण । प्रभुजी ! काय तयास कारण ? ॥ २८ ॥
यशवंत ! सुजाण लेंकरा ! । मजला आज दुरावशी खरा ॥
तुजवांचुनि एक ही क्षण । मम चित्तास पडेल चैन न ॥ २९ ॥

किति तूं मतिमान् पराक्रमी । किति आणूं गुण ते मनांत मी ? ॥
मज जें सुख या जगीं वसे । अवलंबून तुझ्यावरी असे ॥ ३० ॥
तव जीवन तेंचि जीवन । मजला, राहिल आज जीव न ॥
जगण्यास कशास पाहिजे ? । यशवंताविण काय राहिजे ? ॥ ३१ ॥
मम बोध न टाकिला तुवां । करिसी तूं किति मातृ–गौरवा ! ॥
मज दुःख दिलें न एकदां । मम अर्ध्या वचनांत तूं सदा ॥ ३२ ॥
न सुखें तुज भोगुं मीं दिलीं । नच संपत्ति तुवां हि भोगिली ॥
तव हेतु पुरे न जाहले । म्हणुनी फारच चित्त पोळलें ॥ ३३ ॥
किति ही तरि मी अभागिणी । मम दुःखें सकळा जगा उणीं ! ॥
खचला मज धीर सोडितो । मजला मृत्यु बराच भासतो ! ॥ ३४ ॥
उपजून न काळ जाहला । तंव मीं मृत्यु घरांत आणिला ॥
जिजपासुन जन्म घेतलें । तिस मीं मृत्यु-पथास लाविलें ! ॥ ३५ ॥
जननी जरि मोकली मला । करिता रक्षण बाप जाहला ॥
अजमीर–रणीं भयानकीं । पडल्या आमुचिया चुकामुकी ॥ ३६ ॥
मग वल्लभ शूर साहसी । जगदेव प्रिय सोडिही मसीं ॥
मग या यशवंत बालका । बघुनी मानित मी असें सुखा ॥ ३७ ॥
किति हट्ट कितीक खेळणीं । किति लीला तरि आठवूं मनीं ! ॥
हंसणें बसणें हि बोलणें । मज दे कौतुक मंद चालणें ॥ ३८ ॥
विरहें कितिदां प्रियाचिया । उठल्यें मृत्युस मी वरावया ॥
स्वसुतास्तव देह रक्षिला । न असा हा परिणाम लक्षिला ॥ ३९ ॥
मतिमंत उदार–मानस । यशवंत प्रिय ज्यास साहस ॥
अभिमान बहून वाटला । प्रतिसंवत्सर वाढतां भला ॥ ४० ॥

किसनें जरि संपदा दिली । न च यानें बहुकाळ भोगिली ॥
निज--देश-विमोचनास्तव । झटला दावुन वीर्य--गौरव ॥ ४१ ॥
परि तें रुचलें न ईश्वरा । जय आला म्हणुनी न नागरां ॥
धुळधाण उडालि सर्वथा । स्मरतें काय म्हणून या कथा ? ॥ ४२ ॥
नय--शील उदार वत्सल । स्तविती होळकरास निर्मळ ॥
परि टाकुन तो कसा दया । बघतो मारूं सुतास माझिया ॥ ४३ ॥
गुण--मौल्य न ज्या नरां कळे । यशवंता तव शत्रु हे असे ॥
सुटशील न आज संकटीं । मग मी राहुं कशास एकटी ? ॥ ४४ ॥
नुकताच उठे तरू वर । न फुलांचा पुरताहि ये भर ॥
इतक्यांत कडाडुनी नभीं । पडते वीज तयावरी जशी ॥ ४५ ॥
गति याच परी तुझी मुला ! । यशवंता ! गुणवंत वत्सला ! ॥
सरलें नच वर्ष चोविस । सरतो तों इतिहास सर्व ही ॥ ४६ ॥
असली असतां तुझी दशा । तुजवांचून भयाण या दिशा ॥
जग शून्य गमे मनाप्रत । म्हणुनी टाकिन देह सांप्रत ॥ ४७ ॥
पडतां पडतां नभांतुन । तव आधार करीत रक्षण ॥
परि तूंहि लयास पावसी । दुसरी काय गती असे मशीं ? ॥ ४८ ॥
मम पुत्र करील कीर्तिला । मज आणील सुधन्यता भला ॥
परि दैव म्हणे नसो असें । म्हणुनी ही स्थिति आज येतसे ॥ ४९ ॥
मरतां मरतांहि एकदां । तव पाहीन मुखास सौख्यदा ॥
लिहिलें विधिनें न काय हो । मम भाळीं तरि जीव--नाश हो ! ॥५०॥
कमले ! सुख--लेश ही क्षण । तुजला दुर्लभ आजपासुन ॥
तव जीवित व्यर्थ देह ही । रडते सोसुन भार ही मही ॥ ५१ ॥

यशवंत धरी अशी गती । तुज आधार कुठे सरस्वती ? ॥
सुभगे ! कमलालये ! तुला । वर कोठून मिळे असा भला ? ॥५२॥
विनया ! पर-देशिं जा फिर । करुणे ! स्वर्ग-पथास तूं धर ॥
रण-शौर्य पळो जगांतुन । करितें कीर्तिस कोण बंधन ? ॥ ५३ ॥
जन या नगरांतले तुम्ही ! । रडतां संतत होइजे श्रमी ॥
तुमच्याच हितार्थ-साधनीं । मरतो मत्सुत शूर सद्गुणी ॥ ५४ ॥
बसल्या चरणांत शृंखला । तुमच्या येउन घोर मोंगलां ॥
तुमचें करण्यास मोचन । विधि उत्पन्न करी असा जन ? ॥ ५५ ॥
जशि बाळपणांत पोषक । यशवंता ! तव मार्ग-दर्शक ॥
पर-लोक-पथास लागत्यें । तुज आधीं तुज मार्ग दावित्यें " ॥५६॥
कमला विमला असें वदे । रडवी लोक सभोंवती रडे ॥
करुणा जणु मूर्तिमंत ती । करिते भूमि-तळावरी स्थिती ॥ ५७ ॥
जंव या परि शब्द बोलत्ये । पळतां स्वार पथांत पाहत्ये ॥
शिरले गृहिं दोनशें जन । पद त्यांचें पडतें दणादण ॥ ५८ ॥
" कमला बसली कुठे असे " ? । जन गर्जोनि विचारिती असें ॥
तिज होय अपार विस्मय । शिरलें कांहिं मनामधें भय ॥ ५९ ॥
वाटलें तिला दुष्ट हे अरी । काय कारणें येति या घरीं ॥
कां तरी तिचें नांव घेउनी । गर्जती उठे हा जय-ध्वनी ॥ ६० ॥
यांचा कांहीं दुष्ट हेतू असेल । स्त्री-वर्गाचा मान चित्तीं नसेल ॥
आले येथें निश्चयें हे मराठे । गेला माझा हाय ! तो बाळ कोठें ? ६१

### आर्या.

इतर स्त्रियांस आली असती मूर्च्छा भयें प्रसंगा या ॥
परि भ्याल्या डफळ्यांच्या न कधींच मुली सुना न वा आया ॥६२॥

दडदड येति मराठे वरती चढुनी तिच्या महालांत ॥
वेगें कमला उठली क्रोधानें लाल होउन रहात ॥ ६३ ॥

श्लोक.

जी त्या महालीं तरवार मोठी। खुंटीवरी टांगालि एक होती ॥
ती घेउनी मेण करून दूर। दारामधें धांवुन येइ शूर ॥ ६४ ॥

" फांस लावुनी गळ्यास माझिया सुताचिया।
कां छळावया मला त्यजून येतसां भया ॥
याल दोन पाउलें पुढें मराल तत्क्षणीं।
जा चला चला मुखें मला न दाखवा तुम्हीं" ॥ ६५ ॥

तिची मूर्ति आधींच लावण्य-खाणी। तिला कोप अत्यंत शोभेस आणी॥
क्षणें नेत्र-तेजेंच जाळील वाटे। भयें विस्मयें जाति मागें मराठे ॥६६॥

डोळे सुंदर लाल ओंठ हलती गालांस लाली चढे।
काळे कज्जल-तुल्य केश रुळती खांद्यावरोनी पुढें ॥
क्रोधें शब्द फिरे हत्यार तळपे हातीं अशी आकृती।
जाती नेत्र दिपून पाहुन मग स्वस्थानिं ते थांबती ॥ ६७ ॥

टाकी पाउल मंद सद्गद तदा मल्हार झाला पुढें।
डोळे लावुन त्यास पाहि कमला वृत्तांत कैसा घडे ॥
किंकाळी मग फोडि धाडकर ती खालीं पडे मूर्च्छित।
झाली धांदल सर्व लोक भिउनी आले पुढें धांवत ॥ ६८ ॥

## सर्ग तेविसावा.

कमलाबाई सावध होते—तिची व नवऱ्याची ओळख पटते—' जगदेवराव पवार ' असें आपलें खोटें नांव सांगून कमलाबाईस फसविल्याबद्दल मल्हारराव तिची क्षमा मागतो—सर्वांस आनंद होतो–आनंदराव व यशवंतराव यांची व कमलाबाईची भेट–परस्पर आपापल्या हकीकती सांगतात–आनंदरावाचें बोधपर भाषण.

**श्लोक.**

घडिभरि कमलेला यावयालागिं शुद्धी ।
करिति सदुपचारां.पावली आत्मबुद्धी ॥
अवचित घडतां हा भेटिचा लाभ हर्ष ।
उसळुन मनिं आली मूर्च्छना ती तियेस ॥ १ ॥
नयन उघडि झाली पूर्ण ती सावधान ।
फिरविच परि दृष्टी भोंवताली कदा न ॥
भय धरि—नयनांहीं पाहिलें त्या प्रियास ।
न बघति जरि आतां होति भारी निराश ॥ २ ॥
बहु सुख तिस झालें त्यांत डोळे मिटीत ।
स्मरुन पतिस गालीं थर्र रोमांच येत ॥
वदत हळु " जरी हें स्वप्न देवा ! असेल ।
सुख-कर तरि आतां हेंच राहो खुशाल ! " ॥ ३ ॥
मधुर मधुर मंद-स्यंद कीं दुग्ध-धारा ।
दयित तिजसिं वाणी बोलला अत्युदारा ॥

---

१ मंद आहे प्रवाह ज्याचा.

" सुदिन च विधि दावी कीं अशी धन्य दारा[1] ।
पुनरपि मज भेटे देइ सौख्या अपारा ॥ ४ ॥
बहुत दिवस झाले भेटलों आज भार्ये ! ।
सुखविसि मज शब्दें कां न तूं एक आर्ये[2] ! ॥
वळव मजकडे ती प्रीतिनें मुग्ध दृष्टी ।
मनिं धरि तव भर्ता जी सुधेचीच वृष्टी " ॥ ५ ॥
परिसुन सुख पावे शब्द ऐसे पतीचे ।
भ्रम-निरसन झालें त्या क्षणीं सर्व तीचें ॥
दचकुन उठताहे स्वस्थळीं स्तब्ध राहे ।
सभय निरखुनीयां भोंवती पाहताहे ॥ ६ ॥
कमल-सदृश नेत्रीं आणुनी अश्रु-वारी ।
विनवित सुत–शोक–व्याकुला दिव्य नारी ॥
" सदय दयित माझा भेटसी आज काय ।
व्यसन[3] मम न ठावें कीं तुला ? हाय हाय ! ॥ ७ ॥
तरूण सुगुण पौर-त्राण[4] हें ज्यास काम ।
करिल तनुज[5] लोका तो उद्यां रामराम ॥
म्हणुनिच जगदेवा ! धांव नाथा ! अनाथा ।
झडकर यशवंता रक्षणें त्वांच आतां ॥ ८ ॥
अदय म्हणति लोकीं वीर मल्हारराव ।
बुडविल मम वाटे शोक-सिंधूंत नांव ॥

---

१ पत्नी. २ श्रेष्ठ स्त्रिये. ३ संकट. ४ कोट्यांतील रहिवासी लोकांचें रक्षण. ५ पुत्र.

म्हणुनिच जगदेवा! जा तुझा पुत्र आण ।
क्षण न दवडिं आतां! धांव! माझीच आण! " ॥ ९ ॥
हंसुन मग म्हणाला वीर मल्हार काय ।
" न कर विसर दुःखा सुंदरी ' हाय हाय ' ॥
तव सुत यशवंत स्वस्थ आहे खुशाल ।
न भय लव हि दावूं त्याजला शक्त काळ ॥ १० ॥
विसर तवहि साध्वी पूर्वी अन्याय केला ।
धरुन चरण आतां मागतों या भिकेला ॥
म्हणवित जगदेव ख्यात मल्हार मीच ।
त्यजुन तुजसि गेलों निर्जनीं मीच नीच ॥ ११ ॥
मुलखि फिरत होतों जाट राजाचिया मी ।
लपवुन निज नामा वागलों याच नामीं ॥
बघुन तुजसिं तेव्हां गुंतलों मोह-पाशीं ।
झटुन झणि विवाहें केलि मी आपुलीशी ॥ १२ ॥
सुगुण अतुल रूप श्रेष्ठ जाती कुलीन ।
बघुन तुजसिं व्हावा मोह कोणास तो न? ॥
विरह घडुन वर्षे जाहलीं पंचवीस ।
फिरुन परि सुखाच्या आज घेतों चवीस ॥ १३ ॥
कपट निपट केलें जाचलें हें मनातें ।
प्रकट परि न व्हाया धैर्य ही होय मातें ॥
मम धनि मज सांगे शत्रुला शोक द्याया ।

---

१ पूर्ण.

त्यजुन तुजसिं गेलों त्या क्षणीं मी लढाया ॥ १४ ॥
परवशपण मातें दास मी पेशव्यांचा ।
प्रभु-चरणिं समर्पीं आपुली देह-वाचा ॥
प्रबळ रिपु कराया सिद्ध झाला लढाई ।
म्हणुन करून गेलों संगरा[1] फार घाई ॥ १५ ॥
स्मरुं तरि गत गोष्टी त्या स्थळींच्या किमर्थ ।
शुभ समयिं अशा ज्या खेद चित्तास देत ॥
पुनरपि तुज पाहूं देव ठेवी जिवंत ।
म्हणुन समजतों मी आपणा भाग्यवंत ! " ॥ १६ ॥
सुवचन वदतां हें कंठ आला भरून ।
पडत हळुच गालीं नेत्रिचें वारि जाण ॥
स्तिमित सकळ गात्रें खुंटली तेथ वाणी ।
द्रवलि कमल-नेत्री ती हि लावण्यखाणी ॥ १७ ॥
कर करून पुढारा धांवली रम्य मूर्ती ।
बळकट मिठि मारी स्वप्रिया स्फुंदतां ती ॥
धरून तिस तयाला चुंबितां तृप्ति नाहीं ।
द्रवति जन हि तेव्हां भोंवताले शिपाई ॥ १८ ॥
मग सुत यशवंत प्रीतिनें हात जोडी ।
चरण-नमनिं माता त्यास आधींच ओढी ॥
उरिं धरून वदे कीं "बाळका ! लाडक्या ! हें ॥
शुभ मुख तव धन्या मी पुन्हा आज पाहें " ॥ १९ ॥

---

1 युद्धास.

थरथरवित होता पूर्वि ज्याचा प्रभाव ।
रिपुसच, निजधर्मोत्तिजनीं ज्यास हाव ॥
षडरिंस परि आतां मात्र जो दे न ठाव ।
निरखुन कमलेला पाहि आनंदराव ॥ २० ॥
तपत तप सहोनी जो सदा ऊन ताप ।
प्रभु-वर-भजनानें नित्य जाळी स्वपाप ॥
वदन-सदनिं राहे श्रीश-नाम-प्रलाप ।
निरखित कमला तो बाप दिव्य-प्रताप ॥ २१ ॥
स्थिति तरि तुमचीही जाहली काय ताता! ।
श्रम सहुन अनंत श्रांत हिंडून तीर्थां ॥
मजसिं न बघवे हें कांपतें चित्त बाई! ।
उठति विषम कैशा यातना या अगाई! ॥ २२ ॥
स्व-जनक-चरणांतें घालि लोटांगणाला ।
रडत रडत पोटीं हर्ष ही फार झाला ॥
"प्रियकर मम ताता! वंदित्ये कन्यका ही ।
विण न तव कृपेच्या मागत्ये अन्य कांहीं" ॥ २३ ॥
"जनक तव सभाग्ये! वृद्ध मी एकदांच ।
तुजसिं बघुन व्हावें इच्छितों तृप्त साच ॥
परि मज बघवेना अश्रु येतात भारी ।
फिरुन फिरुन आतां कोण त्यांतें निवारी!" ॥ २४ ॥
पुर-पति यशवंत ख्यात मल्हार तात ।

१ कामक्रोधादींस. २ मुख हेंच गृह यांत.

पति-रत कमला ती आणि आनंद शांत ॥
बसुन निज चरित्रें सांगती एकमेकां ।
श्रवणिं अनुभवीती ते पुन्हा हर्ष शोकां ॥ २५ ॥
विविध मिळति जैसे रंग एका ठिकाणीं ।
पसरिति निजकांती एकमेकांवरोनी ॥
परि न उणिव येते तत्प्रभेला तयानें ।
सकळ खुलति एका ठायिं तें कोण वानें ! ॥ २६ ॥
विरह बहु दिनांचा होय दुर्दैव-योगें ।
स्वचरित जन जो तो जाहलें त्यांत सांगे ॥
अनुपम कृति होती सर्व ही त्या जनांची ।
व्यसनिं उदयिं वा जी श्लाघ्य सन्मान्य साची ॥ २७ ॥
दवडिलि कमलेनें संकटीं फार वर्षें ।
त्यजित पति दिसेना बाप होणार कैसें ॥
कठिण समयिं तीनें सोडिला नाहिं धीर ।
प्रभुवर परदेशीं ठेविला पूर्ण भार ॥ २८ ॥
हृदयिं उठुन आशा लोपल्या जेंवि लाटा ।
विषम सतत बोंचि काळजी जेंवि कांटा ॥
परि नच ढळ पावे लेश ही शील तीचें ।
म्हणुन नवल वाटे त्या सतीच्या स्थितीचें ॥ २९ ॥
कपट-वध कराया बादलें दिल्लिरानें ।
झटुन लगट केली त्यांस नाशास हा नें ॥
म्हणवुनि यशवंता वानिलें तत्पित्यानें ।

सुरस चरित त्याचें ऐकुनी स्तुत्य कानें ॥ ३० ॥
स्व-जन-हित कराया युक्ति ज्या पौर-नाथ ।
करि, बघुन च त्यांतें खिन्न मल्हार होत ॥
परि परिसुनि आतां त्याच नानाप्रकारें ॥
स्तविति बहुत होती विस्मय. स्तब्ध सारे ॥ ३१ ॥
विरह विषम झाला काळजी काळ फार ।
सहन करि तयां तें दुःख झालें अपार ॥
कथन हित-करें तें पेशव्याच्या करीतां ।
विसरलि कमला स्व-त्याग-रोषास आतां ॥ ३२ ॥
सरळ सुरस साधी साधुची पोक्त वाणी ।
अमृत-मधुर आणी शांत सद्भाव-खाणी ॥
परिसालि इफळ्याची तन्मय स्वांत१ होय ।
विमल-चरित बोले योगि आनंदराय ॥ ३३ ॥
" जल-निधिवर वारा क्षोभवी थोर लाट ।
फुटुन चहुंकडे ती बिंदु घेतात वाट ॥
व्यसनिं पडुन आम्ही तीन ही एक काळीं ।
जरि दुरवर गेलों आजि हे भेट झाली ॥ ३४ ॥
जगिं उपजुन कोणा सौख्य नाहीं मिळालें ।
व्यसन-शत मनुष्यें पाहिजे भोगियेलें ॥
पडुन सुख-विलासीं होति उन्मत्त जीव ।
व्यसनिं म्हणाति ' देवा ! लौकरी धांव धांव ' ॥ ३५ ॥

---

१ मन.

हंसुनि दुडदुडां जें धांवतें मूल भारी।
रमवि निज मनाला वस्तुंनीं सौख्यकारी ॥
जंव भयकर कांहीं पाहतां भीति वाटे।
रडुन रडुन बोले 'आइगे ! शीघ्र भेटें' ॥ ३६ ॥
किति जरि जगिं दुःखें येउनी वर्षतात।
प्रभु जपत मनुष्या द्यावया हर्ष तात ॥
परि सहज न होतो ईश्वराचा प्रसाद।
स्मरण मनिं तयाचें पाहिजे नित्य गाढ ॥ ३७ ॥
प्रभु-कर निजभक्तां रक्षण्याला समर्थ।
अनय सहन त्यातें लेश नाहींच होत ॥
सतत भय निवारी संकटीं वाट दावी।
किति तरि करुणा त्या ईश्वराची वदावी ! ॥ ३८ ॥
सुकृत करुन घ्यावें याच जन्मीं फळाला।
विसरत हरि नाहीं तो कदा सज्जनाला ॥
अपकृति हि करावी या जगीं जी नरानें।
विषम विषच तैसें भोगिजे दुःख त्यानें ॥ ३९ ॥
स्मरुन धरिति जे जे सत्पथालागिं देवा।
अवचित च सुखाचा सांपडे त्यांस ठेवा ॥
निशिदिन दुसऱ्याचे चिंतिते घातपात।
मरति जणु अकस्मात् सोसुनी वज्रपात ॥ ४० ॥
तृषित फिरति जेव्हां लोक सन्मार्गवर्ती।
सुख-जल-नद वाहे त्यास हर्षे पहाती ॥

परि खळ निज कर्मीं थांबवीती न लेश ।
न कळत पडताहे तों गळीं काळ पाश ॥ ४१ ॥
ममकर हित-कारी त्या स्थळीं सावकारा ।
सुजन किसनदासा जाहला दान-शूरा ॥
परि मम कमलेच्या रक्षणीं पूर्ण दक्ष ।
कुठुन मजसिं ठावें होय हा कल्पवृक्ष ॥ ४२ ॥
अकरुण तरुणानें बादलें भिल्ल-नाथें ।
धरुन तिजसिं नेलें दुर्बला स्त्री जनातें ॥
म्हणुनिच जणु तीच्या पुत्र-हस्तें मराया ।
खल बल-निधि आला धीट मल्हारराया ! " ॥ ४३ ॥
अशा गोष्टी तेथें स्मरुन करिती मागिल कथा ।
निशा गेली सारी हळुहळु कथा त्या न सरतां ॥
उजाडाया झालें अरुण उगवे कांति पसरे ।
सुटे वारा पक्षी किलबिल करीती सुखभरें ॥ ४४ ॥

---

## सर्ग चोविसावा.

कोटा-शहर रजपूत लोकांस परत द्यावें व यशवंतरायास तेथील राजपदावर स्थापावें अशा अर्थाचा पेशव्याकडून मल्हारराव होळकरास हुकूम येतो—कोटा-शहरांत जिकडे तिकडे आनंद—नागरिक लोक यशवंतरायास तेथील राजपद स्वीकारण्याविषयीं प्रार्थना करितात—यशवंतराय ती अमान्य करितो—भूषणसिंगाचा मुलगा अभयसिंग यास कोटा-देशाच्या गादीवर बसवावें अशी यशवंतराय सूचना करितो—ती सर्वांस मान्य होते—यशवंतराय अभयसिंगास जोधपुराहून आणून राज्यावर बसवितो—यशवंतरायाचा भूषणसिंगाची कन्या लीलावती हिजशीं विवाह—यशवंतराय अभयसिंगाच्या बालदशेंत राज्य कारभार सुरळीत चालेल अशी व्यवस्था करून कोटा-शहर सोडितो—उपसंहार.

श्लोक.

सकाळिं सूर्योदय जों न जाहला । पुण्याहुनी येउन दूत पावला ॥
पुढें तदा ठेवुन राज-शासन । करीत तो होळकरास वंदन ॥ १ ॥
असेल पत्रार्थ समग्र कायसा । कळे तया पूर्विं विचित्र-साहसा ॥
परंतु तें वंदुन पत्र वाचतो । पुराधिकारी यशवंत ऐकतो ॥ २ ॥
“ प्रधान पंत स्थित पुण्य-पत्तनीं । स्व-शौर्य-संपादितें-वैभवाग्रणी[1] ॥
हुकूम हा होळकरास धाडिती । समग्र कोटगांतिल जाणुनी स्थिती॥ ३
महाभुजा! शौर्य तुझ्या भुजीं वसे। स्वराज्य-भाराश्रय तेंच कीं असे ॥
तयावरी ठेवुन भार सर्व ही । सुखें वसों पाळित हिंदुची मही ॥ ४ ॥
पराक्रमाचे तव दुंदुभि-ध्वनी । दुरून ऐकों बसुनी पुण्यांतुनी ॥

१ आपल्या शौर्यानें ज्यांनीं ऐश्वर्य मिळविलें आहे अशांत मुख्य.

म्हणे मला हर्ष असा कसा दिला । सदाशिव साधुन डाव आपला ! ।।२६।।
अनिष्ट माझें दिनरात्र चिंतिता । नसून इच्छाहि करी महा हिता ।।
समुद्र झुंजे गिरिशीं कधीं कधीं । अनर्घ्य रत्नें विखरी शिळांमधीं।।२७।।
मला जरी वागवितो अरीसम । सदाशिव प्रीतिस पात्र हा मम ।।
सुतास माझ्या यशवंतराजया । समृद्ध केलें करितां मदप्रिया ।। २८ ।।
स्वतंत्रता पौरजनांस लाधली । अशी सुवार्ता नगरांत फांकली ।।
न पेशवे घेतिल देश आपणा । न मोंगलां स्थान मिळेल हें पुन्हा २९
स्वराज्य येतें स्वकरामधें स्वयें । पळून जातात अनंत तीं भयें ।।
जिथे मराठे करणार रक्षण । कुठून दुःखी असती तिथे जन?।। ३०।।
महामना दिल्लिर-भिल्ल--मर्दन । लहान थोरां सम-सौख्य-वर्धन ।।
पुरस्थ--नारी-नर-नेत्र-नंदनें । पुरास रक्षी यशवंत आपण ।। ३१ ।।
अनंत धीमंत बुधाभिनंदित । पुण्याहुनी येउन तेथ पावत ।।
तयास पाहूं जन ते उतावळे । त्यजूनिया स्व-व्यवहार धांवले ।।३२।।
सुविद्य वाचस्पतिपुत्र ज्यापरी । प्रवेश देवेंद्र-पुरामधें करी ।।
तसा अनंत प्रिय-दर्शन स्वयें । महोत्सवें साजत आज आंत ये ।।३३।।
कृतज्ञ तेव्हां यशवंत तो कृती । गुरूस साष्टांग करी नमस्कृती ।।
तयास हातें उठवून सत्वर । उरीं स्व-शिष्या धरि धीमतांवर ।। ३४ ।।
कुलीन मानी रजपूत सज्जन । करीति ते होळकरास वंदन ।।
सुखावले पावुन आदराप्रत । मनीं वसे द्वेष न लेश सांप्रत ।। ३५ ।।

---

१ अमोल्य. २ मत्+अप्रिय=माझें अहित. ३ आनंद देणारा. ४ सज्जनांनीं ज्याच्या हिताची इच्छा केली आहे असा. ५ कच. ६ स्वर्गांत. ७ धन्य. ८ बुद्धिमान् लोकांत श्रेष्ठ.

कोष्ट्यांत गोष्टी असल्या घडून । येतां तिथे होति जन प्रसन्न ॥
त्या उत्सवीं तों यशवंतराया । उद्देशुनी लागति भाट गाया ॥ ३६ ॥
"खद्वाण दंडि बल-गर्वित शत्रु भारी ।
तूं कालिदास[1] असुनी भव-भूति-धारी[2] ॥
श्री-हर्ष-दायक अम्हां सकलां सुबंधो ! ।
साष्टांग पात करुनी तुज लोक वंदो * ॥ ३७ ॥
अग्न्यत्रिपुत्र-विधि-शंकर-शंभुजांहीं[3] ।
कीं दोन तीन अणि चार हि पांच साही ॥
वाटे मुखें धरिलिं जाणुन याच भावा ।
एक्या मुखें तवगुण-स्तव केंवि व्हावा ? " ॥ ३८ ॥
अनंत ते दोहन मान सागर ।
जमून हर्षे दुसरे हि नागर ॥
नय-प्रवीणा यशवंतराजया ।
समादरें लागति ते वदावया ॥ ३९ ॥
" समुचित-गुण ऐसा कांत विक्रांत[4] पावे ।
वरून तुजसि वाटे राज्यलक्ष्मी सुखावे ॥
पितृसम परिपोषीं सुप्रजा[5] स्वप्रजांतें ।
चिर धरिं यशवंता राज्य-सूत्रांस हातें ॥ ४० ॥
तुजसम जन जे जे घेति या लोकिं जन्म ।

---

१ कालीचा भक्त. २ शंकराचें ऐश्वर्य धारण करणारा. ३ अग्नि, दत्तात्रेय, ब्रम्हदेव, शंकर, कार्तिकस्वामी यांनीं. ४ पराक्रमी. ५ चांगली आहे संतति ज्याची असा होत्साता. * या श्लोकांत संस्कृत कवींचीं नांवें गोंविलीं आहेत.

करून मिळविती ते श्रेष्ठता थोर कर्म ॥
म्हणुनि भरंवसा जो ठेविला याच पायीं ।
व्यसन-शांति हि राया रक्षिला त्वां उपायीं ॥ ४१ ॥
स्तविति तव गुणांतें लोक हे लक्ष कोटी ।
तुजविषयिं तयांच्या अंतरीं भक्ति मोठी ॥
इतर नृप-पदातें योग्य नाहीं मनुष्य ।
नमुनि विनवितों हें आयकावें अवश्य " ॥ ४२ ॥
उदार यशवंत तो परिसुनी वचा यापरी ।
सदुत्तर पित्याकडे बघुन पौरलोकां करी ॥
" विनंति बहु नम्र मी करितसें तिला आयका ।
विचार सगळे तुम्हीं मिळुनियां करावा निका ॥ ४३ ॥
अहो सुजन थोर हो ! स्तवितसां मला पामरा ।
उदारतर भाव हा तुमचिया मनींचा खरा ॥
अशी न तरि काय मीं कराणि केलि लोकोत्तरा ।
तुम्हीं करितसां धनी मर्जासि आपुल्या किंकरा ॥ ४४ ॥
निरालसपणें पुरा झगडलों करूं रक्षण ।
न दे जरि अरी बसूं सुखित शांत चित्तें क्षण ॥
प्रभाव तुमचाच तो सकल जाणतों हें मनीं ।
सहाय असतां तुम्ही भिइन काय काळा रणीं ? ॥ ४५ ॥
लहानपण जेथ मीं दवडिलें सुखें खेळतां ।
जिथील जन जाणते शिकविती सुविद्या स्वतां ॥
अनंत उपकार तो किसनदास मातें करी ।

अकारण-सुहृत्तम प्रथम राहिला या पुरीं ॥ ४६ ॥
जमीनिंत जया रुजे वट-फळांतलें बीज तें ।
दिनीं दिनिं हि आर्द्रता शिथिल शोषुनी वाढतें ॥
जमीनिस तया अशा तरु विशाल तो होउन ।
स्वविस्तर-भरें उन्हा धरि शिरीं करी रक्षण ॥ ४७ ॥
स्व-धर्म-पर ज्या स्थळीं सदय लोक सौख्यें वसे ।
अशी जननभूमि ही प्रिय नरा न कोणा असे ? ॥
पदांत परतंत्रता पडलि थोर तीच्या बिडी ।
अधन्य नर कोणता व्यसनिं या धरी आवडी ॥ ४८ ॥
म्हणून झटलों जरी इथुन घालवूं मोंगलां ।
निरिच्छ मम जीव हा क्षण न वैभवीं लोभला ॥
नको मजसिं राज्य मी सविनय स्वयें प्रार्थितों ।
न मंदमतिला ममे मजसि मान हा शोभतो ॥ ४९ ॥
अफाट विधिनें असे जग विचित्र हें निर्मित ।
फिरेन मिळवीन मी सुयश वैभवें मंडित ॥
पिता मम जसा स्वयें मिळवि संपदा सन्मत ।
तसें करिन संमत प्रिय तुम्हां असो मन्मत ॥ ५० ॥
स्वराज्यचि इथे असो जरि असे अशी कामना ।
सुयुक्ति कथितों तुम्हां क्षण शिवो न शंका मना ॥
वसे महितं भूषण प्रिय पुरीं गुणालंकृत ।

---

१ निरिच्छपणानें प्रीति करणाऱ्या आप्तांत श्रेष्ठ. २ मान्य.

पुरातन-नृपान्वयीं[1] जनन त्या घडे संमतें[2] ॥ ५१ ॥
तयास अदयें जया समर्थि दिल्लिरें मारिलें ।
स्वकीय गृहिं रक्षिलीं जपुन मीं तयाचीं मुलें ॥
कसे विसरतां ? अरी करिल घात हें वाटलें ।
न जोधपुरिं काय मीं त्वरित त्यांजला धाडिलें ? ॥ ५२ ॥
गुणी अभय भूषणात्मज सुरूप लीलावती ।
खुशाल नृप मंदिरीं प्रथित त्या पुरीं राहती ॥
म्हणून ह्मणतों तुम्ही अभयसिंग रायाप्रत ।
निमंत्रण समादरें समुचितें करा सांप्रत ॥ ५३ ॥
करील नृप राज्य तो सुगुण भूषणाचा सुत ।
प्रजांस सतत श्रमें करिल शांत आनंदित ॥
करीत असतां असा नृपति भूमिचें रक्षण ।
तुम्हांसह हि साहसी कवण वैर बांधी क्षण ? ॥ ५४ ॥
खुसाल जरि काय मी करिन तें तुम्हां सांगतों ।
स्वहेतु पुरवावया जगदधीश्वरा प्रार्थितों ॥
मला न करणें असे किमपि या पुरीं राहिलें ।
शरीर मन आज मीं सदय पेशव्या वाहिलें ॥ ५५ ॥
निशाण भगवें करीं धरुन रामदासार्पित ।
स्वराज्य पसरीन मी करिन पूर्वजां तर्पित[3] ॥
बलाढ्य यवनांसवें झगडतां जिथें अर्पिला ।
स्वदेह मम पूर्वजीं मजसि तोच जागा भला ॥ ५६ ॥

---

१ पूर्वीच्या राजवंशांत. २ सन्मान्य. ३ तृप्त.

वयस्क पुरुषीं हठें समरिं देह देतां बळी ।
स्वधर्मपरिवर्धनीं प्रबळ आस जी ठेविली ॥
तिला तरुण हे अम्ही न करूं काय हो पूरित ? ॥
निशाण भगवें हिमालय-शिरीं करूं रोपितें ॥ ५७ ॥
परंतु गत गोष्टिचें स्मरण होय जेव्हां मला ।
स्मरेन सकळां तुम्हां सुखभरें तदा वत्सलां ॥
शकेन जरि साह्य मी करूं तुम्हां असें वाटलें ।
हुकूम मजसीं करा गरिब मूल हें धाकुलें ॥ ५८ ॥
प्रजेवरिच वर्षती अमित नित्य जे फायदे ।
असे नर-पती करो स्वजन—शासनीं कायदे ॥
गृह-स्थितिमधें असो भरभराट दुःखक्षय ।
अनेकविध संपदांसहित येथ नांदो नय ॥ ५९ ॥
असोत तुमचीं घरीं सुखित नायका लेंकरें ।
स्वराज्य-सुख हीं तुम्हां सतत थोर लाभो त्वरें ॥
सदैव तुमचा असो सदय पाठिराखा हरी ।
अशी नमुत मागणी प्रभु-वरा तया मी करीं " ॥ ६० ॥
ऐसा सुनिश्चय करी यशवंतराय ।
ते देति संमति नसे दुसरा उपाय ॥
निर्लोभ आणिक उदार असें तयाचें,
तें वाक्य मोहित जना करि रम्य साचें ॥ ६१ ॥
जोधपुरास महाजन नंतर पाठविती ।

१ वृद्ध. २ रोंविलेलें.

नागर तेथुन भूषण-पुत्रक आणविती ॥
नेमुन एक मुहूर्त सुमंगल-लग्न-युत ।
स्थापिति राज-पदीं अभया यशवंतनुत ॥ ६२ ॥
तें दिन तेथिल लोक अजूनहि आठविती ।
गोष्टि जुन्या स्मरणीं सुखदायक सांठविती ॥
क्रीडन गायन वादन नर्तन गान पुरीं ।
चालति उत्सव त्या दुसरी न वसेच सरी ॥ ६३ ॥
जे लोक प्रिय निज देश- रक्षणार्थ ।
शौर्यानें लढुनच होति देह-मुक्त ॥
त्यां त्यांच्या गरिब मुलांस ही स्त्रियांतें ।
वात्सल्यें[1] धन यशवंत देत हातें ॥ ६४ ॥
जे जे होते कण्हत समरीं वार लागुन भारी ।
शुश्रूषेची तजविज करी त्यांचिया योग्य सारी ॥
जे जे कष्टी रडति मरतां आप्त तत्सांत्वनानें ।
यत्नें यत्नें सुखवि कमला-पुत्र तो दानमानें ॥ ६५ ॥
राजा होय लहान यास्तव तया दे दोहनाच्या करीं ।
कोशाधीश्वर मान सागर हि तो सेनापतित्वा धरी ॥
मुख्यामात्यपदीं अनंत वसला ज्याची कुशाग्रा मती ।
योजी त्या यशवंत युक्ति घडते जेणेंचि राज्योन्नती ॥ ६६ ॥
अभयाप्रत मुख्य मुख्य त्याचे ।
अधिकारी सुकृतज्ञ सुज्ञ साचे ॥

---

1 दयाळूपणानें.

उपदेशिति मागणी नृपाळा ।
यशवंता करणें अशी दयाळा ॥ ६७ ॥
"केले अनंत उपकार तुवां तराया ।
कोठून शक्ति मज त्यां यशवंतराया ॥
आहें कृतज्ञ बहु लीन विचार-शीला ।
विज्ञापना करिन सांप्रत ऐक तीला ॥ ६८ ॥
तातानें भागिनीस आणिक मला हातीं तुझ्या दीधलें ।
मातें राज-पदीं तुवां बसवुनी मद्भद्र[1] संपादिलें ॥
हातें घेउन पल्लव-प्रभ सख्या लीलावतीचा कर ।
ने श्लाघ्या गृहिणी-पदास तिजला तूं हृष्ट तीतें कर" ॥ ६९ ॥
जावोनी यशवंत संनिध गळां प्रेमें मिठी घालुनी ।
मंऱ्यानीं उपदिष्ट बाल-नृपती त्या आर्जवी भाषणीं ॥
बोले तों यशवंत "काय अभया याहून मातें प्रिय ? ।
धिक्कारीन तुझें मनोगत असें मानूं नको तूं भय ॥ ७० ॥
होता तुझा जनक वांछित हेंच राया ।
लीलावतीस मज उत्सुकता वराया ॥
प्रेमा तिचा मजवरी बहु होय वाटे ।
आज्ञापिसी सदय तूं हि असेंच मातें ॥ ७१ ॥
सुरासुरच काय हे मिळति पौर हो दक्षणी[2] ।
बलाढ्य झटती हटें रण-पयोब्धिच्यां[3] मंथनीं ॥
तुझा उदय जाहला म्हणुन जाण चंद्रासम ।

१ माझें कल्याण. २ मराठे. ३ युद्ध हाच क्षीरसमुद्र याच्या.

शिवीं[1] स्थिति तुला मिळे प्रिय असें घडे हें मम ॥ ७२ ॥
लक्ष्मीस जेंवि हरि त्यापरि मी वरीन ।
स्त्रीरत्न दुर्लभ तुझी अभया! बहीण ॥
संग्राम-सिंधु-मथनीं थकलों विसावा ।
लीलावतीस वरुनी मजला मिळावा " ॥ ७३ ॥
भुवन-सुखद शोभे चंद्रिका जेंवि चंद्रा ।
मिळुन विमल किंवा जन्हु-कन्या[2] समुद्रा ॥
वरुन विलसली ती भूषणाची सुकन्या ।
गुण निधि यशवंता होय या लोकिं मान्या ॥ ७४ ॥
आल्या गोष्टि अशा घडून पुरल्या इच्छा समस्तांचिया ।
सैन्यें घेउन शूर होळकर तो संगें निघे जावया ॥
तद्भार्या कमला गुणाढ्य सुतही लीलावती-संगत ।
जाती-यास्तव होति लोक सगळे कोटापुरीं दुःखित ७५
कन्या जामात नातू विनविति न असे शक्त देह श्रमाया ।
राहें आम्हांस द्याया चिर सुख जवळी नित्य आनंदराया ॥
योगी आनंद गेला पुनरपि परि तो दूर तीर्थाटनातें ।
सार्थक्या देह लावी प्रभु-वर-चरणां चिंतुनी मंगलातें ॥ ७६ ॥
या कालानंतर श्री-गुण-युत[3] कमला-पुत्र देशाभिमानी ।
दंडोनी पेशव्यांचे समरिं अरि तयां नम्र वृत्तीस आणी ॥
मेघच्छन्ना[4] रवीचा अवचित पडतां सृष्टि हर्षे प्रकाश ।

१ कल्याणांत, पक्षीं शिवावर. २ गंगा. ३ लक्ष्मी व सद्गुण यांहीं युक्त.
४ मेघांनीं आच्छादिलेला.

तैसा विश्राम त्याचा अतिसुखद असा होय लीलावतीस॥७७॥
सुताभ्युदय पाहतां सुखित होय मल्हार तो ।
वदे ' कवण धन्यता मजविणें जगीं पावतो ' ॥
सुतासह तया अरी समरिं गांठितां जर्जर ।
ह्मणे मनिं ' अवार्य हा प्रबळ कीं नसा निर्जर ! ' ॥७८॥
फोडी सह्य-शिला दरींतुन निघे रानीं वनीं चालते ।
वेगानें खडकाळ भूमिवरि जी ठेंचाळुनी भागते ॥
कृष्णा तीच सपाट देशिं शिरतां शोभे प्रशांताकृती ।
पाणी प्राशुन गोड निर्मळ तिचें सृष्टी सुखावे किती! ॥७९॥
तैसी पुत्रपराक्रमा परिसते पाहे स्नुषा-सद्गुण ।
कांत-प्रेम-समादरें भरुनियां शांती धरी तन्मन ॥
दुःखें पूर्ववयामधील कमला स्वप्नापरी मानिते ।
नेते काल परोपकारिं तिजला होती कवी वानिते ॥८० ॥

समाप्त.

---

१ विश्रांतीस. २ पुत्राचा उत्कर्ष. ३ देव. ४ सह्याद्रीचे खडक. ५ सुनेचे ( लीलावतीचे ) सद्गुण.

## यशवंतराय महाकाव्यांतील पद्यसंख्या.

| सर्ग. | पद्यें. | सर्ग. | पद्यें. |
|---|---|---|---|
| पहिला. | ५७ | तेरावा. | ९५ |
| दुसरा. | ८४ | चवदावा. | ९९ |
| तिसरा. | ५६ | पंधरावा. | ७४ |
| चवथा. | ५० | सोळावा. | ६४ |
| पांचवा. | ५३ | सतरावा. | ६३ |
| सहावा. | ९८ | अठरावा. | ५६ |
| सातवा. | ४९ | एकोणिसावा. | ६६ |
| आठवा. | ६२ | विसावा. | १६१ |
| नववा. | ४८ | एकविसावा. | ५१ |
| दहावा. | ७६ | बाविसावा. | ६८ |
| अकरावा. | ९९ | तेविसावा. | ४४ |
| बारावा. | ७२ | चोविसावा. | ८० |
| | ८०४ | | ९२१ |

एकूण........१७२५

# शुद्धिपत्र.

| ष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १७ | ५ | परोकारीं | परोपकारीं | ५६ | २१ | भाव | माव |
| २० | २ | संपत्तिचें | संपत्तिचें | ५७ | ६ | मब्दोध | मद्बोध |
| २३ | १९ | येइ | येइं | ६० | ११ | दिल्लीरखान | दिलीरखान |
| २४ | ८ | कसे | कसें | ६५ | २१ | पहाण्यासार-खा | न होण्यासा-रखा |
| २७ | ७ | कुलपद्धती तें | कुलपद्धतीतें | ६६ | ११ | नहे | न हें |
| ३३ | २० | पाशिया | पार्शि या | ,, | १२ | सर्पापरि | सर्पा परि |
| ३४ | १ | वागला | वागलां | ७१ | १० | आमुचीं | अमुचीं |
| ३६ | २ | मनस्थानीं | मन स्थानीं | ७१ | ११ | पादशिष्य | पट्टशिष्य |
| ३७ | ८ | बाधकस्थित | बाधक स्थित | ,, | २० | अम्हांस | आम्हांस |
| ,, | १० | त्यांजला | त्याजला | ७२ | १८ | अथात | अर्थात |
| ४७ | १२ | खवळून | खवळुन | ,, | २० | शास्त्र | शास्त्र |
| ,, | १९ | तयास | तयांस | ७३ | ४ | नक्षत्रसें | नक्षत्रसे |
| ४८ | ६ | पाहताहे | पहाताहें | ,, | ६ | गिरीला. | गिरिला |
| ,, | १६ | सुयुक्ति-सिद्धि | सुयुक्ति-सिद्ध | ७८ | ५ | तयाचे | तयाचें |
| ,, | १८ | तयास. | तयांस. | ८४ | २३ | त्यजन | त्यजून |
| ५० | ५ | येईं | येइ | ८७ | १ | सोडविली | सोडविण्या |
| ,, | ६ | भार | मार | ,, | १२ | दक्षिणींस | दक्षणींस |
| ५२ | २ | आपुल्या | अपुल्या | ८९ | ३ | आपुल्या | अपुल्या |
| ५३ | १३ | भाहें | मांहें | ,, | ६ | पहातो | पाहतो |
| ५४ | २१ | प्रतिबंधयुक्त | प्रतिबंध युक्त | ९३ | ४ | झाले | झालें |
| ५६ | ५ | ज्यांस | ज्यास | ९६ | ३ | दुग्धचें | दुग्धेंच |
| ,, | १२ | जाई | जाईं | ९६ | ४ | आणि | अणि |
| ,, | २० | सांव | साव | | | | |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९६ | ५ | वहातें | वाहतें |
| १०० | १० | परि | धरि |
| १०१ | १६ | तरूं वरूनी | तरूंवरूनी |
| १०२ | १६ | किती वर | कितींवर |
| १०५ | ८ | आणखी | अणखी |
| ,, | ९ | इथें | इथे |
| ,, | १२ | तयां | तया |
| ,, | १६ | नृपति बंधु | नृपति-बंधु |
| ,, | ,, | पुण्यांतील | पुण्यांतिल |
| १०७ | ७ | होते | होतें |
| १०८ | ६ | भंवति | भंवती |
| ,, | ७ | शृंगारिलें | शृंगारिले |
| ,, | ९ | रम्य गात्री | रम्य-गात्री |
| ,, | १९ | युद्धप्रयाशी | युद्धाप्रयायी |
| ११२ | ९ | अविचार | अनिवार्य |
| ११४ | ११ | वाणा | वाणी |
| ११५ | ८ | कारितां | करिता |
| ,, | १६ | रक्षू | रक्षूं |
| १२१ | १ | जहाले | जाहले |
| १२५ | ३ | जाऊन | जाउन |
| १२९ | ९ | येऊं | येउं |
| १३५ | १५ | लोकामात्र | लोकमात्र |
| १३६ | १० | स्वतनुंनीं | स्वतनुनीं |
| १४४ | १८ | महाध्वनी तें | महाध्वनीतें |
| १४९ | २ | लोकांस | लोकास |
| १५२ | १५ | जहालें | जाहलें |
| १५४ | १४ | व्यरहार | व्यवहार |
| १५७ | १२ | शिपडून | शिपडुन |
| १६० | ८ | दरबारि | दरबारिं |
| १६१ | १ | वृक्षास बळत्व | वृक्षा सबळत्व |
| १६८ | २१ | पराजयला | पराजयाला |
| १७२ | २१ | सोडून | सोडुन |
| १७५ | ९ | रहावे | रहावें |
| ,, | १२ | दिनी | दिनीं |
| १८० | ८ | आहे | आहें |
| १८० | १२ | च | न |
| १८१ | २० | कीर्ति | कीर्ती |
| १८६ | २ | कळून | कळुन |
| ,, | ८ | सोडी | सोडीं |
| १९१ | १९ | सिंधूत | सिंधूंत |
| १९० | २२ | तपुष्पांतिल | तत्पुष्पांतिल |
| १९४ | ६ | नुला | मुला |
| २०२ | ६ | लब | लव |